जीवनसाथ - 12 पुस्तकांच्या संचापैकी

पुस्तक क्र. 3

# व्यक्तिमत्त्व विकासाचा खरा अर्थ



# पुरुष पालकांचं शिक्षण

---

## जीवनसाथ

जीवनभर स्पष्ट विचारांची साथ म्हणजे जीवनसाथ

**अनिल भागवत**

वैवाहिक आणि कौटुंबिक समुपदेशक

**प्रकाशक**
अनिल भागवत
ई 3/21 गिरिजा शंकर विहार
कर्वे नगर, पुणे 411052



प्रथम आवृत्ती : 27 डिसेंबर2015

मुखपृष्ठ : आभा भागवत

**टाइपसेटिंग**
स्मिता टाईपसेटर्स
1120, सदाशिव पेठ,
पुणे 411030

**मुद्रणस्थळ**
स्मिता प्रिंटर्स,
1019, सदाशिव पेठ,
पुणे 411030

**किंमत 300 रुपये**



# अनिल भागवत – ओळख

- बांधकाम व्यवस्थापनाचं अमेरिकेत शिक्षण आणि नोकरी
- अमेरिकन ग्रीन कार्ड होल्डर असूनही भारतात परत येण्याचा निर्णय
- 8 महिने 50,000 कि.मी. आणि 35 देशांचा स्वतः गाडी चालवत बायकोबरोबर प्रवास
- भारतात अतिजलद आणि दर्जेदार बांधकाम व्यवस्थापनाचा अनेक वर्षं व्यवसाय
- तत्त्वज्ञान, मानसशास्त्र आणि व्यवस्थापनशास्त्र यांचा रोजच्या आयुष्यात उपयोग करण्याविषयी खास अभ्यास
- 'वैवाहिक आणि कौटुंबिक समुपदेशन' या विषयात डॉक्टरेटचं काम पूर्ण
- इंग्लंड आणि अमेरिकेत पालक-शिक्षण आणि विवाह-शिक्षणाच्या कार्यशाळा
- विवाह-शिक्षणाचे 500 च्या वर कार्यक्रम (1997 ते 2015)
- पालक-शिक्षणाचे 300 च्या वर कार्यक्रम (1980 ते 2015)

सामाजिक कामं -

- जीवनसाथ अभ्यास मंडळ – प्रमुख सल्लागार
- जीवनसाथ समुपदेशन केंद्र – प्रमुख समुपदेशक
- पालक विद्यापीठ – सल्लागार
- इंग्लिश संभाषण वर्ग – प्रमुख शिक्षक
- रोजच्या आयुष्याचं व्यवस्थापन – डायरी प्रशिक्षण – प्रमुख प्रशिक्षक
- सुंदर हस्ताक्षर वर्ग – प्रशिक्षक

● लेखन – वर्तमानपत्रांतून, नियतकालिकांतून अनेक वर्षं लिखाण

पुस्तकं -

1. घर पाहावं बांधून (5वी आवृत्ती)
2. लग्न पाहावं करून (उपलब्ध नाही)
3. व्यवस्थापनशास्त्र तुमच्यासाठी (2री आवृत्ती)





# शोभा भागवत – ओळख

- मराठी, संस्कृत, इंग्लिश भाषेत पदव्या
- अमेरिकन ग्रीन कार्ड होल्डर असूनही भारतात परत येण्याचा निर्णय
- 8 महिने 50,000 कि.मी. आणि 35 देशांचा स्वतः गाडी चालवत नवऱ्याबरोबर प्रवास
- 2 वर्षं युनिसेफसाठी शैक्षणिक सल्लागार
- गरवारे बालभवन, सारसबाग, पुणे. च्या संचालक (1985 ते 2015)
- भारत सरकारतर्फे शैक्षणिक कार्यक्रमासाठी ब्राझिलला भेट
- इंग्लंड आणि अमेरिकेत पालक-शिक्षण आणि विवाह शिक्षणाच्या कार्यशाळा
- विवाह-शिक्षणाचे 300 च्या वर कार्यक्रम (1997 ते 2015)
- पालक-शिक्षणाचे 1000 च्या वर कार्यक्रम (1980 ते 2015)

सामाजिक कामं -

- पालक विद्यापीठ – प्रमुख सल्लागार
- जीवनसाथ अभ्यास मंडळ – सल्लागार
- अक्षरनंदन शाळा – सल्लागार
- महाराष्ट्र पालक शिक्षक संघ – कार्याध्यक्ष
- डॉ. स्नेहल अशोक स्मृती न्यास – विश्वस्त
- हुजूरपागा नियामक मंडळ – सदस्य
- लेखन – वर्तमानपत्रांतून, नियतकालिकांतून सातत्यानी लेखन

## पुस्तकं

1. आपली मुलं (राज्य पुरस्कार प्राप्त)
2. गारांचा पाऊस (राज्य पुरस्कार प्राप्त)
3. मूल नावाचं सुंदर कोडं
4. दिवास्वप्न (अनुवाद)
5. दलित पुरुषांच्या आत्मचरित्रातील स्त्री प्रतिमा
6. बहुरूप गांधी (अनुवाद)
7. आनंदाच्या पाऊलवाटा
8. देणारं झाड (अनुवाद)
9. मांजरांची वरात (अनुवाद)
10. गंमत जत्रा
11. विश्व आपलं कुटुंब
12. स्त्रियांचे प्रश्न
13. खेळण्यांचा जादूगार - अरविंद गुप्ता
14. सिंह आणि चिंगुली लाल चिमणी (अनुवाद)
15. खट्याळ उंदीर (अनुवाद)
16. अमरपत्र (अनुवाद)
17. शहाणी मुलं छान मुलं (अनुवाद)
18. बियांचे प्राणी (अनुवाद)
19. अंगठ्याची चित्रं (अनुवाद)
20. बोलणारे दगड (अनुवाद)

## आगामी पुस्तकं

21. सारं काही मुलांसाठी
22. शिक्षण आणि शांती (अनुवाद)

**नाटक –** आम्ही घरचे राजे (थिएटर अकादमी)

अनेक लेख, कविता, आकाशवाणी आणि दूरदर्शनवर कार्यक्रमांचं लेखन आणि सादरीकरण



# प्रस्तावना – शोभा भागवत

आमचं 'जीवनसाथ विवाह अभ्यास मंडळ' 1997 मधे सुरू झालं. आमची दोन्ही मुलं तेव्हा लग्नाच्या वयाची होत होती. अनिलला तेव्हा असं सारखं वाटत होतं की, आपण दोघांशी लग्नाबद्दल सूत्रबद्ध बोलायला हवं, पण या वयातली मुलं कुठं आई-वडलांचं ऐकण्याच्या मनःस्थितीत असतात? त्यांच्या मित्र-मैत्रिणींचा गट जमवणं, त्यांच्या पालकांनाही बोलावणं आणि दर रविवारी 2-3 तास एकत्र चर्चा करणं ही कल्पना मात्र त्यांना आवडली, आणि आमच्या घरीच 'जीवनसाथ' सुरू झालं.

'जीवनसाथ' म्हणजे स्पष्ट विचारांची जीवनभराची साथ. खूप जणांना असं वाटतं की, अविवाहित मुला-मुलींसाठी हे गट चालवतात, म्हणजे हे वधूवरसूचक मंडळ आहे. पण असं लग्न जमवण्यासाठी मंडळ चालवण्यात आम्हा दोघांनाही रस नाही. अर्थात, मंडळाच्या निमित्तानी एवढ्या वर्षांत लग्नाचा अभ्यास करता करता परिचय होऊन बरीच लग्नं ठरली, झाली, टिकली आणि ती विचारपूर्वक झाली याचं आम्हाला समाधान वाटतं.

18 वर्षांच्या अनुभवानी आम्हाला असं वाटतं की, तरुण मुली लग्नाबद्दल खूप विचार करतात. कारण, त्यांना जाणीव असते की, लग्नानंतर पुरुषाचं आयुष्य फार बदलणार नाही, पण बाईचं सगळंच बदलून जातं. या उच्चशिक्षित मुली असं म्हणतात की, लग्न हे काही आयुष्यभराचं 'अल्टिमेटम' नाही हे आमच्या पिढीला कळलेलं आहे. त्याचप्रमाणे, एका व्यक्तीशी आयुष्यभर आपण जोडले जाणार, तर ती कशीतरी उरकून टाकायची पण गोष्ट नाही. लग्नानंतर आपलं आयुष्य घडूही शकतं किंवा बिघडूही शकतं. त्यामुळं स्वतः विचार करून स्वतःच निर्णय घ्यायचा.

ठराविक 'कांदापोहे' कार्यक्रमाचं स्वरूप बदललं आहे. तरीही अजून परिचयात मोकळेपणा नसतो. शिक्षण, पगार, घरदार, दिसणं या व्यावहारिक गोष्टींकडेच झुकतं माप असतं. माणूस म्हणून एकमेकांची ओळख होत नाही.

समोरच्या मुलाच्या किंवा मुलीच्या व्यक्तिमत्त्वाचा विकास किती झाला आहे ते कळत नाही.

एखाद्या जोडीत कुटुंबातल्या पार्श्वभूमीमुळे, वातावरणामुळे मनमोकळा संवाद असला, तरीही लग्नाच्या वेळी विचार नेमका कशाकशाचा करायचा याबाबतीत पालकांना काही कल्पना नसते. मुलांना वाटतं पालक काहीतरी सांगू शकतील. त्याचवेळी पालकांना वाटतं, आजकालच्या मुलांना सगळं माहिती असतं. शेवटी दोन निराळ्या पिढ्यांच्या त्या दोघांकडून मिळून आवश्यक असलेला स्पष्ट विचार कमी पडतो.

आज प्रत्येक व्यक्तीला स्वातंत्र्याचा ध्यास आहे. अशा वेळी वरवर भेटून, बोलून आयुष्यभराचा निर्णय कसा घ्यायचा? लग्न म्हणजे काय एक दिवसाचा सोहळा आहे का? ती आयुष्यभराची दोघांनी केलेली 'कमिटमेंट' आहे.

लग्नाच्या वयात घरून प्रचंड मानसिक दबाव असतो, असंही मुली सांगतात. त्यात घरात आई-वडलांचंच आयुष्य अत्यंत असमाधानी पाहिलेलं असलं, घरात आई-वडलांची एकमेकांना, मुलांना मारपीट पाहिलेली असली, तर लग्नाबद्दल प्रचंड साशंकता असते. अनेक कुटुंबांत दुर्दैवानी तरुण मुलांना मोकळेपणानी बोलता येत नाही. अनेकदा पालकांशी संवादच तुटलेला असतो.

याला उपाय म्हणून, आपल्या समाजात या मुला-मुलींसाठी काय सोयी उपलब्ध आहेत? वधू-वर सूचक मंडळं आहेत, ती पालकांना जेवढी आकर्षक वाटतात, तेवढी मुला-मुलींना वाटत नाहीत. मेळाव्याचा अनेकांनी धसका घेतलेला आहे. इंटरनेटचा आधार अनेकजण घेत आहेत, पण त्याची विश्वासार्हता अजून सिद्ध व्हायची आहे. फसवणाऱ्यांची खूप उदाहरणं ऐकू येतात.

इंटरनेटवर माहितीचा धबधबा असतो, पण त्यातली बरीचशी पाश्चात्त्य असते. स्वतःला उपयोगी असं फारच कमी सापडतं.

अशा वेळी परिचयोत्तर विवाह असा काही कुठे पर्याय आहे का, मैत्रीतून विवाह असा काही 'प्लॅटफॉर्म' आहे का, या शोधात तरुण आहेत. त्यामुळेच जिथे केवळ पैशांसाठी काम चालत नाही, पण जिथे समाजकार्य असाही आव नाही, जिथे कुणाचं दडपण विचारांवर नसेल आणि निर्णयासाठी दबाव नसेल,

जिथे तरुणांचा सन्मान जपला जाईल आणि मार्गदर्शन म्हणून उपदेशांचे डोस नसतील, अशा विवाह अभ्यास मंडळाच्या शोधात मुलं-मुली आहेत. ही गरज ओळखून 'जीवनसाथ'ची सुरुवात झाली.

'जीवनसाथ' सुरू केल्यापासून अनिलनी वैवाहिक जीवनात येणाऱ्या प्रश्नांची यादी करून अभ्यासाला सुरुवात केली. विवाहातल्या प्रश्नांचा अभ्यासक्रम तयार केला. त्याचं 'मॅनेजमेंट' या विषयाचं शिक्षणही आहे आणि व्यवसायही आहे. त्यातली तत्त्वं वैवाहिक जीवनात उपयोगी आहेत. आपण कसे आहोत हे कळणं आणि दुसऱ्याला पारखता येणं, यासाठी त्यानी व्यक्तिमत्त्वाच्या प्रकारांचा अभ्यास केला आहे. विवाहासाठी काय प्रकारची प्रगल्भता हवी हे शोधण्याचं त्याचं काम चालू आहे. त्याचं मानसशास्त्राच्या अंगानी 'वैवाहिक समुपदेशन' या विषयातलं डॉक्टरेटचं काम पूर्ण आहे. पीएच.डी. हातात मिळणं बाकी आहे. क्रिटिकल ॲनॅलिसिस या पद्धतीनी तो तरुण मुला-मुलींना आपले प्रश्न सोडवण्याचा आत्मविश्वास देतो आहे. अतिशय सातत्यानी 'ग्रुप काउन्सेलिंग' आणि 'इंडिव्हिज्युअल काउन्सेलिंग' करतो आहे. त्याची अभ्यासू वृत्ती, शिस्त, चिकाटी, तरुणांशी संवाद साधण्याचं कौशल्य, हे काम करण्यासाठी 'ट्रेनर्स' तयार करणं, हे सगळं पाहणं, त्यात मदत करणं हा माझ्या आनंदाचा भाग आहे.

'जीवनसाथ'मधे अविवाहित तरुण-तरुणी तर येतातच, पण नवविवाहित, मध्यमवयीन विवाहित जोडपी, घटस्फोटित व्यक्ती, अविवाहित राहण्याचा निर्णय घेतलेली मंडळीही येतात. त्यांच्यामधल्या विचारांच्या देवाण-घेवाणीचा सर्वांनाच उपयोग होतो. इथल्या काहींच्या प्रतिक्रिया बरंच काही सांगतात.

'जीवनसाथ'मधे येणारी कॉम्प्युटर इंजिनिअर मुलगी एकदा सांगत होती–

''माणसाच्या दिसण्यापेक्षा माणसाचं असणं महत्वाचं असतं, ते कसं पारखावं याचं सहज, सोप्या शब्दांत मार्गदर्शन तुम्ही करता, ते मला आवडलं. केवळ नवरा-बायको या नात्यातच नव्हे, तर इतरही नात्यांत प्रत्येकाला 'स्पेस' देऊन जे नातं जोपासलं तर ते अधिक सशक्त ठरतं, हे मला इथं कळलं. लग्न करायचं तर अफाट अपेक्षा ठेवून कसं चालेल? आपल्याला आयुष्यात काय चालणार नाही, पेलणार नाही, कोणाला नाही म्हटलं पाहिजे याबद्दलचे माझे विचार इथेच स्पष्ट झाले. लग्न या प्रक्रियेकडेच जाणीवपूर्वक पाहण्याचा मार्ग मला इथे सापडला.''

एक मध्यमवर्गीय घरातला खूप न शिकलेला मुलगा. तो सांगत होता –

''आमच्या घरात जे विषय उच्चारले सुद्धा जात नाहीत त्यावर इथे मोकळेपणानी बोलतात हे पाहून मी चक्रावूनच गेलो. मित्राच्या सांगण्यावरून मी इथे आलो आणि मला कळलं की, इथे केवळ लग्नाविषयी नाही, तर इतर खूप विषयांबद्दल चर्चा होते. आयुष्य स्वस्थ आणि समाधानी कसं होईल हे कळतं. 'ग्रुप डिस्कशन'मधे अनेक माणसांचे विचार कळतात. इतरांच्या प्रश्नांची कल्पना येते.''

मॅनेजमेंटचा अभ्यास करणाऱ्या अतिशय संवेदनक्षम मुलीला काही वेगळेच फायदे जाणवले. ''प्रश्नाच्या मुळापर्यंत जाणं आणि मूळ प्रश्नाचं उत्तर शोधणं यांचे संस्कार इथे माझ्यावर झाले. वास्तवाची जाण आली आणि अपेक्षांचा क्रम लावता आला. इथल्या 'प्रेझेंटेशनचा' मला माझ्या 'मॅनेजमेंट स्टडीज'मधे उपयोग झाला.'' दुसरी एकजण म्हणते, ''विवाहबाह्य संबंधांवरच्या चर्चा बैठक संपल्यावरही मनात ठसठसत राहिल्या. घटस्फोट होऊ नये यासाठी काय करावं, झालाच तर काय करावं, किती मुलं हवीत, संगोपन कसं करावं, आपलं मरण, जोडीदाराचं मरण, आप्तजनांचं मरण या अत्यंत अप्रिय अशा विषयांवरच्या चर्चांनी मनोधैर्य वाढलं. प्रत्येक बैठकीला येताना, आज काय नवीन शिकायला मिळेल अशी उत्सुकता असते.''

एक अतिशय गंभीर मुलगी आहे. तिनं अतिशय विचारपूर्वक लग्न केलं आहे. ती एकदा चर्चेत सांगत होती–

''लग्न म्हणजे तडजोड आणि ती बाईलाच करावी लागते. पण 'जीवनसाथ'मधे येऊन मुलांमधेही तडजोडीची जाणीव आणि इच्छा निर्माण होते. एकमेकांत खेळीमेळीचं वातावरण असण्यासाठी वैचारिक पातळी जुळणं आवश्यक आहे. विचार जुळले तर 'कम्फर्ट लेव्हल' वाढते. एकमेकांचे दोष स्वीकारणं सोपं जातं. प्रत्येक माणसात दोष असणारच, मतभेद असणारच, पण ते कमी कसे करायचे ते इथे आल्यावर उमगलं.''

''आम्ही दोघं लग्नापूर्वी एकमेकांशी करिअर, पैसे, मित्रमैत्रिणी, कुटुंब यांविषयी बोललो. आमचे बरेच विचार जुळत होते. यावेळी निर्णय घेताना आम्हाला अनिलदादांनी सांगितलेली 'क्रिटिकल ॲनॅलिसिस'ची पद्धत उपयोगी पडली. आता लग्न झाल्यावर हा विचार किती महत्त्वाचा होता, ते लक्षात येतं आहे.''

एक रोखठोक मुलगी सांगते, ''मी 'हेडस्ट्रॉंग' आहे. पटल्याशिवाय काही करणार नाही. मुलं बघताना मी खूप विचार करत होते. पण मुलगे 'टिपिकल

माइंडेड' असतात. मग नकार सुरू झाले. बाबांना त्याचा त्रास होऊ लागला. अजूनही मला जे हवंय ते मला सापडत नाही. जीवनसाथमधे लग्न जमलं तर मला आवडेल, पण इथे स्वतःला समजून घेण्याचा आणि इतरांना समजून घेण्याचा एक दृष्टिकोन मिळाला. तो मला उपयोगी पडतो आहे. सर्वांना मतं असतात. ती एकमेकांवर लादू नयेत, हे मी इथं शिकले. आपल्या समाजात मुलग्यांची मतं खूप पारंपरिक आहेत. माझ्यासारख्या मुलींना फार निराशा येते. अशा वेळी जीवनसाथचा मला खूप आधार वाटतो.''

आमच्या एक घटस्फोटित सभासद म्हणतात ते मला फार महत्त्वाचं वाटतं–

''सध्या विवाहसंस्थेला आलेलं बाजारी बजबजपुरीचं स्वरूप घातक आहे. नको त्या गोष्टी लग्नसंस्थेत घुसून मूळ मूल्यांनाच छेद देत, पार बोजवारा उडवत आहेत.

लग्नाच्या निमित्तानी एकूण मानवी सूक्ष्म, नाजूक, तरल नाती आणि भावभावना यांचा हळुवार गोफ गुंफला जात असतो. त्याचा नितांत सुंदर अभ्यास या मंडळात होतो. आजच्या नव्या विचारांनी कालचा मनस्ताप पुसता येतो, हे मला या अभ्यासाचं सामर्थ्य वाटतं.''

जीवनसाथमधे सातत्यानं गेली पाच वर्षं येणाऱ्या एक मध्यमवर्गीय पालक म्हणतात :

''लग्न ठरविताना पत्रिकेवर अनावश्यक भर असतो, पण मुलामुलींच्या गाठीभेटी, चर्चा जास्त आवश्यक असतात. दोन कुटुंबांच्या परिचयासाठी वेळ देणं आवश्यक असतं, ते होत नाही. जीवनसाथमधे येण्यापूर्वी माझी मतं पक्की नव्हती. 50-50 टक्के दोन्ही बाजू खऱ्या वाटायच्या. पण आता मी योग्य शब्दांत माझा मुद्दा पटवून देऊ शकते. पालकांनाही या अभ्यासाची गरज आहे. लग्नात पालकांचा पुढाकार नसावा. मुला-मुलींनीच पुढं जबाबदारी पेलायची असते. त्यामुळे मुलांचा पुढाकार आणि पालक फक्त सल्लागार असं व्हायला हवं. पालकांनी योग्य गोष्टींना प्रोत्साहन द्यावं, अयोग्य गोष्टी स्पष्ट, योग्य शब्दांत त्यांच्यासमोर मांडाव्यात, निर्णय मात्र मुलांचाच असावा.

जीवनसाथमधे नकारात्मक गोष्टींचा विचारही करण्याचं तंत्र कळलं. म्हातारपण, आजारपण, मृत्यू यांबद्दलचे विचार पक्के झाले; अनेक अंधश्रद्धा गेल्या, साधी राहणी उच्च विचारसरणी म्हणजे काय हे कळलं. सर्वांत महत्त्वाचं म्हणजे इथं

मुलांबरोबर पालकांनाही आपल्या वैवाहिक आयुष्यातल्या समस्या सोडवता येतात, याचा दिलासा वाटला. आमचंही आयुष्य 'जीवनसाथ'नी समृद्ध केलं.''

स्वतः अनेक प्रकारची प्रशिक्षणं देणारं आमचं एक अत्यंत उत्साही, कृतिशील सभासद जोडपं म्हणालं, ''वैचारिक देवाणघेवाण फार कमी ठिकाणी होते. इथलं पद्धतशीर विश्लेषण आम्हाला खूप गोष्टी शिकवतं. अनिलदादांचे खास खेळ गमतीबरोबर महत्त्वाचे संदेश सहज देतात. तुम्ही दोघं आधी भेटला असतात तर आम्हाला अधिक चांगले नवरा-बायको होता आलं असतं आणि अधिक चांगले पालकही.'' विशेषतः अनिलदादांचा पुरुषपालक म्हणून केलेला खास विचार आम्हाला महत्त्वाचा वाटतो. लग्न आणि मुलांना वाढवणं हे प्रत्येकाच्या जीवनातले महत्वाचे प्रकल्प; पण लोक त्यांच्याकडे पुरेशा गांभीर्यानी पाहात नाहीत. आज झट लग्न पट घटस्फोट ही पद्धत होऊ पाहते आहे. अशा वेळी अशी मंडळं समाजात काही नवं घडवत आहेत ही समाधानाची गोष्ट आहे.

तरुणपणी योग्य वयात जीवनसाथमधे नियमितपणे यायला सुरुवात केली तर फारच छान; पण समजा तसं नाही जमलं तर काय करायचं? ताण आधीच निर्माण झाले असले तर? मला वाटतं 'बेटर लेट दॅन नेव्हर.' मध्यमवयीन, वयस्कर असलं म्हणून काय झालं? दोघांची इच्छा असली तर ताण नक्की कमी करता येतील. घालवताही येतील कारण 'विवाहाचं बिघडलेलं यंत्र कुठच्याही अवस्थेत दुरुस्त करायचा प्रयत्न करता येतो. पालक म्हणून देखील आपल्या चुका झालेल्या असतात. त्यादेखील दुरुस्त करता येतात हे अनिलदादांनी फार छान सांगितलं.'

अनिल त्याच्या वैयक्तिक समुपदेशनाच्या कामातही खूप व्यस्त असतो. लोकांना केवढ्या प्रकारचे किती प्रश्न आहेत हे त्यामुळे कळतं. जेवढे करावेत तेवढे प्रयत्न कमीच पडतील इतकी आपल्या समाजाला समुपदेशनाची गरज आहे हे लक्षात येतं.

असं हे जीवनसाथचं काम, वातावरण आणि फलितं! यातला पुढाकार अनिलचा. माझी इतर कामं सांभाळून मी साथीला असते एवढंच. लोक रविवारच्या या कृतिसत्रांची वाट पाहात असतात याचं फार समाधान वाटतं.

आमची मुलं लहान होती तेव्हा आम्ही दोघांनी पालक-शिक्षणाचा अभ्यास केला. बऱ्याच पालकांपर्यंत तो पोहोचवला. ती वाढत असताना मला बालभवनच्या निमित्तानी चांगलं काम करता आलं. ती लग्नाची झाल्यावर अनिलनी विवाह-

अभ्यास पुढं नेला. आता आम्हाला तीन छोटी नातवंडं आहेत. लहान मुलांची काळजी घेण्याची अधिक चांगली सोय समाजात व्हावी यासाठी खूप काही करायचं आहे. त्या त्या वेळी आपल्या समाजातले जे प्रश्न जाणवतात त्यासाठी काम करणं, हे आम्हाला आमचं कर्तव्य वाटतं. इतरांच्या कामाशीही त्यामुळं भरपूर संपर्क असतो. त्या नेटवर्कचा खूप फायदा होतो.

आम्ही दोघं गेली अनेक वर्षं पुण्यातच राहतो. पुण्याचे गुण, दुर्गुण आम्हाला आपोआपच चिकटलेले असणार. अनिलचं सगळं काम जास्तीतजास्त पुण्यातलंच आहे. बरेच संदर्भ महाराष्ट्र, पुणं, कर्वेनगर, शनिवार पेठ या भोवतालचे आहेत हे खरं आहे. हे पुस्तक वाचताना तुम्ही जगाच्या कुठच्याही भागात असलात तरी त्यामुळे जागेचे संदर्भ बदलतील. अभ्यासाचे विषय मात्र तेच राहतील.

**– शोभा भागवत**

# याबद्दल अभ्यास मंडळात नेमकं काय चालतं

## या पुस्तकातल्या विषयांची थोडक्यात ओळख

मी भाषणं करण्याच्या विरुद्ध आहे कारण त्याचा काही उपयोग होत नाही, अशी माझी खात्री झाली आहे. त्यामुळे मी फक्त कार्यशाळाच घेतो. आत्तापर्यंत 500च्या वर ज्या कार्यशाळा घेतल्या त्याविषयी हे लिखाण आहे. यातला प्रत्येक लेख किंवा लेखाचा भाग म्हणजे एक कार्यशाळा आहे असं समजूया. पण त्या विषयाच्या अनेक कार्यशाळांचा गोषवारा इथे आहे. प्रत्यक्षातल्या कार्यशाळा अनौपचारिक आणि प्रश्नोत्तरं पद्धतीच्याच असतात; पण तो मजकूर त्याप्रकारे नाटकातल्या संवादांसारखा लिहायचा म्हणजे तो खूप पानांचा होतो. म्हणून ते मुद्दे सलग पद्धतीनी मांडले आहेत.

कार्यशाळांचा मुख्य सूत्रधार बहुतेक वेळा मी असतो. सूत्रसंचालनासाठी आणखी काही लोक तयार करण्याचं काम चालू आहे. सूत्रधारांनी आधी त्या विषयाचा माझ्याबरोबर अभ्यास करून मुद्दे लिहून तयार ठेवलेले असतात.

अगदी प्रथम माझी या सबंध कामामागची, कार्यशाळेमागची, पुस्तकामागची भूमिका स्पष्ट करतो. ही एक अनेक विषयांची कार्यशाळांची मोठी मालिका चालू आहे अशी कल्पना करून मी हे पुस्तक लिहिलंय. आपण सगळे एका मोठ्या खोलीत समोरासमोर बसलो आहोत आणि प्रत्येक विषयासंबंधी निरनिराळ्या लोकांची निरनिराळी मतं, शंका, गैरसमजुती आपण सगळे ऐकतो आहोत अशी कल्पना केली आहे. जीवनसाथमधला आत्तापर्यंतचा अभ्यास त्याबद्दल काय म्हणतो हे मी सांगतोय, अशी कल्पना मनात धरलीय.

मला कळायला लागल्यापासून गेली 59 वर्षं मी जे आसपासचं जग बघतोय, परदेशात, भारतभरात, महाराष्ट्रात जे अनुभवलंय ते मला आवडलेलं नाही. थोडक्यात, ज्या दिशेनी सबंध जगाचा, भारताचा प्रवास चाललाय ती दिशा मला योग्य वाटलेली नाही. कुठच्यातरी निराळ्या पद्धतीनी विचार केल्याशिवाय, मार्ग शोधल्याशिवाय मला धडगत दिसत नाही. ज्याला सध्याची परिस्थिती पसंत नसेल त्यानी ती परिस्थिती बदलण्यासाठी धडपड करावी, नाहीतर मुकाटपणी सहन करावं. मी मुकाटपणी सहन करणाऱ्यांपैकी नसल्यामुळे मी तशी धडपड केली, आयुष्यभर केली. त्या सगळ्या प्रयत्नांचा सारांश म्हणजे 'जीवनसाथ'. या अभ्यासाची सुरुवात विवाहाच्या अभ्यासानीच झाली. पुढे मात्र ती सबंध आयुष्याच्या अभ्यासाची संस्था बनली.

मी माझ्या आसपास बघितलं तर मला संतुलित लोकं सहज दिसतच नाहीत. उन्मत्त तरी दिसतात किंवा उदास लोक दिसतात. वागणारे मग्रूर तरी असतात किंवा केविलवाणे असतात.

प्रत्येक पर्वातल्या प्रत्येक काळात समाजाला विचार आणि भावना यांच्या समतोलाचीच गरज असते हे सगळ्यांना मान्य असतं. पण पुढे माझ्यासारख्या कोणी म्हटलं की, सध्याचा समाज भावनेच्या बाजूला पार झुकलेला आहे, त्यामुळे या समाजाला विचाराच्या दिशेनी समतोलापर्यंत खेचूया तर ते मात्र मान्य होत नाही. समाज भावनेच्या बाजूला अतिरिक्त प्रमाणात कशामुळे झुकला हे बघायला गेलं तर दोन गोष्टी स्पष्ट दिसतात.

एक म्हणजे प्रत्येक माणूस स्वतःच्या भविष्याची चिंता या एका भावनेमुळे हवालदिल आहे. वरवर बघितलं तर तो गाताना, नाचताना, हसताना एंजॉय करताना दिसेल. पण ते दृश्य फसवं आहे. माणूस आतून घोर काळजीत आहे. त्या चिंतेच्या भावनेच्या ओझ्यामुळे तो झुकलेला आहे.

दुसरं म्हणजे प्रसारमाध्यमांनी सर्वसामान्य माणसाची बुद्धी किंवा विचार करण्याची क्षमता क्षीण केली आणि त्याच वेळेला अतिशयोक्त भावनांचं भडक चित्रण करून त्याला भावनेच्या बाजूला आणखी ढकललं. ही दोन्ही कारणं जरी समजली तरी सत्य ते सत्यच आहे. समतोलापर्यंत त्याला पोहोचवण्यासाठी स्पष्ट विचारांचं बळ त्याला द्यायला हवं आहे. माझी त्याबद्दल खात्री झाली आहे. मला जर वाटलं असतं की, माणूस फार विचारांच्या दिशेनी झुकला आहे तर मी भावनांच्या दिशेनी त्याला खेचलं असतं कारण शेवटी समतोल हा उद्देश आहे.

या सगळ्या प्रयत्नात दोन मोठ्या अडचणी मात्र आहेत. विचाराच्या दिशेनी खेचणं म्हणजेच विवेकनिष्ठ विचारसरणीमधे खेचणाऱ्याला फार कष्ट आहेत कारण कोट्यवधी लोकांना खेचण्याचा तो लढा आहे.

दुसरी अडचण म्हणजे विवेकनिष्ठ विचाराच्या पुरस्कर्त्याला लोक कोरडा किंवा भावनाहीन, असंवेदनशील समजतात. ते खरं नाही हे त्याला स्वतःला माहिती असतं. पण लोकांची तशी गैरसमजूत, उघड किंवा पाठीमागे टीका सहन करावी लागते. थोडक्यात, या कारणांमुळे हा मार्ग लोकप्रिय होऊ शकत नाही.

मी आता 72 वर्षांचा आहे. शोभा 69ची आहे. हे सगळं पुस्तकात उतरवणं शक्य आहे तोपर्यंत लिहिलेलं बरं असं वाटल्यामुळे मी इथे दोन गोष्टींवर भर देऊन लिहायचं ठरवलं.

1. समाजाचं वैवाहिक आयुष्य, त्याखेरीजचं पालक म्हणून आयुष्य, त्यातले समाजाचे प्रश्न आणि त्यावर उपाय
2. शोभाच्या आणि माझ्या वैवाहिक सहजीवनाचं चरित्र. सहजीवनाचं चरित्र या शब्दाकडे मला लक्ष वेधायचं आहे कारण हे माझं किंवा शोभाचं व्यक्तिगत चरित्र नाही. पालकत्व हा तर आमच्या दोघांचा खास अभ्यासाचा विषय आहे.

या पुस्तकाबद्दलचा एक निर्णय पक्का केलाय तो असा. व्यवस्थापनशास्त्र, मानसशास्त्र, तत्त्वज्ञान या माझ्या अभ्यासातल्या तीनही विषयांत मूळच्या अभ्यासातच असे अनेक शब्द आहेत की, त्यांचं ओढूनताणून मराठी भाषांतर करण्याच्या फंदात न पडणं चांगलं. काही भाषांतरित शब्द सोपे, काही आधीच प्रचलित असलेले आहेत ते वापरले. बाकीचे खुशाल देवनागरी लिपीत इंग्लिश शब्द वापरायचे असं ठरवलं, कारण हे पुस्तक लोकांनी वाचावं, त्यांना ते सोपं जावं, त्यातल्या गोष्टी त्यांनी अमलात आणाव्यात ही इच्छा आहे. मग समजायला कठीण करून कसं चालेल? याबद्दलचे सोपे-कठीण वगैरेचे निर्णय मीच वाचकांबद्दलच्या माझ्या अंदाजानी घेतले आहेत. त्या माझ्या अंदाजात काही चूक आढळली तर नंतर ती जरूर दुरुस्त करीन.

आणखी एक निर्णय घेतला. हे पुस्तक वाचणाऱ्यांपैकी कॉम्प्युटर वाचणाऱ्यांचं

प्रमाण जास्त असेल असं मला वाटतंय. त्यामुळे जीवनसाथच्या वेबसाईटवरून हे सबंध पुस्तक बघता येईल, छापता येईल अशी व्यवस्था करणार आहे. ज्यांना कागदावर छापलेली अक्षरंच सोयीची वाटतात त्यांच्यासाठी छापील पुस्तकाचीही सोय असणार आहे. छापील पुस्तक बहुधा आधी निघेल.

मी स्वतः व्यवस्थापनशास्त्र शिकलेलो असल्यामुळे आणि गेल्या अनेक वर्षांमधे तो विषय शिकवल्यामुळे विषयाचे भाग पाडण्याची मला सवय लागली आहे. वाचणाऱ्यांना ते सोयीचं जाईल याबद्दल माझी खात्री आहे.

एक प्रश्न सगळ्यांना पडेल त्याचं आधीच स्पष्टीकरण करतो. आपलं म्हणणं थोडक्यात मांडावं अशी शिफारस मी अनेक वेळा ठिकठिकाणी केली आहे, तर मग जीवनसाथ म्हणजेच जीवनभर स्पष्ट विचारांची साथ हा विषय समजावून सांगताना एवढी थोरली पानं आणि बारा पुस्तकं कशासाठी लिहिली? याचं उत्तर असं आहे. 18 वर्षं एवढ्या निरनिराळ्या लोकांशी बोलताना एक गोष्ट लक्षात आलेली आहे. कुठच्या शब्दांत कुठच्या पद्धतीनी कुठच्या वेळेला कोणाला मुद्दा समजेल याला कुठचाही नियम नाही. तो संवाद साधण्याची तीव्र इच्छा असल्यामुळे माहिती असलेले सगळे मार्ग वापरायचे, असं मी ठरवलं. त्यामुळे मजकूर वाढला.

किती बारकाव्यात शिरायचं, किती सविस्तर सांगायचं याबद्दल माझा विचार तळ्यात-मळ्यात होता.

बराच विचार केल्यावर या कार्यशाळेत म्हणजेच या पुस्तकसंचात सविस्तर सांगायचं हा निर्णय एकदम पक्का झाला.

ही कार्यशाळा घेताना, हा मजकूर लिहिताना मला अनेक भूमिकांच्यात शिरावं लागणार आहे. दोन मुख्य भूमिका म्हणजे समुपदेशक आणि ज्येष्ठ अभ्यासू मित्र. पुन्हा या दोन भूमिकांमधून बोललेल्या, लिहिलेल्या मजकुराची सरमिसळ होणार हेही निश्चित आहे. कधी मित्र म्हणून गमतीगमतीत माझ्या अनुभवामधली एखादी गोष्ट सांगितलेली असेल, तर कधी माझा समुपदेशनातला गंभीर अभ्यास त्यात डोकावेल.

समुपदेशन या सबंध विषयाविषयी खूप गैरसमजुती आहेत. वेड लागलेल्या माणसाला वेड्यांच्या हॉस्पिटलमधे ठेवतात ही गोष्ट सगळ्या भारतीयांच्या मनावर थेट कोरलेली आहे. समुपदेशकाकडे देखील वेड लागलेली माणसंच जातात

असा त्यांचा विश्वास असतो. त्यामुळे समुपदेशकाकडे जायचा विषय निघाला की, 'वेड लागलंय का?' हा प्रश्न लोकांच्या मनात असतो. ज्याला समुपदेशन म्हणजे काय हे समजलं त्याचा बरोब्बर उलटा प्रश्न असतो, 'इतका त्रास होतोय तरी अजून तू समुपदेशकाकडे गेला नाहीस? असा वेडेपणा करू नकोस.'

समुपदेशन या विषयाच्या अंतरंगाच्या पसाऱ्याची लोकांना कल्पना नसते. जीवनसाथमधे 60 विषयांची यादी आम्ही वापरतो. त्यांच्यापैकी त्या कार्यशाळेसाठी विषय निवडण्याचं काम सभासदच करतात आणि दर महिन्याच्या पहिल्या रविवारी एक एक विषय गटचर्चेसाठी ठेवतात. लोकांना पडलेला प्रश्न असा असतो की, आयुष्यात एवढ्या साठ विषयांचा संबंध खरोखर येतो का? माझ्या दृष्टीनी हो. माझ्या 72 वर्षांत माझा तर त्यातल्या प्रत्येक विषयाचा संबंध आला बाबा!

आणखी एक प्रश्न अनेकांच्या मनात असतो. प्रत्येक व्यक्तीचा स्वभाव निराळा असतो. प्रत्येकाचा प्रश्न स्वतंत्र आणि खासच असतो. घडणाऱ्या घटनाही निराळ्याच आणि खास असतात. चांगल्या घटना आणि वाईट घटना दोन्ही त्या त्या व्यक्तीलाच फक्त तपशीलातल्या बारकाव्यासकट माहीत असू शकतात. मग निराळीच कुठचीतरी त्रयस्थ व्यक्ती तो प्रश्न कसा सोडवू शकेल? याचं खरं उत्तर असं आहे की, जगाची लोकसंख्या कितीही असली तरी व्यक्तिमत्त्वाचे प्रकार मोजकेच असतात. चांगल्या आणि वाईट घटनांचेही मोजकेच प्रकार असतात. समस्यांचंही तसंच असतं. या तीनही प्रकारांची सांगड कशी घालायची हे समुपदेशकाला माहिती असतं. तेवढी दिशा त्यांनी दाखवली की, प्रश्न सुटण्याच्या दिशेनी एक एक पाऊल पडायला लागतं. समुपदेशनार्थींनी अभ्यास मात्र मनापासून करावा लागतो. अगदी कॉलेजमधे असताना जसा विषय, त्यातले मुद्दे, त्यांचा क्रम, त्यांची प्रश्नोत्तरं, त्याबद्दल चर्चा, पडताळणी, लिखाण असतं तसं सगळं करावं लागतं.

मी व्यवस्थापनशास्त्र अमेरिकेत शिकलो ते बांधकामापुरतं. त्या ज्ञानाचं भारतीयीकरण केल्याशिवाय त्याचा इथे उपयोग नाही, हे मला पदोपदी जाणवलं. तेवढं केल्यावर मात्र व्यवसायात त्याचा खूप फायदा झाला. माझ्या आणि शोभाच्या वैवाहिक आयुष्यासाठी, कुटुंबासाठी उपयोगी असं त्यात फारसं नव्हतं. ते कसं शोधायचं याबद्दल माझ्या सुप्त मनात सतत विचार चालू होता. मी त्या माझ्या प्रयत्नांना 'रिलेशन्स मॅनेजमेंट' असं म्हणायचो. या नावाची काही लोक

टिंगल करायचे. ते म्हणायचे, ‘जी रिलेशन्स मॅनेज करावी लागतात त्यांच्यात अर्थच काय?’ खरं असंय, मला शोभाशी, मुलांशी, जावई-सुनेशी बोलताना देखील कुठच्या शब्दांत, केव्हा, कसं याचा विचार करावा लागतो. ती ‘मॅनेजमेंट’च आहे आणि त्यात वाईट काहीच नाही. अशी नाती सांभाळतानाच तर व्यक्तिमत्त्वाचा खरा विकास होतो.

पुढे अनेक वर्षांनी वैवाहिक समुपदेशन या विषयात पीएच.डी. करायची ठरवून मी मानसशास्त्राच्या मार्गानी गेलो. मानसशास्त्रामधे समोर आलेली ‘थिअरी’ प्रचंड होती. काही गोष्टींचा खोलवर अभ्यास आणि बाकीच्यांचा तुलनेनी वरवर अभ्यास असं ठरवावंच लागलं. मी पूर्वी शिकलेल्या व्यवस्थापनशास्त्रातल्या अनेक मुद्द्यांचा निराळा अर्थ मला दिसायला लागला. त्यामुळे पीएच.डी. ‘थीसिस’ लिहिताना मानसशास्त्र आणि व्यवस्थापनशास्त्र या दोन्हींचा उपयोग विवाहानंतरच्या आयुष्याला कसा करता येईल याच्या मागे मी लागलो. त्यावेळेला सारखं मनात यायला लागलं की, सगळ्या शास्त्रांच्या, ज्ञानाच्या मुळाशी तत्त्वज्ञान आहे. त्यामुळे तत्त्वज्ञानाचा अभ्यास केला पाहिजे. थीसिसमधे ते शक्य नव्हतं. कारण ठरलेल्या वेळेत आणि पृष्ठसंख्येत ते बसलं नसतं. त्या थीसिसमधे मी माझ्या स्वतःच्या काही कल्पना मांडल्या. गंमत म्हणजे त्यावर जो रिपोर्ट लिहून आला त्यात संशोधन करणाऱ्यानी मी स्वतःची कल्पना मांडली त्याबद्दल टीका केली होती. स्वतःचं डोकं चालवणं याला ‘ॲकॅडमिशियन्स’च्या जगात वाईट समजतात हे मला त्यावेळी थप्पड खाल्ल्यासारखं कळलं. मी तर ‘सेल्फ मेड’ आणि ‘अप्लाइड’ प्रकारचा माणूस आहे. मी त्याला मान झुकवली नाही. माझ्या दृष्टिकोनातून आत्तापर्यंत थोर लेखकांनी, संशोधकांनी म्हटलं तेच मानत राहणं, बोलत, शिकवत राहणं, यापेक्षा स्वतःचा विचार मांडणं जास्त चांगलं आहे.

त्यामुळे मी साधारण सहा-सात वर्षांपूर्वी ‘विवाहाचं आणि पालकत्वातलं तत्त्वज्ञान’ या विषयाच्या मागे लागलो. मला हवं ते कुठे सापडेना. तत्त्वज्ञानाच्या प्राध्यापकांशी बोललो. ‘वैवाहिक आयुष्याचं तत्त्वज्ञान’ असा स्वतंत्र अभ्यास झालेला नाही असं कळलं. मग मीच त्या गोष्टी वाचून, माझ्या पद्धतीनी मांडायच्या ठरवल्या. मी ‘हार्डकोअर फिलॉसॉफी शिकवणारा ॲकॅडेमिशियन’ नसल्यामुळे मी जे या पुस्तकात मांडलंय ते तत्त्वज्ञानातल्या विद्वान, अनुभवी लोकांच्या दृष्टिकोनातून अर्धवट आणि निराळंच किंवा विक्षिप्त असू शकेल; पण

आता मी थांबायला तयार नाही. मी मांडतो ते उपयोगी आहे याबद्दल मला शंका नाही, कारण मी ते अनेक वेळा बोलून, मांडून बघितलंय. तरी मी यामधे केव्हाही कुठच्याही दुरुस्तीला तयार आहे ना! मी स्वतः कुठे कमी पडतो याचा माझा शोध अखंड चालूच आहे. तेव्हाच तर माझ्या वागणुकीत दुरुस्ती होईल. या पुस्तकात मी नवरा म्हणून आणि बाप कसा कसा बदलत गेलो त्याचीच कहाणी आहे म्हटलं तरी चालेल.

स्वतःला स्वतःबद्दल नीट कळणं ही फार महत्त्वाची गोष्ट आहे. कारण स्वतःच्या शोधाची प्रक्रिया समजली की, इतरांना समजणंही सोपं जातं. ते जमलं की बऱ्याच बाबतींतले छुपे/उघड संघर्ष संपतात, निदान कमी होतात आणि शेवटी माणूस मनःशांतीपर्यंत पोहोचण्याची शक्यता हळूहळू वाढत जाते.

प्रत्यक्ष अनुभवानंतर माझी खात्री झालीय की, लोकांना समजणं हाच काहीही समजावून सांगण्याचा मुख्य उद्देश आहे. तीच सांगणाऱ्याची खरी परीक्षादेखील आहे. त्या दोन्हींच्या वापराचं म्हणजे थिअरी आणि प्रॅक्टिसविषयी बोलण्याचं माझ्या दृष्टीनी प्रमाण थिअरी एक वाक्य, तर प्रॅक्टिसविषयी 100 वाक्यं असं आहे.

मला वाटणारी अगदी मुळातली गोष्ट प्रथम सांगतो. शब्दशः काहीही म्हणजे अगदी काहीही कोणीही करत असलं, तरी त्याचा हेतू दोन शब्दांत वर्णन करता येतो. 'समाधान मिळवण्यासाठी'. इतरांच्या दृष्टीनी ते कृत्य चांगलं, वाईट, 'ग्रेट' कसंही असो, तो माणूस ती गोष्ट स्वतः समाधान मिळवण्यासाठीच करत असतो. लहानपणीचा स्वतःचा खेळ, अभ्यास, धांगडधिंगाही स्वतःला आनंद मिळवण्यासाठीच असतो आणि तरुणांचे वात्रट चाळे, प्रेमप्रकरणं, चांगल्या शिक्षणासाठी केलेली धडपड, करिअरसाठी केलेले प्रयत्नही स्वतःला आनंद मिळवण्यासाठीच असतात. आई-वडलांवर असलेलं प्रेम, आदर, भांडणंही त्यासाठीच आणि अधिक पुढच्या वयातला लग्नाबद्दलचा निर्णयही स्वतःच्या समाधानासाठीच असतो. लग्न न करण्याचा निर्णय असो, अमुक एका व्यक्तीशी लग्न करण्याची कृती असो, शेवटी हेतू एकच. स्वतःच्या मनाविरुद्ध आईवडलांचं मन सांभाळण्याचा निर्णयही शेवटी त्यांचं मन सांभाळण्यामुळे स्वतःला मिळणाऱ्या समाधानासाठीच असतो. समाजासाठी निरपेक्षपणी काहीतरी करू हाही निर्णय स्वतःच्या समाधानासाठीच असतो. इतरांचा फायदा हे त्याचं 'बाय प्रॉडक्ट' असतं. जीवनसाथमधल्या प्रत्येक कार्यशाळेनंतर मला वाटतं की इतरांचा त्यामुळे किती

फायदा झाला हे त्यांनी ठरवावं. माझा मात्र सर्वात जास्त फायदा होतो. त्या कार्यशाळेसाठी जास्त जास्त अभ्यास माझा होत राहतो.

थोडक्यात, हा सगळा माझा प्रयत्न समाजाच्या जगण्याचा दर्जा सुधारण्यासाठी म्हणजेच 'क्वालिटी लाईफ'साठी आहे. जीवनसाथचं सगळं काम 'प्रिव्हेंटिव्ह' काउन्सेलिंगवर भर देणारं आहे. पण आपल्या समाजात 'क्युरेटिव्ह' कामच जास्त लोकप्रिय आहे आणि मानसिक अस्वास्थ्याच्या बाबतीत काहीच न करता नुसतं सोसणं त्याहून लोकप्रिय आहे. त्याच्याहीपेक्षा वरच्या नंबरवर लोकप्रियतेच्या शिखरावर जोडीदाराला किंवा मुलांना छळणं आहे. त्याबद्दलचं हे प्रबोधनाचं काम आहे.

लोकांचे अनेक प्रश्न असतात. त्या प्रश्नाचं मूळ शोधायला गेलं तर त्याची मुळं त्यांच्या लहानपणाच्या वाढीत सापडतात. लहानपणी त्यांची वाढ चुकीच्या पद्धतीनी झालेली असते. म्हणजेच पालकांची वागण्यात चूक झालेली असते. त्या पालकांच्या वागण्यातल्या चुकीची कारणं शोधली तर ती त्यांच्या सह-जीवनात सापडतात.

माझा दृष्टिकोन कायम विवेकनिष्ठ बुद्धिवाद्याचा आहे. बुद्धी शब्दावरून आमच्याकडे नेहमी गंमत चालते. मी कुठलाच धर्म मानत नाही, हे सगळ्या जीवनसाथींना माहिती आहे. माझ्या विवेकवादाला ते 'बुद्धिझम' म्हणतात. तो गमतीचा भाग तात्पुरता सोडला तरी एक गोष्ट नक्की. विवेकनिष्ठ विचारांनी सहजीवनाकडे, पालकत्वाकडे बघता आलं तरच उपाय सापडेल. म्हणून सहजीवनाबद्दल काहीतरी करता येतं का बघूया. त्यासाठी या पुस्तकसंचाचा महाप्रपंच. प्रत्येक लेख प्रत्येक प्रकरण लिहीत असताना माझा व्यक्तिमत्त्व विकास सततच होत राहतो.

महत्त्वाची गोष्ट अशी आहे की, माणसाला कुठचाही प्रश्न असो, त्यावरच्या उपायाला सुरुवात झाली किंवा केली तरी स्वस्थ वाटतं.



# व्यक्तिमत्त्व विकासाचा खरा अर्थ



# पुरुष पालकांचं शिक्षण

## जीवनसाथ

### जीवनभर स्पष्ट विचारांची साथ म्हणजेच जीवनसाथ

## अनुक्रम

### पुस्तक क्र. 3

# 1

# संवादकला

## 1) संवादामागचं तत्वज्ञान

मी तुम्हाला पूर्वीच म्हटलं होतं की, विवाह-अभ्यास हा विषय इतका मोठा आहे की त्यामधे काही काही मुद्दे अनेक ठिकाणी पुन्हा येणार. कारण त्यांचा तिथेही संबंध आहे आणि इथेही संबंध आहे. उदा. हा मुद्दा. आपल्या शरीराची जशी गरज असते की आपल्याला खावं-प्यावं लागतंच, त्याचं पचन करावं लागतं आणि ते मलमूत्रावाटे बाहेरही टाकत राहावं लागतं. यातली एक जरी क्रिया थांबली तरी आपल्याला गंभीर आजार होतो. तात्पुरती थांबली तरी औषधपाणी करावं लागतं.

मनाचं अगदी तसंच आहे. आपल्याला बघून, वाचून किंवा ऐकून ज्ञान मिळवावं लागतं. इथे शाळा-कॉलेजमधला अभ्यास असा ज्ञानाचा अर्थ नाही. कशाचीही आपल्याला माहिती झाली की ते ज्ञान. अमुक खेळ कसा खेळतात, अमुक गावची लोकं आपल्याला आवडणारी द्राक्षं पिकवतात. जगात या या गावी जगातली सर्वांत उंच इमारत बांधली, स्वयंपाकातला हा पदार्थ असा करतात, यांतली प्रत्येक गोष्ट कळणं म्हणजे ज्ञान.

पुढे त्या मिळालेल्या ज्ञानाबद्दल आपण विचार करतो. आपल्या आत्तापर्यंतच्या अनुभवाशी ते मिळालेलं ज्ञान ताडून बघतो. त्यावर विचार करतो. काहीतरी नवा निर्णय घेतो किंवा एखादी गोष्ट करायची नाही ठरवतो. मोठे झालो की आपल्याला कोण व्हायचंय याची महत्त्वाकांक्षा मनात निर्माण होते. ही सगळी क्रिया म्हणजे चिंतन.

त्यानंतर आपण ‘तुला माहितीय का,’ म्हणून कोणाशी तरी ते बोलतो. त्यातलं आपल्याला काय आवडलं, काय नाही पटलं ते बोलतो. बोलायला कोणी नसेल तर पत्रात तो मजकूर लिहितो. स्वयंपाकात एखादा पदार्थ करून बघतो. वाचनालयातून एखादं पुस्तक खास वाचण्यासाठी बदलून आणतो. ही म्हणजे अभिव्यक्ती ऊर्फ संवाद.

महत्त्वाचा मुद्दा यातला हाच आहे की, शरीराच्या तीन क्रियांसारखंच ज्ञानग्रहण, चिंतन आणि संवाद यांपैकी एक क्रिया जरी थांबली, बिघडली तरी आपल्याला अस्वस्थ वाटतं. तात्पुरता मानसिक आजार निर्माण होतो नि उपाय नाही केला तर मोठा मानसिक आजारही होऊ शकतो. मग समुपदेशन, मानसोपचार वगैरे सुरू होतं.

विचारवंतांनी असं म्हटलेलं आहे की, जवळजवळ सगळ्या दुःखाचं कारण अगदी साधं असतं. ‘लोक नको तेव्हा नको ते बोलतात आणि हवं तेव्हा योग्य ते बोलत नाहीत.’ संवादकला ही एकूण कठीणच गोष्ट आहे.



*शरीराच्या तीन क्रियांसारखंच ज्ञानग्रहण, चिंतन आणि संवाद यांपैकी एक क्रिया जरी थांबली, बिघडली तरी आपल्याला अस्वस्थ वाटतं. तात्पुरता मानसिक आजार निर्माण होतो नि उपाय नाही केला तर मोठा मानसिक आजारही होऊ शकतो. मग समुपदेशन, मानसोपचार वगैरे सुरू होतं. विचारवंतांनी असं म्हटलेलं आहे की, जवळजवळ सगळ्या दुःखाचं कारण अगदी साधं असतं. ‘लोक नको तेव्हा नको ते बोलतात आणि हवं तेव्हा योग्य ते बोलत नाहीत.’*

## 2) मानसशास्त्रातला एक महत्त्वाचा प्रयोग

मानसशास्त्रातल्या एका महत्वाच्या प्रयोगाविषयी मला तुमच्याशी बोलायचं आहे. मुद्दामहून 100 लोकांवर हा प्रयोग केला. प्रश्नोत्तरांचा, गप्पांच्या स्वरूपातला अगदी सोप्या प्रश्नोत्तरांच्या स्वरूपाचा हा प्रयोग होता. स्वतःविषयीची, कुटुंबाविषयीची माहिती, काय आवडतं ते सांगा वगैरे सोपे प्रश्न मुद्दामहून योजले होते. कुठल्याही प्रकारचा ताण नको, उत्तरं देणाऱ्याला आरामात बसून उत्तरं देता यावीत अशी रचना होती. 100 लोकांपैकी 50 लोकांना निराळी व्यवस्था आणि उरलेल्या 50 लोकांना निराळी व्यवस्था होती. लोक निवडताना तरुण ते मध्यमवयीन, तब्येतीचे प्रश्न नसलेले सुदृढ लोक आणि त्यांतही निम्मे पुरुष आणि निम्म्या स्त्रिया.

शेजारीशेजारी दोन बंद खोल्या होत्या. आरामशीर बसण्याची व्यवस्था. एकेकाला आडनावाच्या अग्रक्रमाप्रमाणे बोलावणार हे आधी सांगितलं होतं. त्यामुळे ज्यांची आडनावं एम्पर्यंत होती त्यांना आधी आणि बाकीच्यांना बऱ्याच वेळानंतर ठराविक वेळेला बोलावलं होतं. यामुळे न्याय-अन्यायाची भावना मनात येऊ नये अशी काळजी घेतली होती. दोन खोल्यांच्यात दोन टेपरेकॉर्डर ठेवले होते. त्याच्यावर प्रश्न टेप केलेले होते आणि तो टेपरेकॉर्डर उघड टेबलावर प्रश्न विचारताना दिसत होता. प्रतिसाद द्यायची त्यात सोय नव्हती.

दुसऱ्या खोलीतल्या टेबलावर उघड दिसणारा टेप रेकार्डर नव्हता. त्याऐवजी एक पडदा होता आणि पडद्यामागे टेप रेकॉर्डर ठेवून त्या रेकॉर्डरवर मधून मधून एक व्यक्ती प्रतिसाद देतेय असं वाटावं असे आवाज रेकॉर्ड केलेले होते. 'हं,' 'अच्छा', 'बरं बरं' एवढेच साधे प्रतिसाद मधेमधे होते. थोडक्यात एका खोलीत यंत्राबरोबरचं संभाषण उघड केलं होतं आणि दुसऱ्या खोलीत पडद्यामागे कोणीतरी व्यक्ती असल्याचा आभास निर्माण केला होता. या प्रयोगात अगदी स्पष्ट झालं की, यंत्राशी बोलणारी लोकं थोडक्यात नि मोजकं बोलत होती. पडद्यामागे कोणीतरी व्यक्ती आहे अशा कल्पनेनी दुसऱ्या खोलीतली लोकं जास्त वेळ, मनापासून आणि सविस्तर बोलत होती. प्रयोगाचा निष्कर्ष अगदी साधा होता. प्रतिसादावर समोरच्या माणसाचा संवाद किती मनापासून, किती, कसा हे सगळं अवलंबून असतं.

●

## 3) चांगला संवाद म्हणजे काय?

चांगला प्रतिसाद मिळाला तर संवाद चांगला होतो, पण प्रथम कोणीतरी सुरुवात तर करावी लागते. त्याची सुरुवात स्वतः करायची, हा निर्णय पक्का झाला की सोपं जातं.

संवाद करणं, साधणं, याला संवादकलाच म्हणतात. माध्यम काहीही असो, प्रत्यक्ष भेट, व्यासपीठावरचं भाषण, टी.व्ही. सीरियल, नाटक, सिनेमा, काहीही असलं तरी त्याचा नियम अगदी साधा आहे. चांगला संवाद म्हणजे, 'खरं, स्पष्ट, थोडक्यात, गोड आणि वेळेवर'. आपण काय बोलू ते खरं पाहिजे. विशेषतः व्यक्तिगत संवादाला या पाचही गोष्टी संपूर्ण लागू आहेत. ते खरं नसलं, तर तात्पुरतं खरं वाटेल, पण पितळ लवकरच उघडं पडेल. किती खरं आणि ते कसं बोलायचं ते याच कार्यशाळेत, याच लेखात आपण बघणार आहोत.

आपण बोलू ते स्पष्ट हवं. कित्येक लोकं नेमकी काय सांगतायत हे बराच वेळ कळतच नाही आणि त्यानंतर ऐकणाऱ्याचा रस संपलेला असतो. आपले विचार स्पष्ट नसले की बरेच वेळा असं होतं. त्यामुळे पहिला पाठ स्पष्ट विचारांचाच असतो, असं म्हटलं तरी चालेल.

सर्वसाधारण समजूत अशी आहे की, स्पष्टवक्त्या माणसाचे इतरांशी खटके उडतात, संबंध तुटतात. प्रत्यक्षात स्पष्ट, खरं, पण कसं बोलायचं याची कला साधलेली असली तर हा प्रश्न जवळजवळ मिटतोच. तरीही एखादा माणूस यातली कुठचीच गोष्ट न समजणारा असू शकतो. अशा माणसाशी संबंध तुटले तरी एवढं बिघडत नाही. एखाद्या समजदार माणसाशी गैरसमजुतीमुळे संबंध तुटलेच तर ते तात्पुरते असतात कारण अशा माणसाशी पुन्हा संवाद साधणं शक्य असतं.

काही लोक थोडक्यात काही सांगूच शकत नाहीत. पाल्हाळ हा शब्द त्यांच्यासाठी अगदी चपखल आहे. फार सविस्तर मुद्दा सोडून बोलत बसलेल्या माणसाचाही संवाद केव्हातरी दुतर्फीचा एकतर्फी होतो. कारण दुसरा ऐकत नसतो. काही माणसांना तीच गोष्ट पुन्हा पुन्हा सांगायची असते. बोलताना ते तोच मुद्दा पुन्हा मांडतात. त्याच पद्धतीनी, त्याच सुरात आणि त्याच शब्दांत बोलतात.

माझ्या ओळखीच्या एका गृहस्थांना तर एवढं सगळं बोलण्याची सवय आहेच, शिवाय ते निघताना सगळ्या मुद्द्यांची पुन्हा उजळणी करतात. बरेच मुद्दे असले तर ते सांगून संपेपर्यंत पहिले मुद्दे विसरण्याची त्यांना शंका वाटायला लागते. मग ते, ते मुद्दे आणखी एकदा सांगतात.

गोड ही गोष्ट पण महत्त्वाचीच आहे कारण दुसऱ्याला बोलताना दुखावलं तर तो त्यापुढचं ऐकत नाही कारण तो अपमानाच्या भावनेत गुंतलेला असतो. सर्वांत चांगली गोष्ट म्हणजे दुसऱ्याची जी अडचण आपल्याला माहिती असेल त्याचा उल्लेख करून त्याची आपल्याला कल्पना आहे असं म्हणूनच बोलायला सुरुवात करावी. मी स्वतः गोड माणूस मुळात नाही आणि शिवाय आग्रही असल्यामुळे माझा मुद्दा दुसऱ्याला ऐकण्याइतका गोड वाटण्यासाठी मला खूप कष्ट घ्यावे लागतात.

आणि या चारही गोष्टी वेळेवर सांगितल्या तरच उपयोग आहे. आत्ता नको, या वेळी नको, त्यानंतरही नको असं करत काही माणसं एखाद्या गोष्टीबद्दलचा संवाद पुढे ढकलत राहतात. मनात असलेली गोष्ट न सांगण्याचं हळूहळू ओझं वाटायला लागतं, आणखी जेव्हा केव्हा सांगण्याची संधी मिळते तेव्हा संवादाचं सुख म्हणजे काय ते कळतं.



*चांगला संवाद म्हणजे, 'खरं, स्पष्ट, थोडक्यात, गोड आणि वेळेवर'.*

## 4) आयुष्याभरातल्या सगळया नात्यांचे फक्त 3 गट

1) आपल्या ओळखीची अनेक माणसं असतात. त्यांचे 3 गट असतात. पहिला गट खूप जवळच्यांचा. अशी संख्या अगदी कमी असते. किती गुपितं एकमेकांना माहीत आहेत, यावरून ते नातं ठरतं. पुन्हा असं नातं एकतर्फी असलं तर त्याचा उपयोग नाही, दोन्ही माणसांना एकमेकांविषयी तेवढी जवळीक वाटत असली तरच ते या गटात मोजता येतं. निव्वळ जवळचं रक्ताचं नातं असलं तरी त्यावरून ते ठरत नाही. उदाहरणार्थ, मोठी मुलं आणि त्यांचे म्हातारे आईवडील, सख्खी भावंडं यांचं नातं तेवढं जवळचं असेलच असं सांगता येत नाही. अगदी नवराबायकोसुद्धा या व्याख्येत बसतीलच असं नाही. या गोष्टी, विशेषतः इतक्या जवळच्या नात्यांबद्दल कोणाशीच बोलता येत नाहीत. भौगोलिक अंतर कमी का जास्त यावरूनही त्या ठरत नाहीत. उदाहरणार्थ शेजारी. थेट चार इंची भिंतीपलीकडचे असतात, पण मनानी जवळचे असतीलच असं नाही सांगता येत.

याउलट जगाच्या दुसऱ्या टोकाला असलेला एखादा मित्र, मैत्रीण, बहीण-भाऊ, मुलं मनानी जास्त जवळचे असतात. अलीकडे मुलं परदेशी असण्याचं प्रमाण खूप वाढलंय्. परदेशातलं प्रत्येक मूल तेवढंच जवळचं असेल असं नाही. अंतर, खर्च, दिवसाच्या निराळ्या वेळा यांमुळे संपर्कही हळूहळू कमी होत जातो.

ही जवळीक म्हणजे नेमकं काय याचं थोडं स्पष्टीकरण आवश्यक आहे. भौगोलिक अंतर काही असो, एकमेकांच्यातला संवाद किती याला महत्व आहे. खूप अंतर असलं तर 10-15 दिवसांनी फोनवर संभाषण आणिक मधूनमधून ई-मेल म्हणजे वारंवारचा पुरेसा संवाद समजायचा. त्याच गावात व्यक्ती असली तर एक-दोन दिवसाआड फोन, प्रत्यक्ष गाठ म्हणजे चांगला संवाद. त्याशिवाय एकमेकांच्यातल्या संवादात सुख-दुःख मोकळेपणानी सांगितलं जाणं आवश्यक. त्यातही दुःख सांगणं म्हणजे जास्त जवळीक. निव्वळ एकतर्फी दुःख व्यक्त केलं तर जवळीक म्हणता येत नाही. समुपदेशक, सल्लागारापाशी दुःख व्यक्त होतं, पण ते दुतर्फी नसतं.

त्यामुळे या व्याख्येत ते बसत नाही. अशा माणसांची संख्या अगदी कमी असते हे आपण बोललो. कमी म्हणजे किती ते सांगतो. दोन माणसं एकमेकांच्या अगदी जवळची असणं अशांची संख्या सबंध आयुष्यात पाचच्या वर नसते. ऐकल्या-ऐकल्या हे पटणार नाही. त्यासाठी याचं आणखी चिंतन करावं लागेल.

2) दुसरा गट हितचिंतकांचा. असेही संख्येनी बऱ्यापैकी असतात. असे लोक की, ज्यांना तुमच्याविषयी आदर, कौतुक आहे, पण ते पहिल्या गटात नसतात. अशी माणसं दुतर्फी आदर, कौतुक वाटणारीही असू शकतात. चांगली ओळख, मधूनमधून कुठच्यातरी कार्यक्रमाला भेटणारी असतात. पण पहिल्या गटात ही माणसं नसतात.

3) तिसरा गट व्याख्या करायला फार सोपा आहे. यांचा निव्वळ परिचय असतो. नाव, चेहरा माहीत असतो. खूपच कमी वेळा गाठ पडते. अर्थात अशांची संख्या खूप असते. या तीनही गटातल्या लोकांशी आपला संवाद असतो. तो कुठल्या पातळीचा, कसा असतो, हे कळण्याचा एक खेळ आहे. याच पुस्तकात विवाह अभ्यास मंडळ चालवण्याचं शिक्षण आणि खेळ या प्रकरणात तो सविस्तर दिलेला आहे.



## 5) जोडीदाराबरोबरचा किंवा जवळच्या व्यक्तीबरोबरचा संवाद

मगाशी आपण बोललो त्याप्रमाणे स्वतःहून बोलायचं का नाही बोलायचं यापैकी बोलायचं असा निर्णय झाला तर त्या संवादाविषयी थोडं सांगतो.

इतर सर्व नात्यांपेक्षा नवरा-बायको हे निराळं, खास नातं आहे. नवरा-बायकोमधला मोकळा जवळिकीचा संवाद ही सर्वांत महत्त्वाची गोष्ट आहे. त्याच्या खालोखाल आपल्या मुलांशी आणि आईवडलांशी मोकळा संवाद ही शिकण्याची गोष्ट आहे. आणि मग अर्थात मित्रमंडळी, सहकारी यांच्याशी चांगला संवाद पाहिजे. नसला तर तो अभ्यास करून बारकाव्यानी शिकून घ्यायला पाहिजे. त्याविषयी चार गोष्टी सांगणं हाच तर या लेखाचा उद्देश आहे.

समजा संवाद अजिबात जमत नसेल तर, कागदावर गोष्टी लिहून काढा. कागदावर विचार, भावना लिहून निदान विचारात स्पष्टपणा येतो. एकतर्फी का होईना, संवाद होतो. पुस्तकं तुमच्याशी संवाद साधतात तोही एकतर्फीच असेल. टेपरेकॉर्डरशीही बोलता येईल. तरी एकतर्फीच. निर्मनुष्य ठिकाणी हवेत बोलताही येईल. या एकतर्फी संवादांपेक्षा कुठल्यातरी व्यक्तीशी बोलणं केव्हाही सरस.

कित्येक लोकांना मैत्रीच्या वेगाची समज नसते असं माझं निरीक्षण आहे. या पुस्तकात 'प्रथम दर्शनी प्रेम' या लेखात प्रथम दर्शन, द्वितीय दर्शन आणि तृतीय दर्शन या संकल्पनेविषयी सविस्तर लिहिलंय. ही तीनही दर्शनं झाल्याशिवाय माणसांचा संवाद पुरा झाला असं म्हणता येत नाही आणि त्यामुळे मैत्रीही खरी झालेली नसतेच. प्रेमिकांची लग्नापूर्वी ज्या वेगानी मैत्री झाली असं त्यांना वाटतं ते तर नव्याण्णव वेळा चुकीचं असतं.

जीवनसाथमधे लग्नापूर्वी मला भेटायला येणारे मुलगामुलगी बरेच असतात. त्यांनी एकमेकांची किती दर्शनं घेतलीयत् हे बघावं या दृष्टीनी मी काही गोष्टी विचारतो. बहुतेक वेळा आढळतं की, त्यांच्यात पुरेसा संवाद झालेला नसतो. मैत्रीचा तर प्रश्नच येत नाही. लग्नानंतर नवरा-बायकोचा संवाद बदलतो. आधी ते प्रेमिक किंवा अनोळखी असतात. लग्नानंतर कायदेशीर बंधनात अडकतात. संवादाचं स्वरूप जबाबदारीचं, आपुलकीचं, हक्क गाजवण्याचं, आकर्षणाचं, काही चुकीच्या घटना घडल्या असल्या तर नाइलाजाचं, तिरस्काराचं, रागाचं,

घृणेचं कसंही असू शकतं. नवरा-बायको दोघांचा संवाद नीट जुळायला साधारण पंचवीस वर्षं सहज लागतात असं सर्वेक्षणात आढळलेलं आहे. त्यालाच मुरलेला विवाहही म्हणतात.

अबोला, रुसवा ही पूर्णपणे निराळी गोष्ट आहे. ते विसंवादाचंच रूप आहे, पण वरवर तो असंवाद वाटतो. मॅच्युअर माणसाला ते शोभत नाही. परिपक्वता याचाच अर्थ मुद्दा विरोधी असला तरी तो योग्य पद्धतीनी सांगता येणं. नवराबायकोंमधे अमुक अडचणीचं तू काय करशील, असा प्रश्न जोडीदारानी काळजीनी, आपुलकीनी विचारलेला असला आणि त्याला उत्तर 'मी बघीन' किंवा 'मी ठरवीन काय करायचं ते', असं आलं की त्याला असंवाद म्हणता येईल. पण ते विसंवादाचं मूळ होऊ शकतं, त्यामुळे चूकच आहे.

कधीकधी जोडीपैकी एकाचं काम दुसऱ्यामुळे अडलेलं असतं. दुसरा त्याच्या परीनी प्रयत्न करीत असतो. पण ते काम पुरं व्हायला अजून अवधी असतो. पहिला अस्वस्थतेनी विचारतो की अजून किती वेळ लागेल? त्यावर उत्तर येतं, 'त्याचीच तयारी चाललीय, दिसत नाही का?' अशा उत्तराची खरं म्हणजे काही जरूर नसते. जरूर फक्त आपणहून उलगड्याची असते. पण उलगडा आणि तोही आपणहून, याचं महत्व न कळल्यानी अनेक जोडपी उगीचच एकमेकांची मनं दुखावतात.

न बोलण्यानी कधीकधी उद्देश साध्य होतो. नवराबायकोंच्यात तर कितीतरी वेळा काहीतरी बारीकशी गोष्ट नवऱ्याच्या किंवा बायकोच्या हातून राहिलेली असते. त्यावरून काहीतरी बोलण्यापेक्षा न बोलणं जास्त परिणामकारक असतं. 'ही वस्तू इथं कशाला ठेवली?', 'फरशीवर डाग पडलाय, कोणी पाडला?', 'त्या खोलीतले दिवे कशाला चालू ठेवलेयत्?' असलं काहीतरी बोलण्यापेक्षा स्वतः ते काम काही न बोलता करून टाकणं जास्त सोपं आहे.

शेवटी आपल्याला काय साधायचं आहे हे नवरा-बायकोला समजायला हवं. दुसऱ्याला सुधारणं हा उद्देश नवराबायकोनी कधीही मनात ठेवू नये. काम करून टाकल्यानी जोडीदार सोकावेल, बिघडेल ही कल्पना चुकीची आहे. चार-पाच वेळा असं झालं की, जोडीदाराला निश्चित वाटेल की आपण लक्षात ठेवून या गोष्टी वेळेवर करायला हव्यात. हा न बोलण्याच्या अर्थपूर्ण संवादाचा प्रयोग करून तर बघा!

माझ्या आणि शोभाच्यातला एक प्रसंग सांगतो, शोभानी एका संस्थेची

ट्रस्टीशिप घ्यायची ठरवली. मी तेव्हाही तिला सांगत होतो की, या भानगडीत पडू नकोस, मुळात तुला फार कामं असतात. तिनी ती जबाबदारी तरीही स्वीकारली. त्यानंतर मी मुख्य कोणती गोष्ट केली असेल तर टी.एम्.एस्.एच्. (तरी मी सांगत होतो) म्हणालो नाही. म्हणजेच निर्संवाद. (हा प्रचलित शब्द नाहीय, मला माहितीय्) त्यामुळे स्वतः अनुभव घेऊन शोभानी ती संस्था सोडायचा निर्णय घेतला. मी भुणभुण म्हणजे अतिसंवाद केला असता तर निराळंच काहीतरी झालं असतं.



## 6) संवादातल्या चुकांची उदाहरणं

वाईट गोष्ट अशी आहे की अनेक लोक 'संवाद नकोच' आणि पुढे 'कोणाशीच नको' या निर्णयापर्यंत पोचतात. त्यांच्या दृष्टीनी या लेखातला यापुढचा सगळा मजकूर निरुपयोगी आहे. पण अर्थात तो त्या त्या माणसाचा निर्णय आहे. असा निर्णय घेण्यापूर्वी हा लेख वाचावा, अशी विनंती आहे.

आपण कोणाशी बोलतो आहोत त्यावरही बऱ्याच गोष्टी अवलंबून असतात. आपल्यापेक्षा श्रीमंत, यशस्वी, प्रसिद्ध, सुंदर, भव्य, हुशार, सामाजिक ताकदीच्या व्यक्तीशी वागताना आपल्या वागणुकीत आपोआपच फरक होतो. बोलण्यात आदर व्यक्त होणं, अदबीनी बोलणं, सांभाळून बोलणं इतपत समजण्याजोगं आहे, पण काही लोक अजीजीनी जवळजवळ मुजराच करतात. ते चमत्कारिक आणि कृत्रिम वाटतं.

काही लोक बरोबरीच्यांशी वरवर मोकळेपणानी वागण्याचा आव आणतात. पण मनात स्पर्धा, हेवा, कावा असे विचार आणि भावना असतात. माणसाच्या मनात काय चाललं असेल हाच माझा अभ्यासाचा विषय असल्यामुळे वर्तमानपत्रात जेव्हा मी दोन विरोधी राजकीय पक्षांचे नेते हास्यविनोदात रमलेले असल्याचा फोटो बघतो तेव्हा मला त्या दृश्याचं हसूच येतं. तेच नेते निवडणुकीच्या पूर्वी होतात त्या प्रचारसभांमधे एकमेकांवर कशी चिखलफेक करतात ते आपल्याला माहीतच आहे. संपूर्ण राजकारण म्हणजे तर आयुष्यभर जनतेला फसवण्याचा संवाद असतो. (प्रत्येक विधानाला काही अपवाद असतात तसे माझ्याही ओळखीचे काही अपवादात्मक लोक आहेत.)

राजकारणात नसलेली सामान्य माणसंही त्यांचं अनुकरण करत खोटं वागत, खोटं हसत, खोटं बोलत आयुष्यभर हिंडताना दिसतात. बरोबरीचे दोन सहकारी एकमेकांशी हसून-खेळून बोलतात, पण मागे राजकारणी कावेबाज डावपेच आखतात. सामाजिक संस्थेत तेच, मोठी मोठी कामं करणाऱ्या एन. जी.ओ. मधे तेच. कसली मैत्री, कसलं खेळीमेळीचं वातावरण आणि कसला संवाद! भारतातली सर्वांत लोकप्रिय संवादाची पद्धत म्हणजे खरं वाटेल असं खोटं आत्मविश्वासानी स्टेजवरून जाहीरपणे बोलणं. पूर्ण खरी गोष्ट या देशात

चालत नाही.

अशा लोकांच्यात काही खूप अतिशयोक्त स्तुती करणारे असतात. चांगल्या संवादात अतिशयोक्त विधानं ही आपण टाळण्याची गोष्ट आहे. समोरचा माणूस अतिशयोक्त स्तुती, प्रशंसा करत असला तर आपल्या मनातला पहिला विचार असतो तो म्हणजे त्या व्यक्तीचा हेतू काय असेल याबद्दल. अगदी स्वाभाविकपणी आपल्याला स्वार्थी उद्देशाची शंका येते. मागे एकजण मला व्यवस्थापन क्षेत्रातली 'विभूती' म्हणाला. पुढे लक्षात आलं की त्याला त्याच्या प्रॉपर्टीचं व्हॅल्यूएशन करून घ्यायचं होतं नि ते फुकट हवं होतं. दुसरी एक मुलगी मला 'ग्रेट' म्हणाली. तिच्या मनात काही स्वार्थी हेतू नव्हता असं वाटलं. खरं काय ते पुढे कळणार असेल. दुसरी एक मुलगी दर वेळेला भेटली की खूप स्तुती करते. आता पुढे काय करते, बघायचं. मी आणि शोभा ही गोष्ट कायम सांभाळतो. आम्ही अनेकांचं कौतुक करतो, पण अतिशयोक्ती टाळतो.

काही लोकांच्या मनात सोशल स्टेटस ऊर्फ सामाजिक दर्जा हाच मुख्य विषय असतो. सहकाऱ्यांच्या बाबतीत ते खालच्या पदावरच्या माणसाशी 'खालच्या' पद्धतीनीच वागतात. शिपाई, कारकून वगैरेंशी वागताना सरळसरळ तुच्छतेनी वागतात. घरच्या कामवाल्यांशी तर सरळ कधीच बोलत नाहीत. हाही संवादाचा प्रकार आहे, पण माझ्या मते अगदी चुकीचा आहे.

मी ज्या बँकेत नेहमी जातो त्या बँकेतल्या एक बाई माझ्या चांगल्या ओळखीच्या आहेत. बँकेबाहेरही आमची गाठ पडते. त्या बाई बँकेबाहेर माझ्याशी समानतेनी वागतात, पण बँकेच्या खुर्चीवर बसल्या की त्या एकदम निराळी व्यक्ती असल्यासारख्या वागतात. गंभीर चेहेरा करतात. आमची एवढी ओळख असताना माझ्याकडे 'फोटो आय.डी.' मागतात. त्यांच्यासमोर मी बँकेत गेल्यावर बघून हसतसुद्धा नाहीत. बँकेच्या खुर्चीवर बसल्या की त्या एकदम स्वतःला श्रेष्ठ समजतात बहुतेक.

मी स्वतः फार मोठा माणूस नाही, स्वतःला मोठा समजतही नाही. शोभा आणि मी दोघंही स्वतःला सामान्यच समजतो, पण इतर अनेकांपेक्षा आमची कामावरची निष्ठा, मेहनत जास्त असल्यामुळे आम्ही काही मर्यादेपर्यंत सामाजिक प्रतिष्ठेच्या स्थानावर आहोत. आम्ही कायम सगळ्यांशी चांगले, सभ्यपणे वागतो त्याचा काहींना अर्थ समजत नाही. एक ओळखीच्या बाई इतर अनेक लोकांचं फोनवरचं बोलणं ऐकून कोणी फोन केला असताना त्यांनी उचलला तर 'बोला'

असं म्हणतात. त्यांचं संस्थेतलं पद लक्षात आलं की लोक म्हणायला लागतात की, त्यांना बोलायचं कळत नाही. दुसरे एकजण सोसायटीचे वॉचमन आहेत. मला अनेक वेळा भेटतात. मी त्यांची चौकशी करतो. त्यांची अशी खोड आहे की, ते कोणाला भेटले की शेकहँडसाठी हात पुढे करतात. त्यांनाही वागायचं समजत नाही. ते फार बरोबरी करायला जातात असं लोक म्हणतात.

एखाद्या निरक्षर माणसानी सुशिक्षित माणसाला काहीतरी लिहायला सांगणं आपण समजू शकतो. पण मला अशी कारकुनाच्या पदावरची माणसं माहिती आहेत की ज्यांना खरोखरच वागायचं समजत नाही. त्यांनी आपल्या बॉसला काय असेल ती गोष्ट स्वतः लिहून द्यायला हवी. प्रत्यक्षात ते फोन नंबर, एखादी वेळ, ठिकाण, पत्ता असं काहीतरी बॉसला सांगतात आणि म्हणतात, 'घ्या लिहून.'

काही माणसं उदाहरण देताना एक मोठी चूक करतात. ते वाईट गोष्टीचं उदाहरण देताना समोरच्या माणसाचं नाव वापरतात. काही चांगलं बोलायचं असलं तर समोरच्याचं नाव वापरायला हरकत नाही. सर्वांत चांगली सोपी गोष्ट म्हणजे 'एखाद्याचं' असं म्हणावं. नाव वापरण्याची गरजच नसते.

काही लोक 'इंग्रजाळलेले' असतात ते नुसतं गुड मॉर्निंग, गुड आफ्टरनून वगैरे म्हणतात. माझं आणि इंग्लिशचं भांडण काहीच नाही. मी तर प्रत्यक्ष इंग्रजी संभाषणाचे वर्गच चालवतो, पण दोन मराठी माणसं एकमेकांना 'गुड मॉर्निंग' म्हणतायत हे मला योग्य वाटत नाही. हे पाश्चात्यीकरण आहे आणि त्याला माझा वैयक्तिक तात्विक विरोध आहे. इंग्लंड, अमेरिका, कॅनडा या देशांत आम्ही या गुड मॉर्निंगचं अगदी वाईट, कृत्रिम आणि निरर्थक रूप अनुभवलेलं आहे. तिथे लोक जाता-येता दिवसभर हे सगळे उपचार पाळत एकमेकांना 'ग्रीट' करतात, पण एकमेकांकडे बघतही नाहीत. इतके ते उपचार निरर्थक झालेले आहेत.

आमच्या ओळखीचे एक गृहस्थ परवडत नाही सांगून मोबाईल फोन घेत नाहीत आणि त्यामुळे न कळवता अकस्मात येतात. त्यांना हे कळत नाही की, अनेकांची ते गैरसोय करतात त्यामुळे लोक नावं ठेवतात. शेवटी त्याचा संवादावर म्हणजे नात्यांवरच परिणाम होतो. काही लोकांना बोलताना मधूनमधून 'त्च' असा आवाज करण्याची सवय असते. त्याचा अर्थ असा होतो की, 'एवढं कसं तुम्हाला समजत नाही.'

मी माझ्या समुपदेशनाच्या कामात आणि लिखाणात, वाचनात खरं म्हणजे खूप गर्क असतो. मला समुपदेशनासाठी वेळ असतो. पण वाया घालवायला

अजिबात वेळ नसतो. मी ठरलेल्या वेळेला खात्रीशीरपणी हजर असतो. समुपदेशनाला येणारे लोक वेळ पाळत नाहीतच आणि उशिरा येऊन त्याबद्दल माफीदेखील मागू शकत नाहीत. त्यांना माझा वेळ गेल्याबद्दल अजिबात पर्वा नसते असं वाटतं. पर्वा असली तरी ती व्यक्त करायला हवी ना!

दिलगिरी प्रदर्शित करण्याच्या बाबतीतली काही काही दृश्यं, काही वाक्यं मला नेहमी आठवतात. शक्यतोवर चूक कबूल करायची नाही. अगदी खिंडीत कोणी पकडलं तर 'तूच शहाणी. मला काही अक्कल नाही, झालं?' असं म्हणायचं. नाकासमोर हात आपटून माफ करा म्हणणं, हे काय आहे?

आणखी एका गोष्टीची मला आणि शोभाला फार मजा वाटते. बाहेरगावी सहलीला गेलेलं असताना चांगल्या पन्नाशीच्या, मोठी मुलं असणाऱ्या बाईला नवऱ्याचा फोन येतो आणि ती बाई फोनवरचं बोलणं संपवताना 'लव्ह यू' म्हणून फोनचा मुका घेते. त्या नवरा-बायकोमधे एवढं प्रेम असेलही. पण मग त्या प्रकारे बोलण्याची त्यांना जरूर नाही. इतरांसमोरच्या प्रदर्शनाची तर अजिबात गरज नाही. दुसरी शक्यता म्हणजे दाखवतात तेवढं प्रेम नसेल. कोण जाणे. बघताना हा विचार डोक्यात येतो खरा.

या सगळ्या संवादांच्या प्रसंगांऐवजी, प्रकारांऐवजी लोक भेटवस्तू देणं जास्त पसंत करतात. दुकानातून वस्तू घ्यायची नि द्यायची किंवा पाठवायची की झाला संवाद. माझा या पद्धतीला आणि पुष्पगुच्छाच्या संवादाला व्यक्तिगत विरोधच आहे. स्वतः हातांनी पिकवून किंवा बनवून वस्तू दिली तरच अपवाद करता येतो. पण ते आपला समाज विसरलाच आहे.

काही अगदी साधी पथ्यं आहेत. खरं म्हणजे सगळ्यांना ती माहिती असतात. मी फक्त आठवण करून देण्याचं काम करतोय. इतरांबद्दल वाईट बोलू नये हे काही मी नवीन सांगायला नको. योग्य पद्धतीनी त्या माणसांच्या तोंडावर बोलता आलं तर फार छान. पण इतरांशी एखाद्याविषयी वाईटसाईट बोललं तर त्याला गॉसिप किंवा कुचाळक्याच म्हणतात. अशी एखादी गोष्ट नवराबायको एकमेकांत बोलले तर ती गुण-अवगुणाविषयीची चर्चा होते नाही तर कुचाळक्या. जोडीदाराशी बोलताना देखील 'अमुक व्यक्तीचं हे वागणं मला चांगलं वाटतं किंवा खटकतं. तुला त्याबद्दल काय वाटतं?' इतकं संयत हवं. नाहीतर ती देखील कुचाळकीच.

काही लोकांना बोलण्याचं कळत नाही. त्यांच्या मनात वाईट हेतू नसतो,

हेही ऐकणाऱ्याला माहीत असतं. पण या माणसाला बोलायचं कळत नाही असं म्हणून लोक ते सोडून देतात, पण बहुतेक वेळा. बहुतेक वेळा म्हणायचं कारण कधीकधी अशा बोलण्याचा अपमानही वाटू शकतो हेही खरंच आहे.

एकदा एकानी इकडून तिकडे जाताना खोलीतल्या खोलीत पाठीला खाज आली म्हणून कपाटाच्या कडेवर घासून पाठ खाजवली. त्याचा मित्र त्याला म्हणाला, 'तुला अशी पाठ खाजवताना बघून रेड्याची आठवण येते.'

एकदा एक मुलगी पाहुणे आले तर म्हणाली, "शी! तुम्ही केव्हा आलात?" आणि ते जाताना म्हणाली, "वा, तुम्ही निघालात वाटतं!" ही मुलगी एरवी अतिशय सरळ, चांगल्या स्वभावाची आहे. म्हणून त्या पाहुण्यांनी मनावर घेतलं नाही फारसं. हे ऐकल्यावर निदान आपल्या हातून असं काही घडू नये असं वाटतं. नाही का?

काही वर्षांपूर्वी मी पैशाच्या मोठ्या अडचणीत असतानाचं एक उदाहरण सांगतो, एका गृहस्थांकडे मला माझ्या कामासाठी वारंवार जावं लागायचं. तिथे गेल्यावर थोडं खाणं-पिणं ही गोष्ट नैसर्गिक होती. कुठच्यातरी बोलण्यात मी कसा पैशाच्या अडचणीत सापडलो आहे याचा उल्लेख संदर्भानी आला. पुढच्या वेळेला त्यांच्याकडे जाण्याची वेळ ठरवताना ते म्हणाले, "जेवायलाच थांबा. तेवढेच तुमचे एका जेवणाचे पैसे वाचतील." हा माणूस सज्जन होता, खरं आणि स्पष्ट बोलत होता, पण हे बोलणं मला दुखावणारं आहे हे त्याला समजत नव्हतं.

माझ्या मुलीकडे म्हणजे आभाकडे एक अनोळखी गृहस्थ काहीतरी दुसऱ्याच निमित्तानी पाच मिनिटांसाठी आले होते. त्यांची आधीची काहीही ओळख नव्हती आणि पुन्हा गाठ पडण्याची काही शक्यता नव्हती. आभाची मुलं दोघंही उंच आणि बारीक आहेत हे खरं आहे, पण ते तेवढ्या पाच मिनिटांत काहीतरी मुलं बारीक असल्यासंबंधी तिरकं बोलून गेले, 'यांनी नीट खायला पाहिजे' का असंच काहीतरी.

काही माणसं काहीतरी विषय चालू असताना गैरसमजूत झाली तर दुसऱ्याला लगेच त्यापायी वेड्यात काढतात. एवढं कसं समजत नाही? अशा अर्थाचं काहीतरी बोलून दुसऱ्याला दुखावतात. ही तर अगदी टाळण्याची गोष्ट आहे. जरा वेळ गप्प बसावं ना, पण ते त्यांना कळत नाही.

माझ्या मित्रांपैकी एकाला काहीतरी सांगायचं आणि टाळी मागण्याची खोड

आहे. एकदा-दोनदा टाळी दिल्यावर खरं म्हणजे टाळ्यांचा कंटाळाच येतो. इतर मित्र हळूहळू टाळी देईनासे होतात. जमेल तेव्हा तिथून सटकतात. दुसरा एकजण शेजारी उभा राहून कोपरानी मधूनमधून सारखा दंडावर ढुशी देतो. एकजण काहीतरी सांगतो आणि 'काय म्हणालो मी सांग?' असं विचारतो. मग समोरच्यानी त्याला तो काय म्हणाला ते सांगायचं. पुन्हा जरा वेळानी तेच. दुसरी एक शोभाची नि माझी मैत्रीण आहे. ती काही सांगायला लागली की असं होतं, शिवाय हे होतं, करत करंगळी मरंगळी करत सारखी हाताची बोटं दुमडून मोजते.

या लोकांना समजत नाही की, संवाद तोडण्याचे हे सगळे मार्ग आहेत. कागदावरचा चुकीचा शब्द खोडरबरानी किंवा पेन, व्हाइटनर वापरून खोडता येतो. पण चुकीच्या संवादाचं खोडरबर फार महाग असतं नि तो विसंवादाचा परिणाम खोडायला प्रचंड वेळ लागतो. कधी कधी काही वर्षं पण लागतात.

आमचा एक प्रतिभावंत, हुशार मित्र आहे. सारखा हसतो. त्याच्या ज्ञानाबद्दल अचंबा वाटतो, आदर वाटतो, पण 'फोकस' नाही. कुठून कुठे भरकटत बोलत सुटेल सांगता येत नाही. या वर्णनाची माणसं हल्ली फार दिसतात. ते भलतंच काहीतरी बोलत बसतात. त्यात खूप वेळ गेला की मुद्द्याचं बोलायला वेळच पुरत नाही. महत्वाच्या कामाविषयी बोलायचं राहून जातं किंवा त्रोटकपणे उरकावं लागतं.

संवादाची नेमकी दिशा नसणारे अनेक लोक मला माहीत आहेत. याला एक उपाय व्यवस्थापनशास्त्रात सांगितलेला आहे. कायम मुद्दे लिहून काढायचे. कागद समोर घेऊनच बोलायचं. हळूहळू मुद्देसूद बोलण्याची सवय लागते. दुसरा एक अत्यंत हुशार, कर्तबगार आणि मनानी चांगला, सज्जन मित्र आहे. त्याच्यात एकच मोठा दोष आहे. तो त्याच्या कामाबद्दल न थांबता बोलतच सुटतो. दुसऱ्याला काहीही विचारत नाही आणि मधे बोलायला संधीही देत नाही. प्रत्यक्षात व्यवस्थापनशास्त्रात चांगल्या संवादाचं मुख्य सूत्र 'हजर असलेल्या सगळ्यांना बोलण्याची संधी द्यावी' असं आहे. प्रत्येकाला स्वतःविषयी बोलायला आवडतं हे मुख्य मर्म आमच्या त्या मित्राला कळलेलंच नाहीय.

मला असं आढळलंय की ज्यांना कमी ऐकू येतं ते लोक बोलत सुटतात. त्यांनी खरं म्हणजे सरळ सांगावं की आपल्याला ऐकू येण्याचा प्रश्न आहे किंवा यंत्र वापरावं. यातलं काहीच केलं नाही तर लोक त्यांना टाळायला लागतात.

संवाद चालू असताना वागणुकीची काही साधी पथ्यं आहेत. ती सगळ्यांना

माहिती असतात, तीही आठवण करून देण्यासाठीच इथे सांगतोय. त्यांना इंग्लिशमधे मॅनर्स असं म्हणतात. हेही सगळ्या मध्यमवर्गीय सुशिक्षितांना माहिती असतं. कधीकधी परक्यासमोर हे मॅनर्स पाळले जातात. पण जवळच्या व्यक्तीसमोर, विशेषतः नवरा-बायकोंमधे पाळले जात नाहीत. माझ्या मते ते कायम पाळायला हवेत. त्यांची यादी तशी पाहिली तर छोटी आहे.

दुसरी व्यक्ती समोर बसली असताना जांभई द्यावी लागली तर विश्वदर्शन घडवण्याऐवजी तोंडावर हात धरावा. जांभई देत असताना बोलू नये. दुसऱ्या व्यक्तीसमोर नाकात बोटं घालू नयेत. काहीतरी खात असताना बोलू नये, त्यामुळे बोलणं कळत नाही. त्याखेरीज ठसका लागू शकतो, तोंडातले अन्नकण बाहेर उडू शकतात ते निराळंच. असं वागणारी लोकं वाईट नसतात, त्यांना फक्त वागायचं कळत नाही.

आमच्या ओळखीच्या अशा खूप व्यक्ती आहेत की ज्यांना फोनवर थोडक्यात बोलताच येत नाही. त्या एकट्या पडलेल्या असतात आणि बोलायला कोणीतरी हवं असतं, हे आपण समजू शकतो. असे लोक माझ्याही ओळखीचे आहेत आणि शोभाच्या ओळखीचेही आहेत. एरवी स्त्री-पुरुषांच्यात काही फरक असतो असं मला वाटत नाही, पण या बाबतीत बहुधा स्त्रियांची संख्या जास्त असावी. निदान शोभाच्या मैत्रिणींची संख्या तरी खूप आहे. आमच्या ओळखीत अशाही व्यक्ती आहेत की त्या आपल्याला काहीही माहीत नसलेले संदर्भ देऊन काहीतरी सांगतात. उदाहरणार्थ, 'आमच्या मीनामावशीचं असंच आहे,' असं ती व्यक्ती म्हणाली आणि आपल्याला मीनामावशी कोण हे माहितीच नसलं तर आपल्याला तो उल्लेख अस्थानी आणि विनोदीच वाटणार.

आणखी एका प्रकारचा संवाद शोभाला आणि मला आवडत नाही, कारण तो बुद्धीला पटत नाही. नुसते कुणाकडून तरी फॉरवर्ड केलेले मोबाईलवरचे मेसेज आणि ईमेल्स. स्वतः त्या माणसानी स्वतः काही लिहिलं तर आम्हाला जास्त कौतुक आहे. अशा 'फॉरवर्ड' केलेल्या एस्.एम्.एस. आणि ईमेल्सपैकी पाच टक्के चांगले असू शकतात. बाकीचा कचरा असतो. छापील शुभेच्छापत्रंही आम्हाला निरर्थक संवाद वाटतो. दुकानात सर्व प्रकारची कार्डं छापून तयार मिळतातच, पण त्यात व्यक्तिगत संवाद होतच नाही.

मोठी म्हणजे मध्यमवयीन माणसं लहान मुलांशी चुकीच्या प्रकारे संवाद साधतात, असं शोभाला आणि मला दोघांनाही वाटतं. एकदम अनोळखी मुलाला

लोक उचलून घेतात, बिचारं मूल कावरंबावरं होतं किंवा रडतं. मुलाची चुकीची चेष्टा करतात. आमच्याकडे आमच्याबरोबर येतोस का, असं विचारतात. हे सगळं निरर्थक आणि चुकीचं असतं. मूल त्याच्या इच्छेनी आपल्याजवळ येऊन काही बोलेल तोपर्यंत मोठ्या माणसानी हसतमुखानी त्याच्याकडे मधूनमधून बघावं. एकटकही बघू नये. जेव्हा ते मूल आपणहून जवळ येईल तेव्हा बोलावं.

लहानपणी मुलं धडपडतातच. शिशु असो, कुमार असो, त्यानी काही फरक पडत नाही. आईवडील, जवळचे नातेवाईक मुलाला प्रत्यक्ष पडताना बघतात. त्यानंतर ते बोलतात काय, हा महत्वाचा प्रश्न आहे आणि त्या मुलाचं आणि पालकांचं नातं त्या संवादावर अवलंबून आहे. काही पालकांना हे कळतं की, किती लागलं आहे, हे प्रथम बघायला हवं. फार लागलं असेल तर इलाज करायला हवा. चोळणं, औषध, उठायला आधार यांपैकी काय जरूर असेल ते. सगळं ठीकठाक असेल तर त्यानंतर जे बोलणं असेल त्यात माया व्यक्त होतेय, का काळजी, का वाईट वाटणं, का अलिप्तपणा, का 'एवढं कसं कळत नाही?' हा भाव व्यक्त होतोय त्यावर ते नातं अवलंबून असतं. मी लहानपणापासून एक वाक्य साधारण हजार वेळा ऐकलंय, 'डोळे फुटले का?' मुलं असली म्हणून काय झालं, हा काय बोलण्याचा प्रकार?

आणखी काही लोक आम्ही असे बघितले आहेत की, जे बोलता बोलता कामवाल्यांची अपमानकारक चेष्टा करतात. प्रत्यक्षात काम करणाऱ्यांबरोबर त्रासदायक नसलेली चेष्टा करण्यात काही अडचण नाही. आमच्या घरी भांडी घासणारी मुलगी आहे. तिला जबाबदारीनी वागण्याची सवय लावण्याची मला इच्छा आहे. मग रागवारागवी करण्याऐवजी आम्ही गमतीगमतीत असं ठरवलंय् की तिच्या हातून काही चूक झाली की, तिनी मला दहा हजार रुपये द्यायचे आणि ती योग्य वागली की मी तिला दहा हजार रुपये द्यायचे. गमतीत त्याचा हिशोब चालतो. अपमान न होता, न रागावता तिला जबाबदारीनी वागण्याचं शिक्षण देता येतं. हा संवाद खूप अर्थपूर्ण ठरतो.

मोलकरीण ठरल्या वेळेपेक्षा उशिरा येणं, न कळवता दांडी मारणं या तर घरोघरी चालणाऱ्या गोष्टी आहेत. आमच्याकडच्या कामवालीला आम्ही म्हणतो की, 1 तास उशीर झाला तर 2 कप चहा करून तिला प्यायला लावणार. चहा करणार. तिनी तो खुर्चीवर बसून प्यायचा हे पण ठरलेलं असतं. न कळवता दांडी मारली तर 4 कप चहा प्यावा लागेल. एकदा ती कामवाली न सांगता 4

दिवस गैरहजर राहिली. मग मी तिला म्हणालो, 'आता पातेलंभर चहा पिण्याची तयारी ठेव.' नंतर जेव्हा ती ८ दिवस न सांगता गैरहजर राहिली तेव्हा आल्यावर आपणहून म्हणाली, ''मी बादलीभर चहा पिण्याच्या तयारीनी आलेय्.'' या सगळ्या संवादाचा परिणाम थोडा का होईना पण चांगला झाला, होतो हे मी खात्रीपूर्वक सांगू शकतो.

आपण घरी, कामाच्या जागी माणसं नोकरीला ठेवलेली असतात. काही कामं त्यांनी न सांगता रोज करायची असतात. काही नवीन कामं समजावून सांगावी लागतात. अशा संवादाच्या बाबतीत कामाला ठेवलेल्यांच्यात अनेक प्रकार आढळतात. काहींच्या आपणहून एखादी गोष्ट लक्षात येते, ते शंका असली तर विचारतात आणि कामही करून टाकतात. काही लोक लक्षात आलं तरी शंका विचारत नाहीत आणि युक्तीनी काम टाळतात. काही लोक आठवण केली तरच कामं करणारी असतात. काही नाठाळ आणि कामचुकार, सांगितलं तरी काम न करता तशीच बसतात किंवा निघून जातात. हा संवाद, विसंवाद, असंवादाचा खेळ प्रत्येक ठिकाणी चालू असतो. अशी सगळी माणसं मालकाला योग्य संवाद जमला तरच नीट हाताळता येतात.

असंवादाचं म्हणजे संवाद न करण्याचं एक गमतीशीर उदाहरण सांगतो, मी आणि शोभा फिलाडेल्फिया (यू.एस.ए.) मधे छोट्या फ्लॅटमधे राहात होतो. बाहेर हॉल + किचन आणि आत बेडरूम + अटॅच्ड टॉयलेट अशी एवढीच जागा होती. आमच्याकडे भारतातून एक मुलगा तात्पुरता राहायला आलेला होता. नोकरी मिळेपर्यंत राहायची, जेवायची सोय करायची अशी त्या काळी पद्धतच होती. एका रात्री आम्ही बेडरूमचं दार कडीनी लावून आत झोपलो होतो. तो हॉल-किचनमधे गादीवर झोपायचा. त्याला पहाटे लघवीला लागली. आम्ही जरा वेळानी उठून दार उघडलं असतं, पण त्याला तेवढं थांबता येत नव्हतं. त्यानी काय केलं, सुरीनी दाराच्या फटीतून बेडरूमची कडी काढली आणि आत येऊन टॉयलेटला जाऊन आला. सुरीनी कडी पुन्हा लावून ठेवून त्याला बाहेर जाता आलं नाही. त्यामुळे सकाळी उठल्यावर आम्हाला काहीतरी कारणानी कडी उघडल्याचं कळलं. विचारल्यावर तो म्हणाला, ''मी आत आलो होतो. पण तुमच्याकडे बघितलंसुद्धा नाही.'' या मुलानी आम्हाला हाक मारून उठवलं असतं तरी चाललं असतं. मुलगा सालस होता. तो म्हणाला ते पूर्ण खरंच असेल. पण वागणूक मात्र चुकली.

न बोलण्याचा म्हणजेच असंवादाचा आणखी एक चुकीचा प्रकार सांगतो, मागे एकदा आम्ही कारने कुठेतरी जात असताना ड्रायव्हरनी अचानक गाडी बाजूला घेतली. काही न सांगता. विचारल्यावर म्हणाला, ''टपरीवर चहा पितो.'' प्रत्यक्षात त्या रस्त्यावर 5 मिनिटांच्या अंतरावर एका रेस्टॉरंटमधे आम्ही थांबणारच होतो. तिथं ड्रायव्हरला चहाच काय इतर काही खायला हवं असतं तर तरी मिळालं असतं. ड्रायव्हरच्या असंवादामुळे सगळ्यांचा दोनदा वेळ गेला.

दुसऱ्या एका प्रसंगी मी आणि माझा सहकारी असे दोघंच ऑफिसमधे होतो. मी ऑफिसच्या आतल्या भागात त्याला कल्पना देऊन झेरॉक्स काढत होतो. त्यानंतर मला काही न सांगता, तो टॉयलेटमधे गेला. तेवढ्यात कुरियरनी एक पत्र आलं आणि कोणी हजर नसल्यामुळे ते पत्र परत गेलं. खूप महत्वाचं पत्र असल्यामुळे पुढे खूप चर्चा झाल्या. तो मला सांगून टॉयलेटमधे गेला असता तर कुरियर स्वीकारण्याची व्यवस्था मी नक्की केली असती.

आत्मविश्वास आणि जादापणा किंवा आगाऊपणा यांत फरक असतो. जीवनसाथमधे येणारे अविवाहित, विवाहित सगळ्या लोकांशी निरनिराळ्या विषयांबद्दल बोलणं होतं. त्यांची वागणूक कळते. हुशारी, विषयाची समज कळते. त्याचप्रमाणे जादापणाही कळतो. कार्यक्रम संपला की काही लोकं 5-10 मिनिटं थांबतात. माझ्याशी, शोभाशी एकट्यानी बोलण्यासाठी ते थांबलेले असतात. फार लोक थांबलेले दिसले तर ते निघतात आणि नंतर फोन करतात. यातून सरळपणा दिसतो. काही लोकं नेहमी कार्यक्रम संपण्याच्या 15 मिनिटं आधी निघतात. ते खूप कामात असतात. बाकीचे सगळे अशा व्यक्तीला जादा समजतात आणि ते खरं असतं.

मला असे बरेच लोक माहीत आहेत की ज्यांना कशाला चांगलं म्हणणं जमतच नाही. एका गावच्या एका अभ्यासगटाला मी माझा कच्चा लेख दिला होता. तो लेख कच्चा आहे, त्यावर बरंच काम करायचं बाकी आहे, केवळ तुम्हाला स्पष्ट विचार करण्यासाठी मदत व्हावी म्हणूनम मी ही प्रत देत आहे इतकं सांगून तो दिला होता. मला पक्कं माहिती आहे की, त्यांना त्याचा खूप फायदा झालेला आहे. पण प्रत्यक्ष भेटीत तो लेख चांगला आहे, हे शब्द काही त्यातला मुख्य माणूस तोंडून बोलू शकला नाही. लेख कच्चा असल्यामुळे त्यात काही गोष्टींची पुनरावृत्ती झाली होती, याची मला माहिती होती, खात्री होती. त्या माणसानी तेवढ्या उणिवेचा आवर्जून उल्लेख केला. पण 'लेख छान आहे, खूप

उपयोगी आहे,' हे वाक्य काही केल्या त्याच्या तोंडातून आलं नाही.

आणखी लोकांचा एक प्रकार मी खूप प्रमाणात बघितलाय्. त्यांना चांगल्या गोष्टींचं कौतुक करताच येत नाही. खाद्यपदार्थ चांगला झाला असं तोंडानी सांगता येत नाही. वर ते असंही म्हणतात, 'तोंडानी कशाला सांगायला हवं, वागणुकीवरून, चेहऱ्यावरून नाही का कळत?' माझ्या आणि शोभाच्या लिखाणाच्या बाबतीत अशीच स्थिती आहे. आमचे अनेक लेख, पुस्तकं यांचं कौतुक करणारे लोक बरेच आहेत. पण वाचून तोंडानी कौतुक करता न येणारे लोकही खूप आहेत.

कधीकधी आपल्याला कळतं की आपल्याकडून चुकीचे, दुसऱ्याला दुखावणारे शब्द बोलले गेले. शक्यतोवर 'मला या अर्थानी तसं म्हणायचं नव्हतं.' असा उलगडा करून योग्य शब्दात त्याची लगेच दुरुस्ती जरूर करावी.

समजा, लगेच ते नाही जमलं तर नंतर मुद्दाम फोन करून किंवा प्रत्यक्ष भेटून माफी मागून दुरुस्ती करावी.

या साध्या गोष्टींऐवजी लोक इतर जास्त श्रमाच्या, खर्चाच्या गोष्टी जास्त पसंत करतात. जेवायला घरी बोलावतात किंवा बाहेर नेतात. भेटवस्तू देतात.

अशा लोकांच्या मनातलं पण न बोललेलं वाक्य असं असतं, 'तुम्ही मला समजून घ्या. पण मी माझा न बोलण्याचा हट्ट सोडणार नाही.' आपल्या मनातलं त्याला प्रतिक्रिया म्हणून न बोललेलं वाक्य असं असतं – 'तुम्ही आधी स्वतःहून बोला, मगच आम्ही तुम्हाला अवश्य समजून घेऊ.'



## 7) व्यवसाय, धंदा, दुकानदारी यांमधले संवाद

संवादकलेविषयी बोलताना त्या व्यक्तीच्या बुद्धिमत्तेचाही प्रश्न त्यात येतोच. कित्येक लोकांची चांगला संवाद साधण्याची इच्छा असते. पण लोकांची नावं, आडनावं लक्षात ठेवण्याइतकी स्मरणशक्ती त्यांच्याकडे नसते. मी बांधकाम क्षेत्रामधे अनेक वर्षं होतो. त्यात अनेक कामगार मिस्त्रींना त्यांच्याकडे काम करणाऱ्यांची नावं, आडनावं लक्षात राहात नसत. बाबा, काका, मावशीबाई अशा तऱ्हेनी हाका मारणं चालायचं.

बांधकाम व्यवस्थापनातून निवृत्त झाल्यापासून घरची सगळी खरेदी मी करतो. त्यामुळे अनेक छोट्या दुकानदारांची परिस्थिती मी जवळून बघतो. हे दुकानदार बऱ्यापैकी शिकलेले असतात. गिऱ्हाईकांची आडनावं त्यांना माहीत नसली की, काका, काकू म्हणतात. नांवं माहिती झाली तरी स्मरणशक्ती कमी पडते त्याला ते काय करणार? जरा इंग्रजाळलेल्या लोकांना ते अंकल, आंटीही म्हणतात. त्यांच्या परीनी संवादाचा प्रयत्न करतात.

संख्येनी थोडे, पण माझ्या असेही काही दुकानदार ओळखीचे आहेत, की जे सगळ्या गिऱ्हाइकांची आडनावं लक्षात ठेवतातच, पण त्यांचा काम-धंदा, नोकरी, व्यवसाय, कौटुंबिक माहिती असं सगळं लक्षात ठेवतात. भेटलं की, चौकशी करतात. काय बोललं की दुसऱ्याला आपलेपणा वाटतो हे त्यांना चांगलं माहीत असतं. याबाबतीत कायम लक्षात ठेवण्याची गोष्ट म्हणजे प्रत्येकाला स्वतःविषयी चांगलं सांगायला आवडतंच. त्याच्याविषयी ते चौकशी करतात. दुकानदारानी स्वतःविषयी सांगणं हे अशावेळी दुय्यम असतं.

अमुक पदार्थ नवीन आलाय, खाऊन बघा म्हणून चव देतात. नवीन गिऱ्हाईक आलं आणि एक-दोनदा दिसलं की त्यांनी त्यांचं आडनाव वगैरे विचारलंच समजा. या दुकानदारांची दुकानं छोटीच, जागा कमी, कामगार कमी, पण केवळ संवादाच्या जोरावर त्यांनी माझ्यादेखत अनेकपटींनी धंदा वाढवला. नवीन जागा खरेदी केल्या, शाखा काढल्या. त्यांच्या दुकानात नावं, फोन नंबर लिहून ठेवण्यासाठी वहीही असते. ते जरूर असली तर घरपोच माल देतात, सगळं शिस्तशीर असतं.

याच्या विरुद्ध टोकही तुम्ही पाहिलं असेल. एक ओळखीचे दुकानदार आहेत. गेल्या अनेक वर्षांत मी त्यांना प्रसन्न चेहऱ्यानी वावरताना एकदाही बघितलेलं नाहीय. त्यांच्या दुकानात मी अनेक वेळा गेलेलो आहे. ते मला कधी वेडंवाकडं बोललेले नाहीत, पण इतरांना 'एवढं कळत नाही का?', 'तुमची अक्कल कुठे गेली?' असलं बोलताना मी बघितलं आहे. गिऱ्हाइकाला तुच्छतेनी वागवल्यामुळे धंदा वाढतो अशी त्यांची श्रद्धा आहे.शोभा आणि मी दोघंही त्यांच्याकडे काही काही निमित्तांनी जातो. आमच्या-आमच्यात आम्ही त्यांचा उल्लेख जे. डी. असा करतो. जे. डी. म्हणजे जा. दा. त्यांची पुढची पिढीही त्यांच्या तालमीत तयार होते आहे हळूहळू. ते आपल्या मुलांवर भरपूर मेहनत घेत असावेत.

माझ्या ओळखीच्या दुसऱ्या एका दुकानदाराची परिस्थिती सांगतो. मध्यम दर्जाच्या खाद्यपदार्थांचं साधं दुकान आहे, पण दुकानदाराच्या मालकाला वागणुकीचा माज किती! मी बरेच दिवसांनी गेल्यावर म्हणालो, ''काय हालहवाल? खूप दिवसांनी येतोय मी!' तर थेट दुर्लक्ष. हा नेमका कुठच्या गोष्टीचा माज आहे हे मात्र मला कळलेलं नाहीय.

आमच्या जवळपासच्या दुकानांच्यात 'मराठी दुकानदार' या विषयावर ज्याला संशोधन करायचंय् त्याला भरपूर 'सब्जेक्ट मटीरियल' मिळेल. एक दुकानदार गिऱ्हाईक नसल्यामुळे वर्तमानपत्र वाचत बसले असले आणि आपण गेलो तर ते आपल्याकडे थेट दुर्लक्ष करून चालू असलेला मजकूर पूर्ण वाचून झाला की मगच तुमच्याकडे लक्ष देतात. दुसरे पहाटे दुकान उघडतात आणि हनुमान चालीसा वाचत बसतात. गिऱ्हाईक येऊन थांबलं तरी लक्ष देत नाहीत. तो चरण वाचून संपवल्याशिवाय मधे थांबून गिऱ्हाइकाकडे लक्ष देणं म्हणजे साक्षात पापच की! तिसरे कायम थोड्या उशिरा दुकान उघडतात. ठरलेल्या वेळेनंतर अर्ध्या तासानी गेलं आणि ते नुकतेच येऊन झाडू मारत असले तर त्यांनी 'दोन मिनिटं थांबा हं जरा,' म्हटलं तर ते योग्य होईल. पण हे असे शब्द म्हणणं त्यांच्याकडून शक्य होत नाही.

पत्रकारिता हा पण एक व्यवसायच आहे. शोभाला अनेक लोकांचे फोन येतात. मुलांच्या संबंधीच्या अनेक विषयांवर पत्रकारांना शोभाची मुलाखत घ्यायची असते. असे पत्रकार शोभाच्या ओळखीचे नसतात. प्रत्यक्ष भेटण्याची तसदी घेण्याची त्यांची तयारी नसते. माझ्या बाबतीत असे प्रसंग फार कमी

असतात, पण फोनवर बोलायला माझा विरोध असतो. प्रत्यक्ष भेटून, विषय समजावून घेऊन मग लिखाण करावं अशी माझी इच्छा असते. पत्रकारितेमधे विषयाची अशी सदरभरू हाताळणी फार वाढली आहे. त्यांना त्या विषयात खरा म्हणजे काही रस नसतो असंच बोलताना वाटतं.

विलायतेमधे आपल्याकडे काम करणाऱ्याला चांगलं वागवतात हे तुम्हाला ऐकून माहिती असेलच. ज्या काही कारणांमुळे एकदा विलायतेत माणूस गेला की, तो भारतात यायला तयार नसतो, त्यांपैकी हे एक महत्वाचं कारण असतं. ज्याला 'वर्किंग कंडिशन्स' म्हणतात ते म्हणजेच बॉसनी असिस्टंटला दिलेली सन्मानाची वागणूक. त्याबद्दल सविस्तर आत्ता सांगत नाही. एकच आठवण सांगतो, म्हणजे तुमच्या लक्षात येईल. जिथे मी नोकरी करायचो, तिथला टॉप बॉस माझ्याकडे काहीतरी काम असलं की म्हणायचा, 'कॅन यू स्पेअर अ मिनिट फॉर मी अनिल?'



## 8) चांगला संवाद– त्यासाठीचे मार्ग आणि तंत्रं

संवादामधे चेहऱ्यावरच्या हावभावांनाही फार महत्व आहे. काही माणसं सतत सगळ्या गोष्टी हसत हसत बोलतात. त्यांची अशी अडचण होते की, त्यांनी बोललेलं कोणीच गंभीरपणी घेत नाही. याउलट आपली अडचण, आपला त्रास किंचित हसत लोकांना आपण सांगू शकलो तर चांगला परिणाम होतो. आठवून बघा, पलंगावर पडून राहिलेला आजारी माणूस किंचित हसतमुखानी आपल्या त्रासाबद्दल सांगायला लागला की, त्याच्याविषयी आपलं होणारं मत आणि दुर्मुखलेल्या चेहऱ्यानी आजाराचं वर्णन सांगणारा माणूस, याविषयी आपलं होणारं मत यांतला फरक बघा. याउलट अत्यंत निर्विकार, खडूस, कायम रागीट चेहऱ्यानी वावरणारी माणसंही असतात. ती लोकांना प्रथमदर्शनी आवडत नाहीत. ती माणसं कळायला खूप वेळ लागतो. लहान मुलं तर त्यांना घाबरतातच. सर्वांत चांगल्या चेहऱ्यावरच्या भावांचं वर्णन म्हणजे स्मितहास्यानी पण शांत, संयमित, संतुलित आणि मैत्रीच्या भावनेचा प्रसन्न चेहरा. मागे मी दोनदा नाटकात काम केलं होतं तेव्हा आणि विवाह अभ्यासावरच्या बऱ्याच छोट्या फिल्म्सच्या वेळेला, टी.व्ही.वरच्या कार्यक्रमांच्या वेळेला, दिग्दर्शकांनी याबाबत दिलेल्या सूचना अजून आठवतात.

माझ्या ओळखीचा एक माणूस आहे. तो आपल्याशी बोलण्यासाठी येतो तो समोर एकदम जवळ उभा राहातो. इतक्या जवळ की हाताची हालचाल झाली तर स्पर्शच होईल. हस्तांदोलन करण्याजोगं हे योग्य अंतर समजतात. म्हणजे हळू, सावकाश बोललं तरी व्यवस्थित ऐकू जातं. योग्य अंतरावरून, योग्य आवाजात आणि स्पष्ट शब्दांत असा संवाद आदर्श समजतात.

आपण जेव्हा कोणाला ओझरते भेटतो, तेव्हा व्यक्ती लांब असली तर नुसता हात करणं पुरतं. जवळ असलो तर किंचित, जमेल तेवढं बोलावं हे जास्त चांगलं. काही माणसं बोलायचं तर सोडाच, समोर दिसली तरी बघतही नाहीत. अर्थातच त्यांना कुठल्यातरी न्यूनगंडानी ग्रासलेलं असतं. ओझरतं भेटल्यावर थोड्या वेळात भेट उरकण्याजोगी परिस्थिती असेल तर त्यांची चौकशी जरूर करावी. त्यापेक्षा कमी वेळ असेल तर नुसतं नमस्कार म्हणावं. शक्य असेल तर

त्या माणसाला आपण ज्या नावानी हाक मारतो तो उल्लेख करावा. म्हणजे अनघा समोरून आली तर नुसतं, 'नमस्कार', पेक्षा 'नमस्कार अनघा', बरं आणि त्याहीपेक्षा 'नमस्कार अनघा, कॉलेज कसं चाललंय?' हे चांगलं. त्यापेक्षा जास्त वेळ असला तर, 'काय अनघा, तुला आता कॉलेजच्या तिसऱ्या वर्षाला विषय निवडायचे असतील ना? काय निवडायचे ठरवलेस?' एवढं जरूर विचारावं. पण ओझरत्या भेटीत अडचणीत टाकणारं भलतं काहीही विचारू नये.

मला पूर्णपणे मान्य आहे की, निव्वळ चांगले शब्द बोलायला शिकलं म्हणजे पुरत नाही. दिलगिरी, कृतज्ञता, आभार, विनंती या सगळ्याच बाबतींत मला अशी अनेक प्रसिद्ध वाक्प्रवीण माणसं माहीत आहेत की जी नुसती उत्तम बोलतात, लिहितात. कृतीची वेळ आली की, ती नापास होतात, आपल्या नजरेतून पार उतरतात. चांगले शब्द आणि प्रत्यक्ष सुसंगत वागणूक दोन्हींची गरज पूर्ण झाली तरच ते वागणं योग्य ठरतं.

शुभेच्छा देणं, सांत्वन करणं हेसुद्धा संवादापैकीच आहे आणि आवश्यकच आहे. कृत्रिम शुभेच्छांपेक्षा 'तुमचं अमुक काम व्यवस्थित पार पडावं अशी इच्छा आहे.' हे शब्द जास्त चांगले. ऑल द बेस्ट, बेस्ट लक हे थोडक्यात आहे. इंग्लिश भाषेतलं आहे, पण चालेल. 'अमुक झालं की कळवा, मी त्या बातमीची वाट पाहीन,' असं पण चालेल.

मानसशास्त्रात एका विषयावर भरपूर संशोधन झालेलं आहे. तो प्रश्न म्हणजे माणसाचे प्रश्न बोलल्यानी सुटतात का न बोलल्यानी. प्रश्न असला की तो सोडवण्यासाठी एकूण 3 मार्ग असतात हे कायमच मान्य आहे.

1) कुठचीतरी अदृश्य शक्ती आपला प्रश्न सोडवेल आणि सगळं काही ठीक करेल. कुठचाही मूर्त किंवा अमूर्त देव, त्याचा प्रेषित, बुवा, महाराज ज्यांच्या कोणावर श्रद्धा असेल त्यांच्या हाती तो प्रश्न देऊन आपण मोकळं होणं. एखाद्या व्यक्तीचे प्रश्न या पद्धतीनी सुटणार असतील तर आपली खरोखरच काही हरकत नाही. अशांची संख्या खूप आहे आणि ज्यांच्यावर ते श्रद्धा ठेवतात अशांचीही संख्या खूप आहे. भारतात आणि विशेषतः महाराष्ट्रात तर अशांचंच बहुमत आहे. माझ्यापुरतं मी म्हणू शकतो की, हा माझा मार्ग नाही. या पुस्तकात 'विवाह, रोजचं आयुष्य आणि तत्त्वज्ञान' या प्रकरणात याची सविस्तर चर्चा आहे.

2) दुसऱ्या कोणाचीही मदत न घेता स्वतः वाचन, चिंतन या जोरावर स्वतःचे

प्रश्न सोडवणं. हा मार्ग कठीण आहे. अशा पद्धतीनी प्रश्न सोडवणारे लोक फार कमी असतात. अनेक नवराबायकोंना, कुटुंबांना वाटतं की, आपले प्रश्न आपण सोडवू. पण ते अजिबात खरं नसतं. या कल्पनेमुळे ते नुसते वेळ काढतात, प्रश्न सोसत राहतात आणि एकमेकांना छळत बसतात.

3) तिसरा मार्ग प्रश्नाविषयी बोलायला सुरुवात करणं. इतर व्यक्तींशी बोलणं, ग्रुप जमवणं, पुस्तकं वाचणं, लिहिणं. कुठच्याही पद्धतीनी पण संवादाला सुरुवात करणं. व्यवस्थापनशास्त्रात म्हटलंय् की प्रश्नाचं उत्तर माहीत नसलं की, प्रथम प्रश्न काय ते बोलायला सुरुवात करावी. प्रश्न काय ते समजावून सांगता सांगता उत्तराचा शोध लागायला सुरुवात होते.

मला वाटतं की  तिसरा मार्ग सर्वांत योग्य आहे. दुसरा मार्ग जवळजवळ अशक्य आहे. पहिला मार्ग खोटा आहे. काहीच न करणं हा चौथा मार्ग सर्वांत लोकप्रिय पण अत्यंत दुर्दैवी आणि समाजविघातक आहे.

संवादाची काही मूलतत्त्वं आहेत. त्यांपैकी दुसऱ्याच्या भावना आणि विचारांचा त्यांनी उल्लेख करण्यापूर्वी आपण उल्लेख करणं हे आहे. समजा, त्यांनी उल्लेख करण्याआधी लक्षात नाही आलं तर पुढच्या वेळी त्याची चौकशी करणं जमलं पाहिजे. कोणी म्हणेल, एवढं सगळं करण्यासाठी सगळेजण एवढे हुशार, चलाख कसे असणार? बरोबर आहे. बुद्धिमत्ता, प्रतिभा कमी-जास्त असू शकतात. पण म्हणून तर तंत्रं विकसित केली आहेत. स्वतंत्र प्रतिभेच्या जागी दुसऱ्यानी घटवलेली तंत्र वापरता येतातच की! याच पुस्तकात 'भावनांक म्हणजे इमोशनल कोशंट' आणि 'पालक शिक्षण' या दोन्ही विषयांवर लेख आहेत. त्यात मूळ प्रतिभा, त्या विषयातली स्वतंत्र समज असण्याचा संबंध आहेच. पण कोणी त्यात जरा कमी पडत असलं तर त्याची तंत्रंही सांगितलेली आहेत. पण मूळ विषय तोच. संवाद.

आणखी एक साधी महत्वाची गोष्ट अशी असते. कौतुक करायचं असलं तर लगेच आणि सगळ्यांच्या देखत जाहीरपणी करावं. पण टीका करायची असली तर खाजगीत, थोडक्यात आणि काही काळानंतर करावी. टीकेचा नेमका मुद्दा स्वतःच्या लक्षात ठेवण्यासाठी स्वतःला मात्र तंत्र वापरावं लागतं.

सभ्यपणी बोलण्यासाठी, दुसऱ्याच्या मनाचा विचार करून त्याला न

दुखावता वागण्यासाठी उद्धटपणाच्या तुलनेत थोडे जास्त शब्द लागतात. अगदी थोडा वेळ जास्त लागतो हे अगदी खरं. 'देता का?' आणि 'द्या' मधे अर्ध्या क्षणाचा वेळेचा फरक असतो, पण भावनिक परिणाम फार मोठा असतो.

'दुसऱ्यांची मनं सांभाळत बसायला आम्हाला तेवढा वेळ नसतो.' असं अभिमानानी सांगणारे लोक आहेत. अशा सगळ्या लोकांनी ही गोष्ट किती खरी किंवा खोटी आहे हे तपासण्यापुरता थोडा वेळ काढावा अशी त्यांना माझी विनंती आहे. त्यांनी या गोष्टींची तुलना करावी की वेळ न पाळण्यानी स्वतःला आणि इतरांना होणारा त्रास विरुद्ध उशीर होतोय हे सांगण्याचा एक अर्ध्या मिनिटाचा फोन. काहीतरी धाडदिशी दुखावणारं सांगून टाकणं विरुद्ध 'अमुकविषयी तुला सांगितलं तर चालेल का?' असं विचारणं. त्यासाठी 15 सेकंद जास्त वेळ लागणारच. त्यातल्या फायद्या-तोट्याचं गणित त्यांनी मांडून बघावं.

भारतीय लोकांच्यात माझ्या मते संवादात खूप काही मोठी उणीव असेल तर ती म्हणजे भारतीय माणसं माफी मागू शकत नाहीत आणि आभार मानू शकत नाहीत. पाश्चात्यीकरणाला होकार असणाऱ्यांनी 'सॉरी' म्हणावं आणि भारतीयत्वाचा आग्रह असणाऱ्यांनी 'माफ करा' म्हणण्याचा सराव करावा अशी माझी विनंती आहे. पाश्चात्त्य लोक जाता-येता 'सॉरी, थँक्यू, प्लीज' वापरतात तसं नाही मी म्हणत. पण आपली चूक लक्षात येऊनही त्याविषयी दिलगिरी प्रदर्शित न करणं हे मला चूकच वाटतं.

आपल्या हातून बायकोवर अन्याय झाला म्हणून भारतीय माणूस बायकोला साडी खरेदी करेल, नवऱ्यावर अन्याय झाला तर बायको नवऱ्याच्या आवडीचा पदार्थ जेवणात करेल, आईवडील मुलांना नवे कपडे खरेदी करतील, खेळणी आणतील, पण बिनखर्चातली दोन सेकंदातली माफी मागणार नाहीत. 'माफ करा' शब्द जमत नसतील तर, 'माझं चुकलं' चालेल, 'मी पुन्हा असं होऊ देणार नाही,' चालेल, पण नुसता ओशाळलेला चेहरा चालणार नाही. मुख्य म्हणजे तो दुसऱ्याला कळेल याची खात्री नाही. त्याला संवाद म्हणताच येत नाही. ही माफीसुद्धा त्या माणसाकडे बघून स्पष्टपणी मागितलेली हवी. कृत्रिमपणा त्यात अजिबात असता कामा नये. रागानी, गुरगुरत माफी मागण्याचाही काही उपयोग नाही. प्रत्येकानी आपापली रास्त पद्धत शोधून काढावी, पण दिलगिरी व्यक्त करता आलीच पाहिजे. रागारागानी, नाइलाजानी म्हटलेलं 'सॉरी' आणि मनापासून मागितलेली माफी यात स्वरात आणि परिणामात देखील फार फरक असतो.

अमुक गोष्ट मी बोललो, तमुक गोष्ट केली त्याचा तुम्हाला राग आला का? असं विचारलं तर नव्याण्णव टक्के वेळेला समोरच्या माणसाला आपला राग येत नाही. पण एक टक्का उरतोच ना, त्याचं काय? 'हो, मला राग आला', 'मला असं आवडत नाही,' या प्रकारच्या उत्तराची तयारी हवी. त्यानंतर माफीही मागता यायला हवी.

ज्यांचं धाडस होत नाही त्यांच्यासाठी एक उपाय आहे. ज्याच्याशी जे बोलायचं धाडस होत नाही त्या व्यक्तीला शक्य तेवढ्या लवकर सांगून टाकायचं की, अमुक विषयावर मला बोलायचं आहे, पण शांतपणे बोलायचंय्. या 'शांतपणे'च्या सापळ्यात ती व्यक्ती बहुतेक वेळा अडकते. विशेषतः रागीट माणसांना असं सापळ्यात पकडावं लागतं. एक तंत्राचा भाग सांगतो, एखादा माणूस आपल्याला कल्पना नसताना भडकला तर तेव्हा संवाद थांबवायच्या मागे लागायचं. स्वतः माफी मागण्याची जरूर नाही. कारण स्वतःची काही चूक नसली तर कशाबद्दल माफी? पण 'झालेल्या प्रसंगाबद्दल मला वाईट वाटतं, आपण नंतर त्यासंबंधी बोलू.' म्हणून तिथून निघावं.

माणूस भडकू आहे हे आधीपासून माहिती असलं तर त्यासाठी निराळं तंत्र असतं. ज्याबद्दल आपल्याला बोलायचं असेल तो एक-दोन शब्दांत फक्त विषय सांगायचा आणि बोलण्याचा दिवस, वेळ ठरवायची. आपल्याला बोलण्यासाठी किती वेळ असेल ते आधी विचारायचं. ठरलेल्या वेळेपेक्षा 5 मिनिटं आधी पोचायचं. जमलं तर बोलण्याचे मुद्दे कागदावर लिहून समोर ठेवायचे. इतकं केल्यावर भडकू माणूस न भडकण्याची पंचाण्णव टक्के खात्री देता येते.

संवादांपैकी महत्वाचा संवाद म्हणजे संघर्षाचा. मतभेद व्यक्त करायचा असेल तर, 'मी याच्याशी सहमत नाही,' हे आवर्जून सांगितलं पाहिजे. थेट मुद्दा सांगायचा. तिरकं बोलायचं नाही आणि मुख्य लक्षात ठेवायचं तत्व म्हणजे 'मतभेद म्हणजे भांडण नाही.'

या सांगितलेल्या सगळ्या प्रकारांवर सबंध कुटुंबानी करण्याजोगा एक इलाज आहे. तो म्हणजे कुटुंबाचर्चा. खूप प्रश्न असले तर आठवड्यातून एकदा कुटुंबानी व्यवस्थित मुद्देसूद चर्चा करावी आणि प्रत्येक कुटुंबानी कमीतकमी महिन्यातून एकदा चर्चा करावी अशी माझी आग्रहाची शिफारस आहे. कुटुंब हा शेवटी व्यक्तींचा गटच आहे. शिवाय इतर बाहेरच्या गटात स्वतः जायला सुरुवात केली तर फारच छान.

'कौटुंबिक विसंवाद' नावाचा लेख या पुस्तकात आहे आणि त्यामधे मी म्हटलंय की, मतभेदाचा प्रसंग आला की, 'न्यायालय' डोळ्यांसमोर आणावं. तरीही संवाद या विषयात त्याचा थोडा उल्लेख करायलाच हवा. वादी, प्रतिवादी, साक्षीदार, दोन्ही बाजूंचे वकील यांना न्यायाधीश सारखे 'सभ्यपणे बोला, आरडाओरडा करू नका, मुद्देसूद बोला, स्पष्ट आणि थोडक्यात मुद्दा मांडा.' हे सुनावतात. सूचना ऐकली नाही तर 'न्यायालयाचा अपमान मानला जाईल,' अशीही ताकीद देतात. या सगळ्याचा अर्थ एकच. संवादाचे नियम पाळा.

काही लोक अखंड बोलत सुटतात. थांबूच शकत नाहीत. बहुधा त्यांना स्वतःचा आवाज ऐकायला खूप आवडत असावा. आमच्या ओळखीत असे काही लोक आहेत, ते सगळे लोक सज्जन आहेत. प्रत्येक कृतीमागचा हेतू चांगला आहे पण असं सलग बोलत सुटणं ही कधी न करण्याची गोष्ट ही समज त्यांना नाही.

काहींना काहीतरी लपवायचं असतं म्हणून ते बोलत सुटतात. ही सवय चुकीची आहे हे ज्याला पटलं असेल, पण ज्याला तंत्राच्या मदतीची गरज आहे त्याच्यासाठी सोपं तंत्र आहे. मोबाईल फोन किंवा घड्याळात 2 मिनिटांचा गजर लावूनच बोलायला सुरुवात करावी. 2 मिनिटंच असं म्हणण्याचं कारण सांगतो. दोन-तीन किंवा जास्त माणसांचं संभाषण चालू असेल तेव्हा एका माणसानी सलग बोलण्याची कमाल मर्यादा दोन मिनिटं मानतात. स्टेजवरल्या भाषणाची गोष्ट निराळी.

माणसानी स्वतःच्या उणिवेची खुशाल चेष्टा करावी. आमचा एक बुटका मित्र आहे तो गमतीनी स्वतःच्या बुटकेपणाविषयी बोलतो. माझं वजन खूप आहे, पोट मोठं आहे. त्याची मी बरेच वेळा चेष्टा करतो. प्रसिद्ध लेखक पु. ल. देशपांडे यांचे स्वतःच्या शरीरयष्टीविषयीचे, सामान्य रूपाचे कितीतरी विनोद तुम्ही वाचले असतील. अगदी कमी ओळखीत दुसऱ्याच्या चांगल्या गोष्टीविषयी जरूर बोलावं. वाईट गोष्टीविषयी, दोषाविषयी अजिबात बोलू नये.

एक महत्वाचं तंत्र सांगतो. आपल्याकडे आलेल्या माणसाला तो काय करतो हे विचारणं जास्त महत्वाचं आहे. जवळजवळ प्रत्येक नॉर्मल माणसाला स्वतःविषयी, स्वतःच्या कामाविषयी बोलायला आवडतं. स्वतःविषयी अगदी थोडक्यात सांगावं. समोरच्या माणसाला आपल्या कामात जास्त रस असला तरच आणखी माहिती द्यावी. हे महत्वाचं तंत्र न समजणारे, पण एरवी सज्जन आणि चांगले बरेच लोक मला आणि शोभाला माहिती आहेत.

संवादाच्या बाबतीतले दोन महत्वाचे मंत्र सांगतो–

1) जेव्हा संवाद काही कारणानी तुटतो तेव्हा दोघांपैकी जो शहाणा असेल त्यानी पुन्हा संवाद सुरू करायचा.

2) दुसऱ्याला म्हणण्याचं मुख्य वाक्य 'मी सांगतो म्हणून कुठलाही निर्णय बदलू नको. तुला योग्य वाटेल तेच कर.'

या दोन मंत्रांच्या आधारानी चाललं तर नव्याण्णव टक्के यशाची मी व्यक्तिशः हमी घ्यायला तयार आहे.

जीवनसाथच्या 60 विषयांच्या यादीबद्दलची एक गंमत सांगतो. नुकतेच शोभा आणि मी मुलगा शोनील आणि सून ॲनास्तेसिया यांच्याकडे इंग्लंडमधे गेलो होतो. ॲनास्तेसिया काउन्सेलर आहे आणि तिची एक जवळची मैत्रीणही काउन्सेलर आहे. 60 विषयांच्या यादीबद्दल बोलणं चाललं होतं. त्या दोघींना मराठी कळत नसल्यामुळे त्या माफी/आभार/कौतुक/शुभेच्छा/सांत्वन/भांडण या विषयांचं इंग्लिश भाषांतर वाचत होत्या. जीवनसाथचा पहिला रविवार, 2 ते 5 वेळ वगैरे सगळं त्यांना माहिती होतं. ॲनास्तेसियाच्या ब्रिटिश मैत्रिणीचा मुख्य प्रश्न असा होता की, या विषयावर एवढा वेळ कार्यशाळा घेण्याचं कारणच काय? मला सांगायला लाज वाटत होती, तरी सत्य सांगावंच लागलं. सरासरी भारतीय माणसाला कशाचंही रास्त कौतुक करता येत नाही, कशालाही चांगलं म्हणता येत नाही, माफी रास्त शब्दांत मागता येत नाही, आभार मानता येत नाहीत. ही भारतात अनेकांना व्याधी आहे.

आत्तापर्यंत अशा कार्यशाळेची 18 वर्षांत 3-4 वेळाच मागणी झाली. त्या कार्यशाळेत शक्यतोवर खरा प्रसंग सांगायचा. तसा कोणाला आठवत नसला तर मी काल्पनिक प्रसंग सांगून त्याबद्दल योग्य पद्धतीनी माफी, आभाराची वाक्यं घटवून घ्यायची असं होतं. शेवटी 3 तास पुरत नाहीत अशी वेळ येते.



# 9) संवादकलेबद्दलच्या गटचर्चा

वर सांगितलेल्या एवढ्या गोष्टी पाळून कसं जगता येईल असा काहींचा प्रश्न असतो. प्रत्यक्षात ते शक्य आहे आणि त्याचे खूप फायदे आहेत हे मी खात्रीनी सांगतो. आणि तरी यांपैकी काहीच न जमल्यामुळे लोक संवादच सोडतात. स्वतः दुःखी होतात. अस्वस्थ वैवाहिक आयुष्य आणि एकूणच अस्वस्थ आयुष्य जगतात. जीवनसाथच्या गटचर्चेत एवढी प्रस्तावना ऐकल्यावर काही लोकं असंवादापासून संवादापर्यंत पोचायचा निर्णय घेतात, नवराबायकोमधला किंवा कुटुंबामधला विसंवाद मोकळेपणानी सांगतात. आधी एकदा सांगितलेला मंत्र इथे पुन्हा सांगतो. प्रश्नाचं उत्तर माहीत नसतं तेव्हा प्रश्न जास्त जास्त सविस्तर आणि तोही गटासमोर मांडायला लागलं की, उत्तरापर्यंत पोचण्याचा मार्ग सापडतो.

एवढं असून विवाह अभ्यास मंडळापर्यंत न पोहोचू शकणारी माणसं असतातच. काही वेळा येऊन नंतर गायब होणारीही खूप असतात. कित्येकांचं न येण्याचं कारण गमतीशीर असतं. एकदा केव्हातरी ते येणार असं फोनवर सांगून येऊ शकत नाहीत. कळवण्याचंही त्यांच्या लक्षात येत नाही. कळवलं नसल्यामुळे लाज वाटते. त्यामुळे पुढच्या वेळी ते येत नाहीत. मग आणखी लाज वाटल्यामुळे पुढे गटात यायचं बंद करतात. काही लोक सांगतात की, सकाळपर्यंत त्यांच्या लक्षात होतं. दुपारी मात्र ते जीवनसाथबद्दल पूर्ण विसरले. एक गोष्ट उघड आहे. त्यांच्याकडे करण्याच्या गोष्टी लक्षात ठेवण्यासाठी काही यंत्रणाच नसते.

पुरुषांच्यात आणिक एक वाईट पद्धत आहे. पुरुष गुपितं राखतो. आपला संसार, वैवाहिक, लैंगिक, आर्थिक, कौटुंबिक अंगांनी कसा चाललाय, हे पुरुष जवळच्या मित्रांनाही सांगत नाही. त्या मानानी स्त्रिया एकमेकींशी खूप मोकळ्या असतात. अभ्यास मंडळ म्हटलं की त्यात मोकळेपणानी स्वतःचं आयुष्य उलगडून सांगणं अपेक्षित असतं. त्यामुळे अशा विवाह अभ्यासाला पुरुषांचा विरोध जास्त असतो. अविवाहित मुलग्यांना, विवाहित पुरुषांना अशी खात्री असते की, कशीही बायको असली तरी तिला आपण आपल्या मनाप्रमाणे वळवून घेऊ, त्यामुळे अभ्यासाची काही गरज नाही.

संवादाबद्दल चांगलं काय, वाईट काय हे आपण बघितलं. याखेरीज एक मोठा प्रश्न म्हणजे संवादाचा अभाव. म्हणजेच असंवाद. काही लोकांना स्वतःला एखाद्या गोष्टीबद्दल काय वाटतंय् हेच ठरवता येत नाही कारण तेवढं जग बघितलेलं नसतं. त्यामुळे ते काहीच व्यक्त करीत नाहीत. काहींना माहीत असतं, कळत असतं, पण सांगायचं नसतं. आणि अर्थात काहींना कळलेलंही असतं, व्यक्त करायचं असतं, पण धाडस होत नाही. या तीनहीचं प्रमाण आपल्या समाजात सारखं आहे, म्हणजे प्रत्येकी एक तृतीयांश आहे असं माझं निरीक्षण आहे.

असंवादाचं सर्वांत वाईट आणि हानिकारक टोक म्हणजे 'या माणसाशी बोलण्यात काही अर्थ नाही,' असं ठरवून त्याच्याशी बोलणं सोडून देणं. असंच मग दुसऱ्या माणसाचं होतं. अनेकांचं होतं आणि माणूस कोणाशीच काही बोलेनासा होतो. मानसशास्त्रात असं म्हणतात की बहुतांश लोक न्यूनगंड किंवा अहंगंडानी पछाडलेले असतात. अहंगंड उघड दिसायला लागतो तेव्हा त्याचं कारण पुन्हा न्यूनगंडच असतं. गटात एखादी व्यक्ती बोलणं टाळते तेव्हा 'आपण काही चुकीचं बोललो तर काय!' किंवा 'आपली खरी अडचण, जी लपवायची ठरवलीय ती कोणाला कळली तर?' अशा कुठल्यातरी न्यूनगंडाची ती बळी असते.

काही लोकं गप्प बसतात पण त्याचं कारण निराळं असतं. जो विषय हे अनिलदादा मांडतायत् तो अगदी प्राथमिक किंवा फालतू आहे. आपण इतक्या छोट्या, किरकोळ विषयात बोलण्याजोगं नाही आणि शिकण्याजोगं नाही. वाईट गोष्ट अशी की, जीवनसाथच्या पहिल्या रविवारी जमणाऱ्या गटात अशी लोकं थोडी तरी असतात. मी आणि शोभा न्यूनगंड आणि अहंगंड या दोन्ही विकारांपासून वाचलेले अगदी क्वचित सापडणारे लोक आहोत, असं आम्हा दोघांना आणि इतरांनाही वाटतं. त्यामुळे असंवाद, विसंवाद, अतिसंवाद याखेरीज रास्तसंवाद या मार्गांनी आम्ही चाललो आहोत. हे सर्वच नात्यांच्या बाबतीत सांभाळावं लागतं.



## 10) संवादातल्या भाषेचा प्रश्न आणि हावभाव, हालचाली यांच्यामधून संवाद

भारतात मुळात सुशिक्षित, साक्षर माणसांचं प्रमाण कमी. त्यात अनेक राज्यं. त्यांच्या अनेक भाषा. भाषांमधल्या पद्धती म्हणजेच उपभाषा. या सगळ्या प्रश्नांमुळे माझ्या मते भारताचं फार नुकसान होतं. हिंदी ही राष्ट्रभाषा असली तरी प्रत्यक्षात त्याला काही अर्थ नाही. सबंध देशाशी एकत्र संवाद साधण्याची भाषाच अस्तित्वात नसल्यामुळे 'राष्ट्रीय एकात्मता' अशक्य आहे. अगदी साधं उदाहरण घेऊ. आमच्या कामवालीला मराठी येतं, पण हिंदी येत नाही. महाराष्ट्राच्या शेजारची राज्यं म्हणजे गुजरात, मध्यप्रदेश, आंध्र, कर्नाटक आणि गोवा. प्रत्येकाची भाषा निराळी. अगदी स्पष्ट बोलायचं म्हणजे बऱ्याच मराठी भाषिकांना त्या राज्यातली लोकं आपली वाटत नाहीत. अगदी पुणंसुद्धा दोन तुकड्यांत विभागलेलं आहे. पश्चिम पुणं मराठी आणि पूर्व पुणं म्हणजे हिंदी किंवा इंग्लिश. एवढ्या सगळ्या भाषांच्या प्रश्नांमुळे सामाजिक पातळीवर सुसंवाद ही गोष्ट मला तरी अशक्य वाटते. भारतभरातल्या भाषा-उपभाषा (डायलेक्टस्) धरून सतराशेच्यावर भाषा आहेत म्हणे. बहुधा त्यावरूनच 'सतराशेसाठ' या आकड्याला खूप या अर्थी साहित्यात स्थान मिळालं असावं.

एक फिलाडेल्फियामधली पूर्वीची गंमत सांगतो. एका गोऱ्या अमेरिकन मित्राला मराठी येत होतं. तो पूर्वी पुण्यात राहून थेट पुणेरी मराठी शिकून गेलेला होता. त्याला मराठीतले किती बारकावे समजतात याबद्दल खूप उत्सुकता होती. निरनिराळ्या विषयांवर बोलत असताना संध्याकाळी अंधार पडल्यावर 'लाईटस् ऑन' केल्यावर त्याला हा 'दिवेलागण' झाली म्हणाला. मग म्हणाला, 'पुढच्या कार्यक्रमात हे लोक काय दिवे लावतायत् ते महत्वाचं आहे.' पुढे दोन गोरे अमेरिकन मुलगा-मुलगी दिसल्यावर म्हणाला, 'तो काही तिला आता सोडत नाही, तिला तो थेट लागलेला आहे.' आपण कल्पना करू शकणार नाही अशा मराठी भाषेतल्या छटा, बारकावे त्याला अवगत होते. आमची आणखी एक गोरी, मराठी बोलणारी अमेरिकन मैत्रीण आहे, पण तिला इतकं मराठी येत नाही.

आमची सून ॲनास्तेसिया ग्रीक आहे. तिला ग्रीक आणि इंग्लिश दोनच

भाषा येतात. कुठचीच भारतीय भाषा येत नाही. तिच्याशी बोलताना आमच्या ओळखीची भारतीय लोकं तिला मराठी येत नाही सांगितल्यावर तिच्याशी हिंदीत बोलतात. तिच्या दृष्टीनी दोन्ही भाषा सारख्याच. बोलणाऱ्याला मराठीखेरीज कुठल्यातरी भाषेत बोलल्याचं समाधान, दुसरं काय!

परराज्यातून दुसरीकडे स्थायिक झालेल्याला साधारण चार भाषा येतात. राजस्थानातून महाराष्ट्रात स्थायिक झालेल्या अनेकांना राजस्थानी, मराठी, हिंदी आणि इंग्रजी भाषा येतात. परराज्यातल्या मराठी माणसाचं असंच होतं. किती भाषा येतात यावरून माणसाचा दर्जा ठरवण्याचीही पद्धत आहे. माझ्या ओळखीत 5, 7 भाषा येणारे लोक आहेत. जास्त भाषा येणाऱ्याला बुद्धिमत्ता, आणि भाषेचं खास अंग असतं. विनोबा भावेंना 22 भाषा यायच्या म्हणे. राष्ट्रीय पातळीवर मला भाषा हा भारतासमोरचा मोठा प्रश्न वाटतो.

अनेक राजकीय लढाया भाषेवरून होतात. महाराष्ट्रातून अमराठी लोकांना हटवण्यासाठी संघर्ष, बेळगाव (मराठी) आणि बेळगाव (कानडी) यावरून वाद, आंध्रात प्रश्न, गोव्यात दुफळी, हे काय आहे सगळं? अनेक भाषा ही भारताची समृद्धी आहे असं मला अजिबात वाटत नाही आणि लवकरच भारत जगातली महासत्ता होणार हे तर पार थोतांड आहे. ही केवळ राजकीय सत्तेच्या हव्यासापायी उठवलेली वावडी आहे. थेट लबाडी आहे. एका भाषेतल्या देशभरच्या खऱ्या संवादाशिवाय ते अशक्य वाटतं.

मी मागे दुबई, अबुधाबी, अलआइन इथे काम करायचो. मला माझ्या पदामुळे ड्रायव्हर आणि गाडी होती, अरेबियन भाषा येत नसल्यानी दुभाष्यासुद्धा होता. ड्रायव्हरला अरेबिक भाषा येत होती, पण इंग्लिश येत नव्हतं. दुभाष्याला अरेबिक आणि अर्धवट इंग्लिश यायचं. प्रमुख व्यक्ती म्हणून मला तिथल्या सरकारला अनेक कागदपत्रं सही करून द्यायची असायची. पण तिथला नियम असा होता की, कागदपत्रं अरेबिक भाषेतच टाइप करायला लागायची. सगळ्याचा परिणाम असा की, अरेबिकमधे टाइप केलेल्या अनेक पत्रांवर मला सह्या करायच्या असायच्या. दुभाष्या मला त्यांचा अर्थ सांगायचा आणि त्याच्यावर भरवसा ठेवण्याखेरीज मला उपायच नसायचा. कधी कधी मी ड्रायव्हरबरोबर दुभाष्या हजर नसताना मजकुराच्या योग्यपणाची खात्री करू शकायचो, पण त्याच्यादेखत ते शक्य नव्हतं. तो काम सोडूनच गेला असता. थोडक्यात काही वर्षं मी कशावर सह्या करतोय याची खात्री नसतानाच अनेक पत्रांवर सह्या

केलेल्या होत्या. ज्या अर्थी, मी तुरुंगात जाऊन पोचलो नाही, त्या अर्थी काही घोटाळा झाला नसावा.

भारतात, महाराष्ट्रात, अगदी पुणे शहरात मी पुणे महानगरपालिकेत अधिकारी लोकांना पत्रांच्या गठ्ठ्यावर भराभर सह्या ठोकताना बघितलंय्. ते हाताखालच्याला विचारायचे, ‘सगळं बरोबर लिहिलंय ना?’ तो कारकून अर्थात ‘हो’ म्हणायचा. मला माझ्या गल्फमधल्या दिवसांची नेहमी आठवण व्हायची. लिखाणाच्या अचूकतेसाठी केलेला हा संवादच. पण काय म्हणायचं या संवादाला?

## हावभाव, हालचाली यांच्यामधून संवाद

एका संवादाच्या प्रकाराचा इथे फक्त उल्लेख करतो. तो म्हणजे हालचाली, हावभाव यांच्या सहाय्यानी साधलेला संवाद. मी त्याच्या अभ्यासाला नुकतीच सुरुवात केली आहे. या पुस्तकसंचातला अगदी शेवटचा लेख ‘यापुढच्या दिशा’ यांच्यात त्याविषयीची थोडीशी माहिती दिलीय. हावभावांच्या भाषेला ‘कायिक’ संवाद असंही म्हणतात. मी जेव्हा ‘कायिक’ संवादाचा अभ्यास खोलात जाऊन करीन तेव्हा समुपदेशनात खूप गंमत येणार आहे. त्याचबरोबर प्रत्येक माणसाच्या हालचालींचा आणि हावभावांचा अर्थ लावण्याचा चाळा लागणार आहे. आहे खरी मजा!



# 2

# व्यक्तिमत्त्व विकास

## 1) आत्मविश्वास ऊर्फ व्यक्तिमत्त्वाचा पाया

मी एकूण 3 गोष्टी करतो. बांधकाम व्यवस्थापनात चांगलं आणि लवकर काम कसं करावं याचं शिक्षण देतो, कारण त्यामधे माझं मूळ शिक्षण आणि अनुभव आहे. दुसरी गोष्ट मी इंग्लिश संभाषणाचे वर्ग घेतो आणि तिसरी खूप महत्वाची म्हणजे विवाह-अभ्यास शिकवतो. त्यात समुपदेशन गट असतोच आणि व्यक्तिगत समुपदेशनही भरपूर असतं. मी इतरांसारखे व्यक्तिमत्त्व विकासाचे वर्ग चालवत नाही. तरीसुद्धा अनेक लोकांचा प्रश्न असतो की, आत्मविश्वास कमी पडतो, त्या न्यूनगंडामुळे प्रश्न निर्माण होतात. खरं तर हा प्रश्न समुपदेशनाचा आहे, पण त्याऐवजी लोक व्यक्तिमत्त्व विकासाच्या वर्गाला जातात. तिथे आयुष्यात सतत आपलं घोडं कसं पुढं दामटायला पाहिजे हे शिकून येतात. माझ्याकडे आत्तापर्यंत बऱ्याच वेळा 'तुम्ही आमच्या गटाचं व्यक्तिमत्त्व विकासाचं शिबिर घ्याल का?' अशी विचारणा झाली. माझ्या दृष्टिकोनातून 'स्पष्ट विचार, चिंतन, पृथक्करण, निर्णय आणि प्रत्यक्ष अंमलबजावणी' हा एकच मार्ग आहे आणि त्याचा मार्ग मी दाखवतो. त्यानी आत्मविश्वास निर्माण होतो आणि आपोआप व्यक्तीचा विकास होतो. आपण रोज काय उद्योग करतो आणि त्या कामातून आपल्याला समाधान मिळतं का नाही, हे समोरच्याला व्यक्त होतं. व्यक्तिमत्त्वातला हा एक महत्वाचा भाग आहे.

माणूस निरनिराळी कौशल्यं शिकतो म्हणजेच जीवनाला सामोरं जाण्याकरिता स्वतःचा विकास करत असतो. हे सर्व समुपदेशन प्रक्रियेत घडतं. त्यामुळे

समुपदेशन प्रक्रियेला विकासाचं साधन म्हणण्यात काहीच चुकीचं नाही. हे तुम्हाला मान्य असलं तर विचार करून, एकत्र बोलून प्रयत्न करून बघूया, असं मी सांगतो. बऱ्याच लोकांना हे कळत नाही, पचत नाही. पण ज्यांना पटलं अशांची मी अनेक शिबिरं, कार्यशाळा घेतल्या. काही निवडक कार्यशाळांचं वर्णन एकत्र करून मी आत्ता एक कार्यशाळा घेणार आहे.

माणूस अविवाहित असो, विवाहित असो, मध्यमवयीन असो नाहीतर वृद्ध असो, व्यक्तिमत्त्वाला महत्त्व कायमच असतं आणि प्रत्येक दिवशी व्यक्तिमत्त्व विकास होतच असतो. हा मुद्दा नीट समजावून घेण्याची फक्त जरूर आहे.

जीवनसाथमधे पूर्णपणे समानतेनी, स्त्रीपुरुष समानतेनी सगळे व्यवहार, कामं चालतात हे नक्की असतं. त्यामुळे इथपर्यंत मुली, स्त्रिया जास्त प्रमाणात येतात. मुळात आयुष्य समाधानकारपणी जगण्यासाठी त्याचं शिक्षण घेऊ अशी इच्छा पुरुषांच्यात कमी आढळते. या सगळ्याचा परिणाम म्हणजे जीवनसाथमधे मुली, स्त्रिया यांचं प्रमाण जास्त असतं. मला त्यातल्या काही स्त्रियांच्या सहवासाचं आकर्षण वाटतं हे खरंच आहे. ते आकर्षण मी माझ्या स्वतःच घालून घेतलेल्या बंधनांमुळे व्यक्त करत नाही, पण कदाचित ते दिसतही असेल, मला नेमकं माहीत नाही.

त्याचबरोबर काही बायका-मुलींना मी आवडतो हे मला कळतं आणि ती भावना आत्मविश्वास देते. ही गोष्ट सविस्तर सांगण्याचा उद्देशच तो आहे. स्त्री आणि पुरुष याच दोन मानवाच्या जाती असतात आणि पुरुषाचा आत्मविश्वास स्त्रियांना तो आवडतो असं त्याला वाटतं का नाही यावर अवलंबून असतो. स्त्रीचा आत्मविश्वास याच पद्धतीनी पुरुषांना ती स्त्री आवडते की नाही याबद्दल तिची काय कल्पना आहे यावर अवलंबून असतो. सभ्यतेच्या मर्यादा सांभाळायच्या असतात त्यामुळे चुकीची कृती करायची नाही, पण या बाबतीतला आत्मविश्वास हा प्रत्येकाच्या व्यक्तिमत्त्वाचा एक भाग असतो. जगातल्या लोकसंख्येपैकी निम्मे लोक भिन्नलिंगी आहेत हे मान्य केल्यावर त्यांच्याबद्दलचे आपले विचार आणि भावना आपल्या वागणुकीत दिसणार. तो व्यक्तिमत्त्वातला भाग आहे हेही मान्यच करायला हवं. त्याचाही अभ्यास करायला हवा.

कार्यशाळेमधे मी मिश्रगटाला काही प्रश्न विचारतो. प्रश्न असा– स्वतः विचार करून निर्णय घेणाऱ्याचं व्यक्तिमत्त्व सरस का दुसऱ्यानी केलेली आज्ञा मुकाट्यानी पाळणाऱ्याचं? प्रत्येक कार्यशाळेत लगेच उत्तर येतं, 'स्वतः निर्णय

घेणाऱ्याचं.’ या बाबतीत चांगलं व्यक्तिमत्त्व म्हणजे काय हे त्यावरून अगदी स्पष्ट कळतं. ज्याला व्यवस्थितपणी सर्व दिशांनी विचार करण्याची क्षमता आहे, विचार व्यक्त करण्याची कला आहे आणि समोरच्याला तो विचार नाही पटला तरी ते मान्य करण्याची तयारी आहे, पण स्वतःच्या वागणुकीचा आग्रह आहे ते व्यक्तिमत्त्व सरस.

एक गोष्ट मला पटलेली आहे. आपण प्रत्येक गोष्ट स्वतःच्या समाधानासाठी करतो. वरवर बघता आपण दुसऱ्याच्या फायद्यासाठी काहीतरी करतोय् असं दिसतं, पण त्यात आपल्याला समाधान मिळतं म्हणून आपण ती करत असतो. प्रत्येक निर्णय आपण स्वतः घेतलेला असतो आणि त्या निर्णयाची पूर्ण जबाबदारी पूर्णपणे स्वतःची असते. एखाद्या बाबतीत मी ठरवलं की, माझ्यापेक्षा या बाबतीत अमुक व्यक्तीला जास्त समजतं. त्यामुळे त्या बाबतीतला निर्णय त्यानी घेतलेला बरा. प्रत्यक्षात त्याला निर्णयाचे अधिकार देण्याचा निर्णय आपणच घेतलेला असतो ना! हे समजलं किंवा पटलं नसलं तर जरूर सांगा.

माणूस अडचणींवर मात कशी करतो ते व्यक्तिमत्त्वात खूप महत्त्वाचं असतं. अशा सरावासाठी काही पद्धती असतात. कशाची भीती वाटते त्या गोष्टी लिहून त्याची यादी बनवावी. त्या भीतिदायक गोष्टी प्रत्यक्षात करून बघायच्या आहेत, हे ठरवावं आणि त्या टप्प्याटप्प्यानी करायच्यात हे लक्षात ठेवून त्यातला पहिला छोटा टप्पा केव्हा करायचा ते ठरवावं. समजा पोहण्याची भीती वाटते, तर नुसतं उथळ पाण्यात डुंबायला जायचं अशी सुरुवात करावी. समजा, उंचीची भीती वाटते तर थोडं जास्त उंच, त्याहून थोडं जास्त उंच असं मुद्दामून चढायचं. थोडं थोडं वाढवत न्यायचं.

व्यक्तिमत्त्व-विकासाची एक व्याख्या म्हणजे प्रश्न सोडवण्याची क्षमता वाढणं. ही व्याख्या मान्य केली तर ज्यांच्यासमोर प्रश्न नाहीत अशांचा अभ्यास करायला लागतो. प्रश्न नसला की तो सोडवण्याचं ध्येय समोर नसतं. म्हणजेच कष्ट करून मिळवावं असं काही उरत नाही हीच समस्या बनते. ‘अलेक्झांडर द ग्रेट’ची अशी अवस्था झाली होती की जिंकायला कुठचाच देश उरला नाही. या इतिहासामधून शिकायचं काय हे ज्यानी त्यानी ठरवायचं आहे.

मी आणि शोभा पालक शिक्षणाच्या वर्गात ही गोष्ट आवर्जून सांगतो. मुलांसमोर प्रश्न उपस्थित झाले तरच मुलं प्रश्न सोडवायला शिकतात. तो म्हणजेच त्यांचा खरा विकास. आम्ही मध्यमवर्गीयांच्यात काम करत असल्यामुळे

जमलेले सगळे पालक मुलांना जास्तीतजास्त वस्तू उपलब्ध करून देण्याच्या मागे असतात. मुलांना शारीरिक श्रमांची सवय नसते, कधीही व्याकूळ करणाऱ्या भुकेचा अनुभव नसतो. सारांशात, 'नाही रे'च्या जगाची त्यांना कल्पनाच नसते. निराळ्या भाषेत सांगायचं तर, त्यांच्यासमोर पुरेसे प्रश्नच निर्माण होत नाहीत.

चांगल्या पालकांना व्यक्तिमत्त्व-विकासाचा हा अर्थ समजतो. मुलासमोर सोडवण्याजोगे प्रश्न निर्माण करणं, सोडवण्यासाठी उत्तेजन देणं, प्रश्न सोडवता आला की, शाबासकी देऊन जरा अधिक कठीण प्रश्न मुद्दामून निर्माण करणं हे पालकांचं कामच आहे. शाळेमधल्या अभ्यासाची देखील हीच प्रक्रिया असते.

आत्मविश्वास कशाच्या जोरावर मिळवायचा तर स्वतःच्याच ताकदीनी. स्वतःची ताकद म्हणजे शारीरिक ताकद नाही, तर विचारांची ताकद. ती विचारांची ताकद वाढवण्यासाठी अनेक प्रकारच्या माणसांना भेटायला हवं, निरनिराळ्या प्रकारचे विचार ऐकायला हवेत. ते विचार आपल्या कुटुंबाच्या विचारापेक्षा निराळे, विरोधी असले तर फार चांगलं. त्यामुळे स्वतःची ताकद वाढते.

खरं म्हणजे प्रत्येक नॉर्मल माणसाला आयुष्यातल्या अनेक घटनांविषयी काहीतरी मत असतंच, ते सौम्य, मध्यम, तीव्र कसंही असलं तरी संवादकलेच्या उणिवेमुळे लोक गप्प बसणं पसंत करतात. मतभेद असूनही व्यक्त न करणं हा एक प्रकारचा खोटेपणा असतो. त्यापेक्षा चांगली गोष्ट म्हणजे 'मी याच्याशी सहमत नाही' हे म्हणता येणं ही गोष्ट चांगल्या प्रकारानी जमायला लागली की आत्मविश्वास वाढत जातो.

आत्मविश्वासाची दुसरी एक व्याख्या आहे. आत्मविश्वास म्हणजे स्वतः स्वतःच्या घेतलेल्या परीक्षेत चांगले गुण मिळवून उत्तीर्ण होणं.

एखादं काम नेहमीपेक्षा जरा निराळं दिसलं की, लहान मुलं नको नको म्हणतात. काही मोठी माणसंदेखील असंच वागतात. त्यांना जास्त वेळ, जास्त पैसे देऊ केले की, अशी माणसं आणखीनच बावचळतात कारण ते नकार देणार हे त्यांनी आधीच ठरवलेलं असतं.

सामान्य गुणवत्तेचा एखादा माणूस असला तरी कठीण प्रसंगी त्याला काहीतरी निर्णय घ्यावाच लागतो. एकट्यानी बाजूला पडून निराळा निर्णय घेणं त्याला कठीणच असतं. तो गर्दीत सामील होणं पसंत करतो. अशी माणसं आपल्या समाजात खूप आढळतात.



## 2) बाह्यरूप

व्यक्तिमत्त्व म्हटल्यावर तुमच्या मनात काय येतं असं विचारल्यावर प्रथम उत्तर येतं ते रूप. रंग, चेहरा यांना जगात, भारतात, महाराष्ट्रात महत्त्व आहे हे नाकबूल करताच येणार नाही. त्यानंतर उंची, शरीरयष्टी, सुदृढपणा. चांगला, सुस्वरूप चेहरा असला तर प्रथमदर्शनात त्या माणसाचा प्रभाव पडतोच. इतरांचा स्वतःवर पडलेला प्रभाव आणि आपला दुसऱ्यावर पडलेला प्रभाव दोन्ही गोष्टी. आठवून बघाव्या. हा विचार करताना समजा, भिन्नलिंगी माणसाचा विचार आला तर त्यातला स्त्री-पुरुष आकर्षणाचा भाग वगळून फक्त आदराचा किंवा वात्सल्याचा विचार करा. मी स्वतः शाळा, कॉलेज, नोकरी, परदेश असे आयुष्यामधले निरनिराळे काळ आठवून बघतोय्. जी माणसं मला प्रथमदर्शनात आवडली होती आणि नंतरही आवडत राहिली, त्यांपैकी एक माझा पुरुष ब्रिटिश बॉस होता. तो अतिशयच देखणा होता.

भारतातल्या व्यवसायामधे अनेकांना मी कामावर नेमलं. त्यावेळी त्यांची मुलाखत घ्यायचे प्रसंग आले. दोन माणसं सारख्या गुणवत्तेची असली तर मी हमखास दिसायला चांगली व्यक्ती निवडायचो हे कबूलच करायला हवं. आमच्या घरातल्या कामवाल्यांची नेमणूक शोभा करते. कामवाल्यांच्या रूपाशी माझा काही संबंध नाही, असं असूनही जरा दिसायला चांगली मुलगी किंवा बाई असली तर शक्यतोवर त्याच बाईला शोभानी नेमलं तर बरं असं मला वाटतं.

नितळ त्वचा असणं-नसणं ही निसर्गाची किमया असते. आमच्या कुटुंबात अशी देणगी कोणाला नाही, पण मी असे निरनिराळ्या वयाचे स्त्री-पुरुष बघितले आहेत. त्यांची संगमरवरी त्वचा आपल्याला थक्क करते. एक गोष्ट नक्की आहे. काही गोष्टी आनुवांशिक असल्यामुळे आपल्या हातात नसतात. त्या सोडून देता यायला पाहिजेत. ज्या आपल्या हातात आहेत त्या मात्र मनापासून प्रत्यक्ष केल्या पाहिजेत.

मला लहानपणीच कळलं होतं की, मी दिसायला आमच्या सगळ्या कुटुंबात नित्कृष्ट आहे. आई-वडील आणि दोन्ही बहिणी माझ्यापेक्षा दिसायला चांगल्या. बहिणींच्या तुलनेत मी कमी गोरा, त्वचा खरखरीत, हे सगळं मला

आरशात बघताना जाणवत होतं. त्यात चष्मा लागला. मनावर कायमचा वाईट परिणाम अटळ होता. आता कोणाचा विश्वास बसणार नाही, पण तेव्हा मी सरळसरळ अबोल होतो, कारण पुरेसा आत्मविश्वास नव्हता.

एक जमेची बाजू होती, ती म्हणजे उंची. नापसंत असलेल्या चेहऱ्याची भरपाई करण्यासाठी मी व्यायाम चालू केला. शरीर कमावल्यावर मला जरा बरं वाटायला लागलं. मी स्वतः स्वतःला पुरेसं आवडणं जरुरीचं होतं कारण त्यावर तर आत्मविश्वास अवलंबून होता.

वय वाढलं की व्यक्तिमत्त्व प्रभावी दिसण्यातल्या अडचणी वाढतात. तशा माझ्या अडचणी वाढल्या. मी काही वर्षं केस रंगवायचो, कारण ते अर्धवट पांढरे व्हायला लागले होते. हळूहळू दाढी पांढरी व्हायला लागल्यामुळे दाढीही रंगवायला लागलो. दाढी छोटी, अर्धी, मोठी, बरेच प्रयोग केले. आरशात बघून स्वतःला पसंत पडेल असा चेहरा अजूनही मला पूर्णपणी जमलेला नाही. आपल्या सगळ्यांच्या चेहऱ्याची एक गंमत सांगतो. आपण स्वतःचा चेहरा रोज बघतो. त्यामुळे तो 'सिमेट्रिकल' आहे का नाही, आपल्याला स्वतःला समजत नाही. दुसऱ्यानी आपल्याला आरशात बघितलं तरच ते समजतं. त्यासाठी दोन माणसांनी आरशासमोर उभं राहावं लागतं. बहुतेक लोकांच्या चेहऱ्यात डावी आणि उजवी बाजू किंचित निराळी असते. डावी-उजवी बाजू पूर्ण सारखी असलेली माणसं क्वचित असतात.

काहीतरी निराळं करण्याची अनेकांना हौस असते. इतरांपेक्षा वेगळं असलं की खास वाटतं. अशा निराळेपणासाठी मुलगे पोशाख चित्रविचित्र करतातच, त्याखेरीज काहीजण वेणीसुद्धा घालतात. मुलग्याच्या एका कानात भीकबाळी तर अनेक ठिकाणी दिसायला लागलीय्.

मधल्या एका काळात साधारण 30-35 वयामधे माझा प्लास्टिक सर्जरी करवून घेऊन चेहरा सुधारण्याचा विचार होता. त्याला लागणारा खर्च आणि व्यवसायातून घ्यावी लागणारी रजा यांचं गणित न जमल्यामुळे मी त्या भानगडीत पडलो नाही. एक ओळखीचा माणूस माझ्यासारखा दिसतो. माझ्यापेक्षा तो थोडा लहान आहे, पण खऱ्या वयापेक्षा मोठा दिसतो. मी खऱ्या वयापेक्षा जरा लहान दिसतो. त्याचा स्वभाव चांगला नाही. मी त्याच्यासारखा दिसतो असं कुणी म्हटलेलं मला आवडत नाही. पण आमच्यात खरोखरच साम्य असल्यामुळे माझी त्यातून सुटका नाही. माझ्या बाजूनी मी त्याच्यापेक्षा निराळं दिसण्याचा प्रयत्न

करायचो. दाढी, मिशा, केस या सगळ्या बाबतींतला माझा करविता तो माणूस होता. काही वर्षांपूर्वी तो वारला आणि माझी खरी सुटका झाली.

मला एकूणच नटणं आवडत नाही. स्त्रियांनी नाही आणि पुरुषांनी नाही. कित्येक स्त्री-पुरुष स्टाइल म्हणून चांगलं दिसण्यासाठी गॉगल वापरतात. बर्फाळ प्रदेशात सूर्यकिरण फार प्रखर होतात किंवा कडक उन्हात थेट सूर्याकडे बघण्याचा प्रसंग असला तरच माणसाच्या डोळ्याला गॉगलची गरज असते, नाहीतर एरवी आपले डोळे कमी-जास्त प्रकाश सहन करण्याइतक्या क्षमतेचे असतात. त्यामुळे सारखा गॉगल केवळ स्टाइलसाठीच वापरला जातो, याबद्दल माझी खात्री झाली आहे. मी आणि शोभा आत्ता म्हणालो, त्या प्रसंगाव्यतिरिक्त कधीच गॉगल वापरत नाही. अनेकांना गॉगल हा व्यक्तिमत्त्व सुधारण्यासाठीच्या महत्त्वाच्या साहित्यांपैकी एक वाटतो हे मला माहिती आहे. प्रत्यक्षात त्यातली मुख्य अडचण दुसऱ्याला आपले डोळे न दिसणं ही आहे. डोळ्यांमधले भाव तर खूप महत्त्वाचे असतात.

उठावदार व्यक्तिमत्त्वासाठी लोक अंगठी वापरतानाही दिसतात. प्रत्यक्षात एक अंगठी म्हणजे एक अस्वच्छतेचा उगम. अंगठी हातात ठेवून हातानी जेवणं काय किंवा हातानी ढुंगण साफ करणं काय, ती घाणच. अंगठी काढून ठेवली तर विसरण्याचा धोका असतो. नाही काढली तर अस्वच्छतेची शक्यता. आणि तरी एकच काय, दहा बोटांत दहा अंगठ्याही घालणारी लोकं आहेत.

पोषाखाच्या अनेक पद्धती असतात आणि त्या सगळ्या चांगल्याच असतात. एखादी पद्धत मला आवडते का नाही हा स्वतंत्र प्रश्न आहे. माझी स्वतःची विचाराची पद्धत अशी आहे की, पद्धत सोयीची, आरामशीर आणि सुबक हवी. दोन पायांची हवी तशी हालचाल करता यायला हवी असेल तर दोन पाय असलेलाच पोशाख हवा. पँट, सलवार, लेंगा, धोतर या सगळ्यात पाय निराळे हलू शकतात. स्त्रियांची नऊवारी साडीदेखील या वर्णनात बसते. बसत नाही ती पाचवारी साडी आणि लुंगी. हे दोन पोषाख एवढे लोकप्रिय कसे हे मला समजू शकत नाही कारण त्यांत पाय बांधले जातात. स्त्रिया साडीत चांगल्या दिसतात असं मला वाटतं, पण स्त्रियांना पायांच्या हालचालीवर मर्यादा आसल्यामुळे त्रास होत असावा अशी मला नेहमी शंका येते. स्त्रियांच्या हाउसकोटविषयी मला असंच वाटतं. दक्षिणी लोक किंवा उत्तरेकडे लुंगी वापरतात तशी मी वापरून बघितली आहे, पण मला ती कधीच आवडली नाही. पाय बांधले जाण्याची एक

अडचण आणि शिवाय ती दिसायलाही चांगली नाही. त्याखेरीज ती निसटण्याची, पाय अडखळण्याची भीती असतेच.

मी पोषाखामधले प्रयोग करून बघायला अजिबात घाबरायचो नाही. एकेकाळी मी पँटला इस्त्रीच्या जागी शिंप्याकडून शिवण मारून घेतली होती. असं काही करून बघणं याला लोक चक्रम म्हणतात. प्रत्यक्षात काहीही करून बघणं, वागून बघणं याला खूप जास्त धाडस लागतं. माझ्याकडे ते धाडस असल्यामुळे कोणी विक्षिप्त म्हटल्याची क्षिती मला वाटत नाही.



## 3) बोलणं

मला स्वतःला अशी बरीच माणसं माहिती आहेत की ती दिसायला बरी, नीटस, चांगलीही असतात. ती बोलायला लागली की, त्यांच्याविषयीचं आपलं मत बदलतं. आवाज वाईट, अशुद्ध भाषा, उद्धट स्वर, बेपर्वाईची नजर– अनेक घोटाळ्यांना सुरुवात होते. काही लोकांच्या विचारात दोष असतो तो बोलण्यात उतरतो. सतत कोणाची तरी हेटाळणी, नावं ठेवणं चालू असतं.

सतत चेष्टा केल्याच्या सुरात बोलणं हा देखील दोषच आहे. हसतमुख चेहऱ्यानी, समतोल विचारांनी, गंभीरपणे मुद्देसूद पद्धतीनी विचार मांडणं हेच खरं. समोरचा माणूस आपल्यावर टीका करत नसला आणि तिसऱ्याच कुठच्यातरी माणसाविषयी असभ्य, अन्यायकारकपणी बोलत असला तरी समोरच्याविषयी आपलं मत तयार होतंच.

बोलताना चाचरणं हा उघड वाचादोष असतो, पण काही लोकं विचार करताना अडखळतात, त्यामुळे बोलताना अडखळतात. त्यातले काही लोक सारखा 'हे'चा वापर करतात. मधूनमधून 'काय म्हणतात त्याला,' म्हणतात, 'आपलं, म्हणजे' या शब्दांचा सारखा वापर करतात. याउलट चांगल्या व्यक्तिमत्त्वाच्या माणसाकडून बोलण्याचा, शब्द सुचण्याचा ओघ असणं अपेक्षित असतं. अशा लोकांचं भाषाप्रभुत्व दुसऱ्यावर छाप पाडतं.

एकापेक्षा अधिक भाषा येणं याचाही दुसऱ्यावर चांगला परिणाम होतो. महाराष्ट्रात आपली समाजभाषा मराठी आहे. चांगलं, शुद्ध, सोपं मराठी बोलणं ही खूप महत्त्वाची गोष्ट ठरते. त्याखेरीज इंग्लिशवर प्रभुत्व असलं तर बराच प्रभाव पडतो. प्रभावी व्यक्तिमत्त्वासाठी एवढी धडपड ज्यांना शक्य आहे त्यांनी जरूर करावी.

काही लोकं बोलणं थांबवूच शकत नाहीत. आमच्या ओळखीचे एक गृहस्थ प्रचंड बडबडे आहेत. मी आणि शोभा त्यांचा उल्लेख बडबडसिंग असा करतो. हा व्यक्तिमत्त्वातला दोषच आहे, तरीही हे गृहस्थ आम्हाला दोघांना आवडतात कारण ते मनानी अगदी निर्मळ आहेत.

मला अशी बरीच लोकं माहिती आहेत की, जी स्वतःचे विचार काय

आहेत हे दुसऱ्याला समजावून सांगू शकत नाहीत. अशा प्रकारचा स्वभाव, त्यात तो माणूस हट्टी आणि त्यात पुरुष असला तर अशा संसारातल्या बायकोचे हाल काही विचारायलाच नकोत. अशी माणसं मतभेद व्यक्त करण्याचा आत्मविश्वास नसल्यामुळे गप्प बसतात आणि मग भलत्या वेळेला त्यांच्या भावनांचा स्फोट होतो.

बोलणं हा विषय निघाला की अनेक लोकांच्यासमोर भाषण करणं म्हणजेच वक्तृत्व डोळ्यांसमोर येतं. त्याचे अनेक प्रकार गेल्या पन्नास-साठ वर्षांत मी स्वतः बघितलेले आहेत.

काही लोक खाजगीत बडबडे असतात. पण परक्या लोकांसमोर काही बोलायचं म्हटलं की त्यांचे पाय लटपटतात, घसा कोरडा पडतो, तोंडातून शब्द बाहेर फुटत नाहीत. ही अवस्था अर्थातच चांगली नाही. काही लोक त्याला उपाय म्हणून आपले विचार सरळ लिहून आणतात आणि ते वाचून दाखवतात. त्याच्या पुढच्या पायरीवर पोचण्याचा प्रयत्न थोडा कठीण असतो पण ते जमलं की बोलण्याचा आत्मविश्वास येतो. मुद्दे लिहायचे आणि ते मधूनमधून बघत बोलायचं. सुरुवातीला मुद्दे फार तर मोठ्या अक्षरांत लिहावेत. अशा तऱ्हेनी मुद्द्यांवरून बोलण्याचा दोन-चारदा सराव झाला की हळूहळू मुद्दे नसले तरी चालतात.

माझं स्वतःचं मत मात्र असं आहे, कितीही वर्षांचा अनुभव असला तरी मुद्दे लिहिणं गरजेचं आहे. मी तसं कटाक्षानी करतो. मुद्दे भरकटत जाऊन घोटाळा झाल्याचं उदाहरण मी भल्या भल्या वक्त्यांचं बघितलं आहे.



## 4) चेहऱ्यावरचे भाव

चेहऱ्यावरच्या भावांचा विचार केला की, मला आमच्या ओळखीची एक मुलगी आठवते. चक्क नाकीडोळी सुस्वरूप, बघितल्यासरशी आवडण्याजोगी. पण बोलायला सुरुवात केली की, 2-5 मिनिटांत हिच्या बाबतीत काहीतरी घोटाळा आहे,' असं जाणवतं. तिच्या डोळ्यांत काही दोष नाही, बोलण्यातही नाही. त्या मुलीचा आपल्यावर विश्वास नाही, अशी भावना होते. तिचं एवढंच वर्णन मी एवढ्या वर्षांच्या ओळखीनंतर, एवढ्या वर्षांच्या माझ्या मनाच्या अभ्यासानंतरही करू शकतो.

माझ्या आणि शोभाच्या ओळखीचं दुसरं एक जोडपं आहे. मध्यमवर्गीय, मध्यम आकाराचे, मध्यम रूपाचे दोघंही आहेत. त्यांना भेटल्यावर पहिल्या काही मिनिटांत आपण निश्चिंत होतो, अशी त्यांच्याकडे जादू आहे. त्यांच्या चेहऱ्यांवरच्या भावाचं वर्णन करण्याचा मी प्रयत्न करतो. स्मित करणाऱ्या चेहऱ्यावर दिसणाऱ्या भावना शांत, समाधानी. चेहऱ्यावर जगण्याचा उत्साह, चैतन्य. बोलणं सभ्य, मृदु, संयत आणि तरी स्पष्ट. आवाज घोगरा किंवा किरटा नाही. आवाजातून समजूतदारपणा, दुसऱ्या व्यक्तीविषयी कदर जाणवते. बोलणं सुसंस्कृत. दुसऱ्याला गृहीत न धरणारं. शिक्षण भरपूर. दोघांनाही कामाचा, इतर जगाचा भरपूर अनुभव. बोलण्यात विनय आणि सभ्यपणा. समोरच्याशी एकाग्र होऊन बोलणं. पोषाख मध्यम दर्जाचा, नीटनेटका, फिक्या रंगाचा. एकूण व्यक्तिमत्त्व जरा बघितल्यावर, बोलल्यावर समतोल वाटावं असं. मला स्वतःला 'समतोल' याचं फार महत्त्व वाटतं. माणसाच्या दिसण्यातून, बोलण्यातून, हालचालींतून, वागण्यातून 'समतोल' हे व्यक्त होत असलं तर सगळं काम झालं समजायचं.



## 5) चुकीच्या लकबी

एखाद्याला काही शारीरिक व्याधी असली तर त्यामुळे ज्या चांगल्या-वाईट हालचाली होतात त्यांना लकब म्हणता येत नाही. पण नॉर्मल, धडधाकट शरीर असताना काहीतरी चमत्कारिक, दुसऱ्याच्या नजरेला खुपेल अशी हालचाल होत असली तर ती व्यक्तीच्या मनाशी जोडलेली असते.

मला अशी माणसं माहीत आहेत की, जी जेवताना ताटातल्या पदार्थात बोटं घालून तशीच थांबून राहतात. काही हातातला घास तोंडात घालण्याऐवजी काही अंतरावरून फेकतात. काही माणसांना सवयी चमत्कारिक असतात. एका विशिष्ट सवयीचं मला नेहमीच नवल वाटत आलेलं आहे. पाणी पिताना लोक घोट गिळण्यापूर्वी गाल फुगवून चूळ भरतात. माझ्या मते ती पाच सेकंद गाल फुगवलेला चेहरा वाईट दिसतो याचं त्यांना काही वाटत नाही. काही लोक टेबलावर कोपर टेकवतात आणि एका गालाखाली पंजा धरून बसतात. या प्रकारात त्यांचा चेहरा वाकडा, थोडक्यात वाईट दिसतो, याचं त्यांना काही वाटत नाही.

आमच्या ओळखीचा मुलगा सारखा दर दोन मिनिटांनी स्वतःचं नाक चोळतो. सुरुवातीला भेटल्यावर लोकांना वाटतं, याला सर्दी झाली असेल. त्यानंतरच्या भेटीत खरं काय ते लक्षात येतं. ही लकब हे न्यूनगंडाचं लक्षण आहे. त्यामुळे ही सवय सोडण्याचा प्रयत्न कर हे त्याला कोण सांगणार? एकमेकांच्यात त्याचा उल्लेख मात्र सगळेजण नाकचोळे असा करतात. काही लोक बसले की, लगेच पाय हलवायला सुरुवात करतात. काही सारखी बोटं मोडतात. काही हाताचा पंजा मनगटापासून गोल फिरवतात. ही सगळी अस्वस्थतेची लक्षणं आहेत.

शक्यतोवर असा प्रयत्न करावा की, बघणाऱ्याच्या नजरेला खुपतील अशा काहीच लकबी नसतील. समजा, अशी एखादी स्वतःची लकब घालवायची असं स्वतः ठरवलं असेल तर कोणालातरी आपल्या हालचाली मोबाईल कॅमेऱ्यावर 'शूट' करायला सांगून स्वतः त्या आवर्जून बघाव्यात. नक्की उपयोग होतो.

अगदी कायम लक्षात ठेवायची गोष्ट म्हणजे काहीही केलं तरी ते सुबक हवं. दिसायला चांगलं हवं.



## 6) फसवेगिरी - खोटेपणा

अगदी लहानपणी मुलं खोटं बोलतात. त्यांच्या कल्पनेतल्या घटना खऱ्या घडल्यासारख्या सांगतात. अशा थापा निरुपद्रवी असतात.

मुलं जरा मोठी झाली की, म्हणजे 5 वर्षांची झाली की, हेतुपूर्वक, स्वतःचा उद्देश साधण्यासाठी खोटं बोलायला लागतात. पालकांची मुलांवर चांगले संस्कार करण्याची इच्छा असते. त्यामुळे बहुतेक पालक मुलांना 'खोटं बोलू नये,' असं सांगतात. पण स्वतः त्यांच्यादेखत अनेक बाबतींत खोटं वागतात, खोटं बोलतात, अनेक गोष्टी अनेकांपासून स्वार्थी हेतूंनी लपवतात. 10 वर्षं हा मुलांच्या वयाचा पुढचा महत्त्वाचा टप्पा असतो. तोपर्यंत ती खोटं बोलायला शिकली तर पुढे ती सवय घालवणं कठीण असतं.

10 वर्षांनंतर पालकांपेक्षा शाळा, मित्रमंडळींची संगत याचा प्रभाव मुलांवर खूप असतो. त्यानंतर मुलं स्वतःच्या बुद्धीनी निर्णय घ्यायला लागतात. याचाच अर्थ ती सुधारू शकतात किंवा बिघडू शकतात. मग ते व्यक्तिमत्त्व साधारणपणे त्यापुढे बदलत नाही. प्रामाणिकपणाकडे झुकलेलं व्यक्तिमत्त्व कमी तरुणांचं असतं. बिघडलेली, आईवडलांशी, भावंडांशी खोटं बोलणारे तरुण-तरुणी जास्त संख्येनी असतात.

फसवेगिरी आणि स्मार्ट असणं यातला फरक अशा मुलामुलींना समजत नाही. फसवेगिरीचं हळूहळू विकृतीमधे रूपांतर व्हायला लागतं. आपल्या समाजातल्या एरवी सभ्य वाटणाऱ्या पण या एका बाबतीत विकृत असलेल्या समाजाचं मला नेहमी आश्चर्य वाटायचं. एवढ्या वर्षांच्या अनुभवानी आता आश्चर्य वाटत नाही, वाईट वाटतं. भ्रष्टाचारी, अफरातफरी करणारा, सरकारला म्हणजे आपल्यालाच फसवणाऱ्या लोकांचं त्यांना कौतुक वाटतं. समाजातले हर्षद मेहता हीरो होतात. त्यांना आदराचं स्थान मिळतं. लोकप्रिय लोकांच्या यादीत अशा लोकांचं नाव खूप वर असतं. गुन्हेगारांविषयी आदर वाटायला लागलेले बरेच तरुण मुलगे दिसतात. ते गुन्हा करत नाहीत ते केवळ धाडस कमी पडल्यामुळे. अशा प्रकारची मुलं-मुली पहिल्या भेटीत खूप प्रभावी दिसतात. नंतर हळूहळू घोटाळे करायला लागतात.



# 7) कुचाळक्या - एक विकृती

कुचाळक्या ही माझ्या दृष्टीनी जास्त प्रमाणात बायकांची मक्तेदारी आहे. मला याचं कारण असं वाटतं की, एकूणच जवळजवळ सगळ्या बायकांना जवळजवळ सगळ्या पुरुषांचं वागणं पसंत नसतं. त्यांची पुरुषप्रधानता बायकांना बोचत असते. त्यात सर्वसाधारण पुरुषांची स्त्रियांच्या बाबतीतली लैंगिक विकृती त्यांना माहिती असते. तरीही त्याविषयी उघड उघड पुरुषांच्या देखत बोलणं कठीण असतं. याचा परिणाम गॉसिप असावा.

पुरुषांचीही तीच परिस्थिती असते. समोर बोलण्याचं धाडस कमी असलं की मग ते अभिव्यक्तीसाठी दुसरे मार्ग शोधतात. निनावी पत्रं लिहितात. वासूनाक्यावर म्हणजे घराच्या कोपऱ्यावर उभे राहून मुलींची टिंगल करतात. आपल्याच कॉलनीतल्या लहानपणापासून मैत्री असलेल्या मुलीदेखील त्यातून सुटत नाहीत. असे लोक बाजारात मिळणाऱ्या विवस्त्र बायांची चित्रं जपून ठेवतात. अशी मॅगेझीन्स आणि पिवळ्या जिलेटीन पेपरच्या वेष्टनातली 'सेक्स बुक्स' मिळतातच. शिवाय इंटरनेटवर या सगळ्या गोष्टी हजरच असतात. असे लोक मग सार्वजनिक स्वच्छतागृहांमधे मजकूर लिहितात, चित्रं काढतात, तेवढं धाडस नसलं तर निदान चवीनी तो वाचतात. कॉलेजेसमधे फिशपाँडचा कार्यक्रम असतो. त्यात मुलींना फिशपाँड देण्यात त्यांना फार गंमत वाटते कारण स्वतःचं नाव गुप्त राहतं. अमूक गोष्ट कोणी केली हे बरेच वेळा शोधून काढणंही शक्य असतं. पण कोणीच कबूल करीत नाही. न्यायालयापर्यंत जाण्याएवढा हा मुद्दा महत्त्वाचा नसतो त्यामुळे कशानी काही साध्य होत नाही. या एका बाबतीत म्हणजे असभ्य लैंगिक वर्तनाच्या बाबतीत भारतीय मुली आणि स्त्रिया पुरुषांच्या तुलनेत फार सभ्य म्हणजेच चांगल्या व्यक्तिमत्त्वाच्या आहेत.

या सगळ्या लैंगिक विकृतीच्या बाबतीत भारतीय पुरुष याही अवस्थेच्या पुढे जाऊ शकतात. काही लोक मुली, स्त्रिया यांच्यासमोर जाऊन असभ्य बोलतात. तितपत निर्ढावलेली ही 'धाडसी' मंडळी असतात. साधारणपणे असा कोणी एकटा नसतो. त्याच्याबरोबर टोळकं असतं. ते मग विनयभंगाचा प्रयत्न करतात, भलतीकडे स्पर्श, चुंबनाची, फ्रेंडशिपची मागणी, त्याची जबरदस्ती,

ॲसिडची धमकी, निंदा-नालस्तीची धमकी देतात. आणखी 'धाडसी' असले तर टोळीनी बलात्कार करतात. काही मारामारी, खून, प्रेमाखातर हत्या अशा-पर्यंतही पोचतात.

कुचाळक्या, पाठीमागे नावं ठेवणं ऊर्फ 'गॉसिप'पासून बलात्कार करणं ही विकृतीचीच रूपं आहेत. तीव्रतेमधे फक्त फरक असतो.

व्यक्तिमत्त्व या विषयाचा अभ्यास करताना काय नाही करायचं हे ठरवावं लागतं. त्या यादीत कुचाळक्या अजिबात करायच्या नाहीत हा निर्णय एकदम पक्का हवा.



# 8) अंगचे कलागुण

आपल्यामधे एखाद्या खेळाचा, कलेचा पैलू असला तर त्याचा फारच फायदा होतो. खरं म्हणजे चरितार्थ चालवण्यासाठी काहीतरी कामधंदा तर प्रत्येकाला करावा लागतो. एखादी कला, एखादा खेळ हा देखील चरितार्थाचा उद्योग असणारे खूप लोक असतात. टेलिव्हिजनच्या एवढ्या चॅनेल्सवर 24 तास एवढे कार्यक्रम असतात. त्यात पडद्यावर आणि पडद्यामागे काम करणारे लाखो लोक हाच व्यवसाय करतात. खेळ हाच व्यवसाय असणारेही खूप लोक आहेत.

अनेक गोष्टींत खरा रस घेणारे लोक असतात. त्यांना लोक रसिक म्हणून ओळखतात. लोकांनी आपल्याला रसिक म्हणून ओळखावं म्हणून काही लोक रसिकतेचा खूप देखावा करतात. या दोन्ही वर्णनांचे लोक निराळे ओळखू येतात.

आपल्या मेंदूला जशी झोपेमुळे विश्रांती मिळते, तशी खेळ खेळून, कलेचा अविष्कार करून किंवा आस्वाद घेऊनही मिळते. एखाद्या चेंडूकडे जेव्हा आपलं लक्ष केंद्रित होतं तेव्हा, त्या तात्पुरत्या काळात आपण इतर सगळ्या काळज्या विसरतो. तसंच गाण्याचं, नृत्याचं आहे. एरवी एखाद्या काळजीच्या घटनेमुळे आपण दिवसरात्र अस्वस्थ असतो, मेंदू अगदी शिणून जातो. खेळात शरीरालाही व्यायाम होतो तो निराळाच. बुद्धिबळ, पत्ते हेही खेळ सगळ्या काळज्या विसरायला लावतात. शिवाय अशा छंद, खेळांचा उपयोग समाजात मिसळण्यासाठीही होतो.

संगीत आणि नृत्य या अशाच दोन महत्त्वाच्या गोष्टी आहेत. त्या सगळ्या इतर चिंता विसरायला मदत करतात. संगीत कुठच्याही प्रकारचं असो, शास्त्रीय असो, सुगम संगीत असो, सिनेमा, नाट्यसंगीत, पाश्चात्त्य, अरेबियन, आफ्रिकन कसंही असलं तरी ते ऐकण्याचा, म्हणण्याचा आनंद एकदम खास असतो. वाद्यसंगीताचंही तसंच.

माझं स्वतःचं मत असं आहे की, गायकानी वाद्य, ताल यांच्या साथीशिवाय गाऊ नये. अनेक लोक गाणाऱ्या व्यक्तीला एरवीच सहज भेटीत गाण्याचा आग्रह करतात. ती गाणारी व्यक्ती संकोचानी होकार देते, पण कुठच्याही गाणाऱ्याला मनातून ते आवडत नाही. नृत्याचेही अनेक प्रकार असतात. त्याबद्दल मात्र

गाण्यासारखी चुकीची गोष्ट क्वचित घडते. नाचाला संगीत लागतं, घुंगरु, विशिष्ट पोषाख, सपाट स्वच्छ जागा लागते त्यामुळे कोणालाही कुठेही नाचायला सांगता येत नाही. गाणारी आणि नाचणारी व्यक्ती कलाकार म्हणून लोकांच्या चांगली लक्षात राहते.

आपल्या सगळ्यांच्या व्यक्तिमत्त्वावर चित्रपट, नाटक, साहित्य यांचा सतत परिणाम होत असतो. तो चांगला आणि वाईट दोन्ही असतो. चांगला का वाईट हे मात्र आपल्या दृष्टिकोनावर म्हणजेच आपल्या व्यक्तिमत्त्वाच्या प्रकारावर अवलंबून असतं. सगळ्या सिनेमा-नाटकांच्यात भावनांचं अतिशयोक्त चित्रण असतं. त्यामुळे काहींवर त्याचा इतका परिणाम होतो की, त्यांना लोक 'सूत नाहीतर भूत' म्हणून ओळखायला लागतात. शिवाय ते सतत कुठच्यातरी सिनेमा, टी.व्ही. सीरियल- यांच्यामधल्या पात्राच्या भूमिकेत जगतात. एखादा मुलगा स्वतःला आमीर, सलमान, शाहरूख समजतो. एखादी मुलगी स्वतःला कतरीना, माधुरी, श्रद्धा, आलिया समजून वागते. सबंध व्यक्तिमत्त्वाचा घोटाळा होतो.



# 9) छंदापासून व्यसनापर्यंत

छंद ही चांगली गोष्ट आहे यात काही वादच नाही. काही छंदांचा खाण्यापिण्याचा संबंध नसतो तर काहींचा असतो. जिथे खाण्याचा किंवा पिण्याचा संबंध असतो तिथे जास्त काळजी घ्यावी लागते.

प्रत्येक छंदामधे मनोरंजन तर होतंच. मनोरंजन ही आवश्यक गोष्ट आहे हे नक्की. त्यासाठी संगीताबरोबर वाचन, रंगमंच याचबरोबर प्रवास, गिर्यारोहण हेही छंद म्हणून किंवा व्यवसाय म्हणून उपयोगी पडतात. वाहनांच्या, प्राण्यांच्या शर्यती यांनीही मनोरंजन होतं. काही मनोरंजनाचे प्रकार हिंस्र असतात. कोंबड्यांच्या, बोकडांच्या झुंजी, शिकार हे त्यांतले मुख्य प्रकार.

मेंदूला तात्पुरती झिंग आणणारी व्यसनं यांची सुरुवातही स्टाईलमुळे, मेंदूला शीण आल्यामुळे, शारीरिक, मानसिक थकव्यामुळे होते, पण तेही मनोरंजनच. पान-तंबाखू, सिगारेट, दारू, अफू हे एका अवस्थेनंतर मनोरंजन न राहता व्यसन होतं. सुरुवातीला लोक दारू पितात ते चांगल्या चवीसाठी पीत नाहीत. त्याच्या नशेसाठी पितात. दारुची चव आवडण्याजोगी कधीच नसते. ज्याला चव 'डेव्हलप' करणं म्हणतात ते झालं की त्यानंतर धोका असतो. व्यसनात रूपांतर झालेलं असलं तर व्यक्तिमत्त्वाचाच तो भाग बनतो. त्या विशिष्ट व्यक्तीची इतरांच्या दृष्टीनी तीच मुख्य ओळख बनते.

समतोल व्यक्तिमत्त्व आणि व्यसन या दोन्ही गोष्टी एका माणसात असूच शकत नाहीत. व्यसनाच्या अवस्थेत माणसाचा विवेक नाहीसा होतो म्हणून तर त्याला व्यसन म्हणतात. व्यक्तिमत्त्व विकासाचा प्रश्नच येत नाही. प्रत्येक नॉर्मल माणसाला स्वतःचं आरोग्य सांभाळण्याची जबाबदारी उपजतच कळते. ही उपजत बुद्धी व्यसनात नाहीशी होते. स्वतःबद्दल काही काळजी वाटत नाही. ती व्यक्ती कुटुंबाची, मुलांची जबाबदारी घेण्याचा प्रश्नच येत नाही. त्या व्यसनांसाठी लागणारे पदार्थ विकणाऱ्या दुकानदारांचा, दलालांचाच विकास फक्त शक्य असतो.

छंद जोपासायचा तर त्यात मन आणि शरीर दोन्हींना आनंद झाला पाहिजे. ट्रेकिंग हा एक असा छंद आहे की, ज्यानी शारीरिक क्षमता वाढते आणि खूप आनंद मिळतो. सपाट भागात ट्रेकिंग करणारे असतात, पण गिर्यारोहणात जास्त

मजा येते असं सगळे म्हणतात. ट्रेकिंग करणारा प्रत्येक जण स्वावलंबनाचेही धडे गिरवतो आणि अपघाताच्या प्रसंगी एकमेकांना मदत करणंही शिकतो. अशा लोकांचं आरोग्य उत्तम राहतं, साध्या राहणीची सवय लागते. थोडा खर्च होतो, पण इतर अनेक छंदांच्या तुलनेत तो कमीच असतो. शिवाय आत्ता उल्लेख केलेले फायदे होतात ते निराळेच.



# 10) शिस्त आणि व्यवस्थापन

माणसाच्या व्यक्तिमत्त्वाचा एक महत्त्वाचा भाग म्हणजे तो माणूस बोलल्याप्रमाणे वागतो का नाही. याचाच अर्थ त्याला जबाबदारीनी वागता येतं का नाही.

सर्वांत महत्त्वाचा पाठ प्रत्येकानी तपासायचा म्हणजे स्वतःचे गुणदोष तपासणं. स्वतःची कार्यक्षमता तपासणं. व्यक्तीचा दर्जा म्हणजे काय हे समजून घेणं. याच पुस्तकांत कार्यक्षमतेविषयी सविस्तर लिखाण आहे. लेखाचं शीर्षक आहे, 'व्यवस्थापनशास्त्र-वैवाहिक आणि रोजच्या आयुष्यातलं' शिवाय व्यक्तीच्या दर्जाविषयी रोजच्या आयुष्यातलं तत्वज्ञान' असाही लेख आहे. एवढ्या गोष्टी वाचल्या तरच व्यक्तिमत्त्वाचा विकास होणार अशी अट असेल तर नकोच तो विकास, असं काहींना वाटेल. त्याला काही इलाज नाही असं मला वाटतं. शिस्त आणि ती वाढवण्याची जिद्द असली तरच विकास होणार.

आपल्याला स्वतःला कशामुळे आनंद वाटतो त्याची यादी बनवावी. त्या सगळ्या आनंद वाटणाऱ्या गोष्टी एकदम न करता विभागून त्यांचं वेळापत्रक बनवावं. याच पुस्तकसंचात आयुष्यातले आनंद नावाचा एक लेख आहे. त्याच्यात मांडलेल्या तत्त्वज्ञानाकडे लक्ष देण्यानी बराच फायदा होईल.

व्यक्तिमत्त्वातला एक गुण फार महत्त्वाचा ठरतो. तो म्हणजे जबाबदारीनी वागण्याचा अभ्यास, प्रयत्न. प्रत्येक जबाबदार माणसाकडे सतत कागद आणि पेन असायला हवं. काहीतरी लिहून घेण्याजोगा प्रसंग शब्दशः केव्हाही येऊ शकतो हे त्याला समजतं. या गुणाचा इतरांवर खूप प्रभाव पडतो.

एवढ्या निरनिराळ्या गोष्टी मी सांगतोय् त्या सगळ्यांची लेखी टिपणंही ठेवायला पाहिजेत आणि ते कागद व्यवस्थित ठेवण्यासाठी पद्धतशीरपणे ते फाईलमधे किंवा फोल्डरमधेही लावायला हवेत. एवढ्या गोष्टी करायला वेळ कुठून आणायचा हा प्रश्न एव्हाना ऐकणाऱ्यांच्या मनात आलाच असेल. कमी वेळेत आवश्यक ती सगळी कामं व्यवस्थितपणे कशी पार पाडायची हे शिकण्यासाठी तर व्यवस्थापनाचा अभ्यास करायचा असतो. मी अशी शिफारस करतो की, अनेक गोष्टी लक्षात ठेवून करण्यासाठी स्वतःची डायरी आणि त्याची सिस्टिम वापरावी. त्याखेरीज पूर्ण जबाबदारीनी वागणंच शक्य नाही, असं मला वाटतं.

दर्जामधे तडजोड करणं हे चांगल्या व्यक्तिमत्त्वाच्या कल्पनेत बसत नाही. दर्जा गाठण्यासाठी दर्जेदार माल लागतो, दर्जेदार कारागिरी लागते, त्याचबरोबर दर्जेदार पद्धतही लागते. या तीनही गोष्टी साधण्यासाठी सिस्टिमला काही पर्याय नाही.

माझ्या ओळखीचे एक दुकानदार आहेत. त्यांचं औषधांचं दुकान आहे. ते स्वभावानी चांगले, प्रामाणिक, सज्जन आहेत. तरीही आपल्याला त्यांच्याविषयी आणि त्यांच्या दुकानाविषयी एक गोष्ट जाणवल्याशिवाय राहात नाही. अव्यवस्था आणि अस्वच्छता. त्यांच्याविषयी आपलं जे मत होतं त्यावर अव्यवस्था आणि अस्वच्छता यांचा परिणाम होतोच.

दुसऱ्या एका माणसाचा किस्सा सांगतो. त्या माणसानी शोभाला आणि मला एका कार्यक्रमासाठी वक्ते म्हणून बोलावलं. आम्ही गेलो, आमची दोघांची विषयाची तयारी चांगली असल्यामुळे खुद्द कार्यक्रम चांगला झाला. खुद्द ज्यानी आम्हाला निमंत्रण केलं तो तिथे हजर नव्हता. अजूनही त्याची आणि आमची प्रत्यक्ष गाठ एकदाही पडलेली नाही. पण त्या कार्यक्रमाची बाकीची सगळी व्यवस्था इतकी कमालीची गचाळ होती की, त्या कधी न भेटलेल्या व्यक्तीच्या व्यक्तिमत्त्वाविषयी आमचं अतिशय वाईट मत झालं.



# 11) आयुष्याचा संतुलित दृष्टिकोन

माझ्या स्वतःच्या व्यक्तिमत्त्वामधे एक अडचण आहे. माझं बाह्यरूप हॅपी गो लकी किंवा आयुष्याकडे बघण्याचा दृष्टिकोन सतत आनंदी, सकारात्मक असलेला असं वाटतं. प्रत्यक्षात मी फार गंभीर प्रकृतीचा आहे. लोकांचे अंदाज चुकल्यामुळे त्यांना धक्का बसतो आणि तो धक्का निराळ्या रूपात माझ्यापर्यंत पोचतोच.

सुरुवातीला आपण बोललो होतो तो मुद्दा आता सविस्तर सांगतो. कार्यशाळांच्यात मी काही प्रश्न विचारतो. त्यांपैकी एक प्रश्न असा – प्रश्न विचारल्यासरशी खडाडदिशी काही 'स्मार्ट' उत्तर देणं चांगलं की जरा थांबून विचार करून दिलेलं संतुलित उत्तर चांगलं? कशाला तुम्ही चांगलं व्यक्तिमत्त्व समजता? मंडळी जरा विचारात पडली. एकमेकांत चर्चा करायला मुभा होती. त्यामुळे थोडा वेळ शंका-कुशंका, प्रश्नोत्तरं झाली. पण एकमुखानी शेवटी उत्तर आलं, 'जरा थांबून विचार करून उत्तर देणाऱ्याचंच व्यक्तिमत्त्व सरस.'

माझा पुढचा प्रश्न असतो– एखाद्या प्रश्नाचं उत्तर माहीत नसताना थाप मारून मोकळा होणारा माणूस चांगला, का याचं उत्तर मला माहिती नाही, मी माहिती काढून नंतर सांगीन, म्हणणारा चांगला? याचंही उत्तर लगेच आलं. प्रामाणिकपणे माहिती नाही म्हणणाऱ्याचं व्यक्तिमत्त्व चांगलं.

एवढ्या प्रश्नोत्तरांमधे तुम्ही सगळ्यांनी योग्य निर्णय घेतल्यामुळे एक स्पष्ट झालं की तुमच्या सगळ्यांचं व्यक्तिमत्त्व नीट विचार करणाऱ्यांचं आणि कल्पनेचे बारकावे समजून घेणाऱ्यांचं आहे. आता त्या बारकाव्यांत शिरूया.

काही महत्त्वाची मूलतत्त्वं मान्य केल्याशिवाय व्यक्तिमत्त्व-विकास होऊ शकत नाही. आपण एकेक करून ती सगळ्यांच्या संमतीनी ठरवत जाऊया. कोणाचा मतभेद असला तर आत्ता मधे मला थांबवलं तरी मला राग येत नाही, माझा अपमान होत नाही. हा सगळा अभ्यास म्हणजे एक चर्चा आहे. हे माझं भाषण नाही. हा शाळेचा वर्ग नाही. इथे विचार चुकला तरी दुरुस्तीला केव्हाही परवानगी आहे.

एकानी दुसऱ्याला किती वेळा सूचना द्यायच्या, तेच तेच किती वेळा

बोलायचं, याच्या मर्यादा ओलांडल्या तर संघर्षाला, रुसवा, अबोला, भांडण अशा गोष्टींना सुरुवात होते. अगदी नवरा-बायको, आई-वडील, मुलं, जावई, सुना कोणीही असलं तरी हाच नियम लागू होतो आणि याचं मूळ कारण मगाशी सांगितलेलं तेच. निर्णय ज्याचा त्यानी घ्यायचाय्. बुद्धिमत्ता, प्रतिभा, स्मरणशक्तीचा प्रकार, कलागुण हे आनुवंशिकतेनी आलेलं असतं. त्यात किंचित दुरुस्ती करता येते. मुळापासून माणूस बदलता येत नाही. त्यापुढे जाऊन असं म्हणता येईल की, एक माणूस दुसऱ्याला बदलू शकत नाही. दुसरा जेव्हा ठरवतो तेव्हा तो स्वतःच स्वतःमधे बदल करतो. हे मुद्दे पटतायत्?

व्यवस्थापनशास्त्राच्या म्हणण्याप्रमाणे शंभर टक्के खरं बोलताच येत नाही. अठ्याण्णव टक्के म्हणजे जास्तीतजास्त खरं. याविषयी आपण स्वतंत्र उपलेखात बोलणार असल्यामुळे तेव्हाच हे तपशीलात बोलू. आत्ता हे ऐकून पटलं नाही तरी काही हरकत नाही.

ज्याला बोलायचं कसं ही कला अवगत असेल तो योग्य शब्दांत मतभेद व्यक्त करेल. बाकीचे कुचाळक्या करतील. तुम्हाला यातलं काय करायचं ते ठरवायचं आहे. इतरांच्या दृष्टिकोनातून तुमचं व्यक्तिमत्त्व त्यावर ठरणार आहे.

आपण मगाशी म्हणालो त्याप्रमाणे व्यक्तिमत्त्वाचे प्रकार अभ्यासायला लागलं की, निरनिराळ्या लोकांचे हसण्याचे प्रकार- याकडे लक्ष जातंच. हसून बोलणं, हसतमुख असणं केव्हाही चांगलंच, पण सतत हसत बोलणं चांगलं कसं म्हणता येईल? बराच वेळ हसत राहणं, गडगडत हसणं, अंग हलवत हसणं, छद्मी, खडूसपणे हसणं याला चांगलं कसं म्हणता येईल? योग्य तेवढं, संयत हसणं हीच गोष्ट व्यक्तिमत्त्वामधे भर घालते नि खुलवते.

या पद्धतीनी ज्याला स्वतःच्या व्यक्तिमत्त्वाचा विकास करण्याची इच्छा आहे, त्यानी पहिली गोष्ट म्हणजे निर्भिडपणी अठ्ठ्याण्णव टक्के वेळा खरं बोलायचं. तुम्ही खरं बोललात तरच समोरच्याचा विरोधी विचार समोर येणार. नाहीतर तुम्ही गप्प आणि दुसरेही गप्प. विरोधी विचारांची हाताळणी हीच खरी परीक्षा असते. संयत पद्धतीनी ते जमलं की संतुलित वागणुकीला सगळ्या बाजूंनी सुरुवात होते.

आपल्यासमोर अडचणी येणार हे नक्की आहे. त्या अडचणी नशिबानी आणि आपल्यातल्याच उणिवांमुळे येणार आहेत आणि त्यांच्यावर मात करण्यासाठी आपल्यातल्याच सद्गुणांचा उपयोग करायचा आहे. उपाय सापडेल अशी आशा हेच आपल्या आयुष्याचं मुख्य इंधन आहे. आपल्या आयुष्याची, जिवाची

जबाबदारी स्वतःवरच आहे आणि स्वावलंबन हे सर्वोच्च मूल्य आहे. इतर जवळचे, दूरचे लोक मदत करतील पण ते नुसते सल्लागार असतात. सल्लागार याचा अर्थ, 'मी याची शिफारस करतो, पण अंतिम निर्णय तुमचाच असेल. मी फक्त सल्ला देतोय्. तो मानण्याचं बंधन तुमच्यावर नाही,' असं म्हणणारा.

स्वतःच्या व्यक्तिमत्त्वासंबंधी इतर लोक काय विचार करतात हे जास्त महत्त्वाचं की स्वतःला काय वाटतं हे जास्त महत्त्वाचं?– असा प्रश्न गटाला विचारला की निम्मे लोक एका बाजूचे नि निम्मे दुसऱ्या बाजूचे बहुतेक वेळा निघतात. पुढचा प्रश्न असा की, अनेक लोक आपल्या व्यक्तिमत्त्वाकडे बघतात, पण त्याविषयी आपल्याशी बोलणारे एखादा टक्काच असतात. त्याचा अर्थ असा होतो की, आपल्या बाबतीत इतर लोक जेवढा विचार करतात त्यातला आपल्याला फारच थोडा भाग माहीत असतो. त्या तुलनेत आपण स्वतः स्वतःच्या व्यक्तिमत्त्वाविषयी खूप जास्त वेळा विचार करतो. सारांश, स्वतःला स्वतःबद्दल काय वाटतं यालाच खरं महत्त्व आहे. आपण स्वतःला फार आवडत असलो तर अहंगंड तयार होतो. आवडत नसलो तर न्यूनगंड तयार होतो. यांपैकी कुठलाच गंड नाही असा माणूस समतोल व्यक्तिमत्त्वाचा बनतो. असा माणूस कायम स्वस्थचित्त असतो. स्वस्थचित्त माणसाचं शरीरही स्वस्थ असतं. अशा माणसाला 'स्मार्ट किंवा स्टायलिश' दिसण्याचं आकर्षण नसतं. तो इतरांवर प्रभाव पाडण्यासाठी मुद्दामहून काही धडपड करीत नाही. त्याचा प्रयत्न खरं उत्तर शोधण्याचा सतत चालू असतो आणि सामाजिक चालीरीती, रूढींचा त्याच्यावर काही परिणाम होत नाही. तत्त्वज्ञानात अशा माणसाला स्थितप्रज्ञ म्हणून ओळखतात.

माझ्यासारख्या माणसाला मित्र कमी असतात. 'लोकप्रिय का योग्य' असा प्रश्न असला तर मी नेहमी 'योग्य' चीच बाजू घेतो. बहुतेक वेळा असं वागणं तात्पुरत्या तोट्याचं पण पुढे जाऊन फायद्याचं असतं.



## 12) अष्टपैलू- चतुरस्त्र- अष्टावधानी व्यक्ती

एखाद्या माणसात अनेक गुण असतात. अशा माणसाला त्या गुणांमुळे फायदा नक्की होतो. कारण असं आहे की, प्रत्येकाला स्वतःच्या दुर्गुणांवर मात करण्यासाठी स्वतःमधल्या सद्‌गुणांचाच उपयोग करायचा असतो. थोडक्यात अशा बहुपेडी माणसाकडे जास्त साधनं असतात.

अगदी लहानपणापासून म्हणजे चालायला, बोलायला मूल लागतं तेव्हापासून त्याच्या बुद्धिमत्तेचे पैलू दिसायला लागतात. ते आधीही असतातच, पण कळणं कठीण असतं. एखादा माणूस अष्टपैलू आहे असं म्हणतात. हा वाक्प्रचार वापरात येण्याचं कारण बुद्धीचे ८ पैलू शोधलेले आहेत. त्या बुद्धीच्या अंगांचा विकास करण्यासाठी खरं म्हणजे खूप काही करता येत नाही, पण जे काही थोडंफार करता येतं ते काही लोक नेटानी करतात. त्यासाठी क्लासेस काढल्याचीही उदाहरणं शहरात सापडतात. खेळातलं प्रावीण्य, गणिती बुद्धी, रचना किंवा शिल्पकलेचं अंग, संगीताचं अंग, भाषेची समज, निसर्गाची आवड आणि समज, दुसऱ्याच्या प्रश्नांची समज आणि तत्वज्ञानाची, चिंतनाची समज असे ते ८ पैलू समजतात. असे सर्व गुण ज्यांच्यात आहेत अशी सर्वगुणसंपन्न माणसं साहजिकच कमी असतात. पण तो व्यक्तिमत्त्वाचाच भाग असतो. आणि असे लोक इतरांना साहजिकच आदरणीय वाटतात. आपल्याला या माहितीचा उपयोग असा आहे की, समजा, यांपैकी काही गुण आपल्यात असले आणि ते आपल्याला कळले तर त्या गुणांच्या जोरावर आपल्याला आपल्या उणिवांवर मात करणं शक्य होईल.

अशा गुणांना इंग्लिशमधे मल्टिपल इंटेलिजन्स, मल्टिपल टॅलेंट असं म्हणतात. करिअरची दिशा ठरवताना अशा माणसाला निर्णय घेताना त्रास होऊ शकतो. त्यानंतरही त्याचा 'करिअर ग्राफ' बहुतेक वेळेला सरळ रेषेत नसतो. तो माणूस नोकऱ्या बदलतो. व्यवसाय बदलताना दिसतो, त्यामधे धडपडही होते. पण प्रत्येक अडचणीतून तो मार्ग काढतो. अशा माणसाला 'एक ना धड भाराभर चिंध्या' असं पारंपरिक प्रकारच्या लोकांकडून ऐकून घ्यावं लागतं, पण त्याकडे फार लक्ष द्यायचं नाही, हे ठरवावं लागतं. एवढं सोडलं तर अष्टपैलू व्यक्तिमत्त्वाचे

फायदेच फायदे असतात.

अशा बहुपेडी माणसाजवळ सर्वसामान्यांपेक्षा जास्त प्रतिभा म्हणजे क्रिएटिव्हिटी असते हे उघड आहे. प्रतिभा ही एक गोष्ट मुळात जन्मजातच कमी किंवा जास्त असते. त्यात फार बदल करता येत नाही. असलेल्या प्रतिभेचा वापर करण्यासाठी मात्र मन रितं असावं लागतं. आसपासच्या रोजच्या प्रश्नांच्यात, कटकटींच्यात मन गुंतलेलं असून चालत नाही. अष्टपैलू व्यक्तिमत्त्वाच्या लोकांना ती कला साध्य झालेली असते.



## 13) विकासाचे दोन मार्ग

व्यक्तिमत्त्व विकास हा विषय अजिबातच नवीन नाही. पारंपरिक विचारांच्यातही व्यक्तिमत्त्वाच्या विकासाचीच कल्पना मध्यवर्ती होती. पूर्वी दळणवळणाची फारशी साधनं नसल्यामुळे एकाच गावात सबंध आयुष्य काढणारी खूप माणसं असायची. मनोरंजनाची साधनं अगदीच मर्यादित असायची. स्वतःच्या कुटुंबाबाहेरचं सगळं विश्व धर्म, कर्मकांडं यांनी भरलेलं असायचं. त्या सगळ्याचं साधं वर्णन म्हणजे भक्तिमार्ग. भक्ती हाही एक विकासाचा मार्ग आहेच. खरं म्हणजे भारताइतकी सांस्कृतिक उदारता जगात कुठेही नाही. भारतात निरनिराळ्या पद्धतींनी विकासाचा विचार झाला. ज्ञानमार्ग, विवेकनिष्ठ विचारसरणी अशा गोष्टींचा विचार अजिबात झाला नाही असं नाही, पण तो कधी रुजला नाही.

ज्ञानमार्ग, विवेकनिष्ठ विचारसरणीत शंका उपस्थित करायला नुसती परवानगीच नाही तर प्रोत्साहन गृहीत धरलेलं आहे. 'वडीलधाऱ्यांनी सांगितलंय् तसं मुकाटपणी वागा, उगीच चांभारचौकशा नकोत.' या पद्धतीनी माणसाचा व्यक्तिमत्त्व विकास कधीही होणं शक्य नाही. या कार्यशाळेत, या पुस्तकात व्यक्तिमत्त्व विकासाचा प्रवास अनेक ठिकाणी निरनिराळ्या पद्धतींनी सांगितला आहे. तो थोडक्यात इथे सांगतो–

विचार
अभ्यास
अंमलबजावणी
अधिक विचार
जास्त अभ्यास
आत्मविश्वासानी आचरण

या शेवटच्या टप्प्यावर पोचलं की, प्रवास संपत नाही, विकास थांबत नाही. मी स्वतः या ज्ञानमार्गाचीच शिफारस करतो. गेल्या 18 वर्षांत मी जो अभ्यास करू शकलो तो या वाटेनी चालल्यामुळेच.

व्यक्तिमत्त्व विकासाच्या उत्तुंग शिखरावर पोचलेले, महामानव उपाधी

मिळालेले महात्मा गांधी याबद्दल असं म्हणायचे, ‘व्यक्तीच्या विकासासाठी निर्भयता हवी आणि निर्भयतेसाठी मनात संपूर्ण नम्रता हवी. कुठच्याही माणसाकडून, कुठच्याही घटनेकडून आपण केव्हाही काहीतरी शिकू शकतो. पण त्यासाठी नम्रता आवश्यक आहे.’



## 14) मिश्रगट समुपदेशनाचे व्यक्तिमत्त्वासाठी फायदे

ज्याचं व्यक्तिमत्त्व असं परिपक्व पद्धतीनी घडलं आहे, त्याच्या दृष्टिकोनातून प्रत्येक अनुभव म्हणजे आत्मविकासाची संधी असते. त्या त्या अनुभवामधे आपली भूमिका कार्यक्षमपणे निभावणं म्हणजे व्यक्तिमत्त्वाचा विकास.

तरी प्रत्येक माणसासमोर प्रश्न असतातच. त्यांपैकी एक म्हणजे राग. आपल्याला कशाचा राग येतो हे पण लिहून काढावं. या पुस्तकात 'क्रिटिकल ॲनॅलिसिस' या शीर्षकाचा लेख आहे, शिवाय रागावर नियंत्रण ठेवण्यासाठी स्वतंत्रपणी उपाय दिले आहेत ते वाचावेत. आजकाल राग आवरत नाही, हा प्रश्न असलेले खूप लोक भेटायला लागलेत.

आत्मविश्वास, व्यक्तिमत्त्व विकास आणि स्वयंशिस्त या सगळ्या गोष्टी जवळपास एकच आहेत आणि त्या करण्यासाठी मुळात माणसाला हे पटलेलं हवं की, आयुष्य हे गंभीरपणे, निष्ठेनी जगण्यासाठी आहे. निव्वळ मजा करण्यासाठी नाही. अशा अनेक गोष्टी कळण्यासाठी 'अभ्यास मंडळ' आहे.

योग्य व्यक्तिमत्त्वाचं वर्णन एका निराळ्या पद्धतीनी असं करतात – 'जो माणूस फक्त स्वतःला खास व्यक्ती समजतो, त्याला अडचणी येतात. जो स्वतःला सामान्य आणि दुसऱ्याला खास समजतो त्यालाही अडचणी येतात. जो स्वतःला आणि दुसऱ्यालाही खास समजून वागतो त्याला अडचणी येत नाहीत.'

काही लोकं स्वतःच्या विकासासाठी दुसऱ्या कोणाचा तरी वापर करतात, त्याबद्दलची जाण ठेवली आणि दुसऱ्या व्यक्तीवर अन्याय केला नाही तर असा स्वतःचा विकास करण्यात काही गैर नाही. मी असे काही लोक बघितलेत की, जे स्वतःच्या घरी कधीच कोणाला बोलवत नाहीत. खर्च नको, तयारी नको, मेहनत नको असंच त्यांचं धोरण असतं. हे लक्षात आलं की, लोकं त्यांच्याविषयी बोलणारच. मग त्याचा त्यांना न्यूनगंड निर्माण होतो. तेही कोणाकडे जात नाहीत. व्यक्तिमत्त्वाचा एकूणच सगळा घोटाळा व्हायला सुरुवात होते.

व्यक्तिमत्त्व निःसंकोच असलं की चांगलं वाटतं. काही लोकांचा निःसंकोचीपणा फार झाला तर त्याला लोक निर्लज्जपणा म्हणायला लागतात. गळेपडू म्हणून ओळखतात. निःसंकोच आणि निर्लज्ज यांमधली हद्द नेमकी

समजली नाही की असं होतं.

कुचाळक्या याविषयी आपण मघाशी बोललो असलो तरी त्याबद्दलची एक गोष्ट इथे मला सांगायलाच हवी. ज्या माणसाचा विकास अशा योग्य पद्धतीनी होत नाही, त्याच्या वागणुकीची काही ठराविक लक्षणं असतात. त्यातलं पहिलं लक्षण म्हणजे दुसऱ्याच्या पाठीमागे कुचाळक्या करणं. त्याचा समोरच्याच्या न्यायबुद्धीवर विश्वास नसतो. तो दुसऱ्यासमोर त्याच्याविषयी टीका करायला घाबरतो.

दुसरं लक्षण तो त्याच त्याच ओळखीच्याच लोकांना पुन्हा पुन्हा भेटतो. नवीन माणसांना टाळतो. मिश्रगटात शक्यतोवर काहीच बोलत नाही. शक्य तेवढा वेळ कोपऱ्यात गुपचुप बसून राहतो. मला अशी व्यक्ती दिसली की त्याला या गटचर्चांचा उपयोग कसा होईल असा माझा कायम प्रयत्न असतो.

मानसशास्त्रातलं एक खूप महत्त्वाचं आणि गमतीचं विधान सांगतो, 'व्यक्तिमत्त्व विकास करण्याचा लग्न हा एक प्रमुख मार्ग आहे.' याचं कारण स्पष्ट आहे. लग्न केलं की सारखं परीक्षेला बसावं लागतं. जोडीदाराशी जुळवून घ्यायचं, मुलं झाली तर त्यांना वाढवायचं, त्यांचं मन सांभाळायचं, कामधंदा करून कुटुंबासाठी पैसे मिळवायचे, सततच परीक्षा. या सगळ्या प्रक्रियेत माणसाला स्वतःबद्दल जास्त जास्त माहिती होत जाते. याचं मूळ कारण माणूस सुप्त जाणिवेत सतत स्वतःचं व्यक्तिमत्त्व कसं आहे हे शोधत असतो.

लग्नामुळे समाजमान्यता मिळते. अविवाहितांकडे लोक कशा नजरेनी बघतात हे आपण बघितलेलं असतं. त्यामुळे लग्नाचं महत्त्व वाढतं. लग्नामुळे आपण 'नॉर्मल' आहोत हे सिद्ध होतं. मुलं झाली की, ती 'नॉर्मल्सी' आणखी जास्त निराळ्या प्रकारे सिद्ध होते. थोडक्यात लग्न आणि मुलं यांच्यामुळे व्यक्तिमत्त्व समतोल व्हायला मदत होते. अविवाहितांसमोर अडचणी असतात, पण लग्न झालं की, जास्त प्रमाणात अडचणी येतात, त्या सोडवाव्या लागतात. अडचणींवर उपाय शोधण्यातल्या आपल्या कल्पनांची, प्रतिभेची ती परीक्षा असते. सारांशात, प्रतिकूल परिस्थितीवर मात करण्याची क्षमता वाढणं म्हणजे व्यक्तिमत्त्व विकास. चांगल्या शिक्षणात असे अनुभव लहानपणापासून मुद्दामून द्यावेत अशी मी शिफारस करतो. या पुस्तकसंचातला 'पालक-शिक्षण' हा लेख या विषयाबद्दल बरंच काही सांगणारा आहे.

प्रत्येक माणसाच्या वागण्या बोलण्यात इतरांविषयी विचार करण्याची क्षमता किती म्हणजेच भावनांक ऊर्फ इमोशनल कोशंट किती आहे हे दिसतं. चांगला

भावनांक असणं हीपण चांगल्या व्यक्तिमत्त्वासाठी महत्त्वाची अट आहे. इथे एवढ्या उल्लेखावरच थांबूया कारण याबद्दल या कार्यशाळेत, पुस्तकसंचात स्वतंत्र लेखच आहे.

मानसशास्त्र आणि समाजशास्त्र या दोन्ही शास्त्रांच्या अभ्यासकांनी मिळून व्यक्तिमत्त्व विकासाचे काही टप्पे वर्णन केले आहेत. त्यांचा वयाशी संबंध असतोच. मूल मोठं होईल तसं एक एक टप्पा ओलांडत ते पुढे जातं. त्या टप्प्यापर्यंत ते पोचलं नाही तर, इतरांच्या दृष्टीनी 'हे शोभत नाही', 'एवढं कळायला नको का?' वगैरे टीका ऐकून घ्याव्या लागतात. आता ते टप्पे सांगतो. काही वयानी मोठ्या माणसांनाही यांतले काही टप्पे गाठता येत नाहीत. त्यामुळे त्यांना निर्भत्सनेला तोंड द्यावं लागतं. शिवाय स्वतःला आणि कुटुंबाला त्रास होतो.

1) स्वतःच्या शारीरिक गरजा समजणं.
2) स्वतःला इजा होऊ नये म्हणून स्वतःला जपण्याची तंत्रं आत्मसात होणं.
3) इतरांच्या भावना-विचार आपल्यापेक्षा निराळे असतात याची जाणीव होणं.
4) प्रेम, आपुलकी या भावनांची समज. त्यामधे आपलं दुसऱ्यावर प्रेम आणि दुसऱ्याचं आपल्यावर प्रेम या दोन्ही गोष्टींचा समावेश होतो.
5) आत्मसन्मानाची भावना जागृत होणं.
6) लैंगिक आकर्षण व्यक्त करण्याची गरज निर्माण होणं.
7) जगात अनेक गोष्टींचं ज्ञानाचं भांडार आहे याची जाणीव होणं आणि त्यातली स्वतःला जास्त आवड कशाची याबद्दलचा विचार करणं.
8) चरितार्थ चालवण्यासाठी मार्ग शोधणं.
9) जगातल्या सुंदर गोष्टींची आसक्ती वाटणं.
10) एवढ्या अनेक गोष्टी प्रत्यक्ष अनुभवण्याची, प्रयोग करण्याची इच्छा होणं.
11) लग्नाच्या निर्णयप्रक्रिया, मर्यादा समजणं आणि विवाह करण्याचा किंवा न करण्याचा निर्णय घेणं.
12) अपत्यांना जन्म देणं, पालकत्वाबद्दल शिक्षण घ्यावंसं वाटणं आणि प्रत्यक्ष अनुभव घेणं.
13) नकारात्मक विचारांची ओळख होणं.
14) स्वतःवरच्या सामाजिक जबाबदाऱ्यांची जाणीव असणं.
15) मृत्यूबद्दल स्पष्ट विचार करता येणं.



# 3

# खरं बोलणं – अठ्याण्णव टक्के

एक गंमतशीर पण पूर्ण खरं वाक्य सांगतो, 'मी नेहमी खरं बोलतो हे वाक्यच पूर्ण खोटं असतं.'

गेली अनेक वर्षं निरनिराळ्या क्षेत्रांत काम केल्यावर माझी खात्री पटलीय की शंभर टक्के खरं बोलणं आपल्याला शक्य नाही. पण अठ्याण्णव टक्के खरं बोलणं शक्य आहे. एक टक्का सोडला दुसऱ्याचं मन दुखावू नये म्हणून आणि दुसरा म्हणजे खरं बोलण्यानी फार मोठी आपत्ती कोसळणार असली तर. तेवढंही खरं लोक बोलत नाहीत, ही अडचण असते. मानसशास्त्रात आणि व्यवस्थापनशास्त्रामधे हे मूलभूत तत्व म्हणूनच कबूल केलेलं आहे की शंभर टक्के मनातलं खरं कोणाशीही, कोणीही बोलू शकत नाही.

भारतभर, महाराष्ट्रभर जिकडे तिकडे आढळणारं 'ॲरेंज्ड मॅरेज' म्हणजे तर 'खोटं बोलून लग्न.' हे वाचून धक्का बसला ना? आता अगदी लहानपणापासूनचा आपला खोटं बोलण्याचा परफॉर्मन्स आठवून बघूया, म्हणजे धक्का कमी होईल, त्यानंतर लग्नापर्यंत बोलू. लहानपणापासून 'सत्य सदा बोलावे' हे आई-वडलांनी सांगितलेलं असतं. लहान मुलं म्हणजे फुलं, निर्मळ असतातच. ती मोठी होताना पालक मॅच्युरिटी शिकवतात म्हणजेच खोटं वागायला शिकवतात. 'थिअरी आणि प्रॅक्टिस'मधे फरक असतो असं वर सांगितलं जातं. लहानपणी माराच्या भीतीनी, खाऊच्या पैशासाठी, मुलं-मुली एकत्र सहलीला जाता यावं म्हणून खोटं बोलावं लागतं. पुढे नोकरीधंद्यात, नातेवाईकांशी सर्रास खोटं बोलायला सुरुवात होते.

पुढचा प्रश्न येतोच. समोरचा माणूस आपल्याला फसवतोय असं जाणवतं तेव्हा? यासाठीच तर आपण म्हणतो की, आपल्यावर अशी बलामत येणार

असली तर खोटं बोलण्यासाठी तेवढं एक टक्का मार्जिन मान्य करूया. मुख्य मुद्दा असा आहे की, समोरच्या माणसाचा खोटेपणा कळला तरी खरं बोलण्याचं तंत्र असतं नि ते आपल्याला माहीत नसतं.

अशा वेळी पहिली महत्त्वाची गोष्ट म्हणजे लगेच उत्तर द्यायचं टाळणं. जरा विचार करायला अवधी मिळाला की, दुसऱ्याच्या हेतूचं पृथक्करण करून आणि आपल्या परिस्थितीचा अंदाज घेऊन नंतर बरंच खरं बोलता येतं. मी ज्या व्यवसायात आहे त्या कन्स्ट्रक्शन मॅनेजमेंटच्या प्रॅक्टिसमधे छोट्या-मोठ्या व्यवहारांत अठ्याण्णव टक्के खरं बोलता येतं हे वारंवार सिद्ध होतं. उलट खोटं बोलायचा प्रयत्न केला की ते अंगाशी येतं. इथे बांधकाम क्षेत्राविषयी फार सांगणं योग्य होणार नाही, म्हणून आणखी काही सांगत नाही. आपण रोजच्या आयुष्याबद्दल आणि विवाहाविषयीच बोलूया.

वैवाहिक जीवनासाठी ज्या गोष्टीची खरी गरज आहे ती म्हणजे अस्सल विचार. आपण जसजसे वयानी वाढतो तसतसे जास्त जास्त 'मॅच्युअर' ऊर्फ खोटं वागायला लागतो. लहान मुलं फक्त खरंच वागतात, बोलतात. मुलांचा सहवास आपल्याला आवडतो, कारण ती डावपेच करत नाहीत. मग आपण आपलं पालकत्वाचं सगळं कसब वापरून त्यांना 'मोठं' करतो. आपल्याकडून आणि शाळा-कॉलेज, मित्रमंडळी यांच्याकडून धक्के खाऊन खाऊन मुलं 'तयार' होतात. आपण 'तयार' असतोच. शेवटी सगळे मिळून एकजुटीनी खोटं वागायला लागतो आणि त्याला मॅच्युरिटी म्हणतो. व्यावहारिक जगात तर आसपासचे अनेक लोक आपल्याला फसवायला टपलेलेच आहेत. दुसऱ्याला न फसवण्याचा निर्णय आपण घ्यायचा असल्यामुळे हे सहज शक्य आहे; पण न फसणं हे फार कठीण आहे, हे आपल्याला कळायला लागतं. मग आपण 'डावाला प्रतिडाव' शिकत जातो. 'मॅच्युरिटी' नावाखाली माणसं सरळपणा सोडतात. जागोजागी खोटं बोलायला शिकतात. इतरांना तसं वागायला भाग पाडतात.

एक विनोद सांगतो. लग्नासाठी एका स्थळाचं वर्णन एक मध्यस्थ सांगत होते. मुलगा हुशार, सुंदर, शिकलेला, श्रीमंत, उमदा, दिलदार, मनमिळाऊ आहे. असं स्थळ शोधून सापडणार नाही. पण मग लग्न का होत नाही? मध्यस्थ फार कमिशन मागतो का? नाही. पण मध्यस्थात एकच दोष आहे म्हणून अडलंय. काय ते? मध्यस्थ खोटं बोलतो.

एरवीच्या इतर व्यवहारात तर माणसं खोटं वागतातच. लग्न या विषयात

तरी हा खोटेपणा आपण सोडावा की नाही? पण इतकी पक्की लागलेली आपली सवय जाता जात नाही. चांगली नोकरी मिळवताना आपले गुण रंगवून रंगवून सांगण्याची जरूर भासते, तसं स्थळ बघताना आपले आणि कुटुंबाचे नसलेले 'गुण'सुद्धा रंगवून सांगण्याकडे आपला कल होतो. स्थळं बघण्यापूर्वी घर रंगवून घ्यायचं ठरतं. दिवाणखान्यात दाखवण्यासाठी फर्निचर बसतं. जुनी का होईना, चार चाकी गाडी घेतली जाते. बहुतेक मुलांना नोकरी असलेली मुलगी आवडते, त्यासाठी तात्पुरता कुठचातरी कोर्स करून नोकरी मिळू शकेल असं वातावरण तरी तयार केलं जातं. काही ठिकाणी नकार घेतले, की सुरुवातीला असलेली खरेपणाची थोडीशी असलेली कल्पनाही सोडून दिली जाते. अशा करामती केल्यामुळे 'श्रीमंत आणि सुंदर' स्थळ मिळण्याच्या आशेवर सगळं नाटक चालू असतं. हळूहळू या बाह्यरूपाचं महत्त्व वाढत जाऊन 'अंतर्गुण' पूर्णपणे विसरले जातात. सरतेशेवटी सध्याच्या 'स्थळ' बघून लग्नाच्या पद्धतीतली बनलेली मुख्य अट म्हणजे त्याच्यात 'खरं बोलायचं नसतं!'

थोडक्यात, मी जेव्हा या विषयाचा अभ्यास करायला लागलो, तेव्हा माझी 'सत्यशोधक वृत्ती' हा खरा ड्रायव्हिंग फोर्स होता आणि आजपर्यंत आपण बोललो, विचार केला, त्यापेक्षा 'अधिक खरं' स्वतःशीच बोलणं हेच या सगळ्या धडपडीचं मुख्य सूत्र आहे, हा साक्षात्कार मला झाला. शंभर टक्के खरं मीही बोलतो, वागतो असं मी म्हणू शकत नाही. पण भोवतालच्या लाखो लोकांपेक्षा जास्त खरं, साधारण अठ्ठ्याण्णव टक्के खरं बोलतो आणि वागतो.

स्वतःची खरं बोलण्याची टक्केवारी ज्यानी-त्यानी ठरवावी, पण सध्यापेक्षा 'अधिक खरा' विचार आणि आचार असावा अशी गरज आहे. कित्येक बाबतींत लग्नाच्या वयाच्या मुलामुलींनाही स्वतःला खरोखर काय वाटतं ते ठरवता येत नाही. आपल्याला माहितीय् की, एखाद्या प्रश्नाचं खरं उत्तर आपण दिलं तर प्रश्न विचारणाऱ्यावर फार मेहेरबानी होते. आम्ही व्यवसायातली मंडळी पोस्ट डेटेड चेकला फार घाबरतो. कारण ते पैसे दिलेले असतात आणि नसतातही. तसा विचाराचा पोस्ट डेटेड चेक समोरच्याला द्यायला लागू नये, यासाठी मदत करायला अभ्यास-मंडळ आहे.

आणखी एका गोष्टीचं फार वाईट वाटतं. खरं बोलणाऱ्यावर आपल्या समाजात सर्व पातळ्यांवर अन्यायच होत असतो. या लग्नाच्या, स्थळ शोधण्याच्या बाबतीत मुलींवर खूप अन्याय होतो तो बघवत नाही. मुलगी फार गुणी असली

तर तिला योग्य स्थळ मिळण्याची चिंता निर्माण होते. त्यामुळे असामान्य मुलीला 'चारचौघींसारखी वाग' असं पालक सांगू लागतात. त्याचबरोबर खूप चांगल्या, विशेष गुण असलेल्या मुलाला सुद्धा योग्य मुलगी सापडणं कठीण जातं. म्हणजे गुण हा दुर्गुण ठरतो, याची मला आणि अभ्यास-मंडळाला फार खंत वाटते. त्या न्यायबुद्धीनी मला स्वस्थ बसू दिलं नाही आणि पहिलं विवाह-अभ्यास मंडळ चालू झालं.

पुढचा प्रश्न असतो – घरातल्या जवळच्या माणसांशी न दुखावता खरं कसं बोलावं? जिथे व्यवहाराचा संबंध नाही आणि माणसं जवळची प्रेमातली आहेत त्या ठिकाणी तर अगदी नक्की खरं बोलता येतं. अशा वेळी पाळण्याची काही तंत्रं आहेत. एक म्हणजे आधी कल्पना द्यायची. माफी मागून बोलायला सुरुवात करायची. खरंच सांगायचं. आपली खरी अडचण सांगायची. दुसऱ्याला दोष द्यायचा नाही. शेवटी पुन्हा माफी मागायची आणि यामुळे संबंध बिघडू नयेत अशी विनंती करायची.

दुसरी गोष्ट म्हणजे जेव्हा टीका करायची असेल, चूक सांगायची असेल तेव्हा ती किंचित हसत शांतपणे सांगावी. टीका ताबडतोब न करता नंतर करायची, पण कौतुक करायचं असेल तर लगेच करावं. जेवढ्या लवकर तुम्ही असं करून बघायला लागाल तेवढं ते पुढे पुढे आणखी सोपं जाईल.

यावर प्रश्न येतो - पण स्वतःला नीट 'प्रेझेंट' करायला शिकलं पाहिजे असं सबंध जग म्हणतंय् त्याचं काय?– जो गुण आधीपासून आहे तो व्यक्त करायला पाहिजे असा त्याचा खरा अर्थ आहे. जो गुण नाही तो खोटं बोलून दाखवा असा नाही. वैवाहिक आयुष्यात नवरा-बायकोंची जवळची मैत्री असावी, त्यांच्यात संपूर्ण पारदर्शकता असावी अशी कल्पना असते, ती जमत नाही कारण आधी लग्नापूर्वी स्वतःबद्दल खोटं सांगितलेलं असतं. वय खोटं सांगतात, पगार खोटा सांगतात, स्वतःच्या तब्येतीविषयी, शिक्षणाविषयी खोटी माहिती देतात. व्यंग लपवतात.

पुढे नेहमीचा प्रश्न असतो – आधीच्या फसलेल्या प्रेमप्रकरणाविषयी सांगायचं का नाही? खरंच गंभीर प्रश्न आहे. माझ्या मते अगदी नक्की हो. सांगायलाच पाहिजे. मी माझ्या बायकोला सांगितलं होतं.

लग्नानंतरच्या पहिल्या एकांतातल्या रात्री 'सगळं खरं सांगू,' असा काहींचा बेत असतो. पण असं दोघांच्या मनात असलं तर ठीक. नाहीतर कठीणय्. या

बाबतीत लोक लग्नानंतर खासगीत सल्ल्यासाठी येतात, त्यात काय काय ऐकायला मिळतं. कोणाला फिट्स येत होत्या. कोणाला छोटासा कोडाचा डाग होता, कोणाला कर्जाचे हप्ते होते आणि हे सगळं लपवलं होतं. आणि विशेष असं की, या सगळ्यांना केव्हातरी हे दुसऱ्याला कळणार याची मनातून कल्पना होती.

माझं मत मात्र पक्कं आहे. नोकरी-धंद्यासाठी जसा बायोडेटा आपण तयार करतो तसा मॅरेज बायोडेटा पूर्ण तपशीलात द्यायलाच पाहिजे. खरं सांगितल्यानी नुकसान होतं हेच मला पटत नाही. पुढचं बरंच नुकसान उलट टळतं. खरं कसं बोलायचं ह्याची मात्र खूप तयारी करावी लागते. दुसऱ्यानी खरं बोलायला भाग पाडलं तरच खरं बोलूया ही तर अगदी चुकीची गोष्ट. व्यक्तिमत्त्वाची उंचीच तर यावरून ठरते. माझ्या स्वतःच्या धंद्यात, व्यवसायात मी खरं बोलण्याचे फायदे बघितले आहेत. क्वचित समोरचा माणूस खरं सांगण्याच्या लायकीचा नसताना खरं सांगितलं अशी चूक माझ्या हातून झालेली आहे आणि त्याचे परिणामही मी भोगलेयत्. त्यामुळे माझं खरं बोलण्याचं कसब वाढलं आणि खरं बोलण्याचावरचा विश्वास वाढला. पैशाची अडचण असते तेव्हा खरं सांगूनच फक्त काम होतं असा मला अनुभव आहे. खोटं कारण सांगितलं की पैसेही मिळत नाहीत आणि खोट्याचा सापळाही तयार होतो.

वैवाहिक आयुष्यात जोडीदाराशी खरं बोलता येत नसेल ती व्यक्ती बिचारीच म्हटली पाहिजे. विवाहबंधन म्हणजे कसंही वागण्याचा लायसन्स नाही. तो 'खरं वागण्यासाठीचा लायसन्स' आहे. मगाशी उल्लेख केलेले 2% स्वतःसाठी राखून ठेवा आणि उरलेल्या अठ्याण्णव टक्क्यांबद्दल मनापासून विचार करून तर बघा!

खरं बोलण्याबद्दल व्यवस्थापनातल्या मानसशास्त्रामधली थोडी 'थिअरी' इथे सांगणं जरुरीचं वाटतं. आपल्या मनात साधारणपणे एका मिनिटात 500 शब्दांत मांडता येतील एवढे विचार येतात. प्रत्यक्षात आपण 150 शब्दांएवढे विचार व्यक्त करू शकतो. बाकीचे 350 शब्द आपल्या हातून निसटूनच जातात. असं निसटून जाणारं खूप असतं. ज्या गोष्टी करायच्या राहून जातात, विसरून जातात त्यांना गमतीत रुट 350 म्हणतात. एखादी गोष्ट विसरून राहिली की, त्याचा रुट 350 च्या गटारात वाहून गेली असा उल्लेख करतात.

प्रत्यक्षात एखादी गोष्ट माहीत आहे. पण समोरच्याला सांगायची नसेल तर त्याचा ताण असतो. खोटं सांगायचं असेल तर आणखीनच ताण असतो.

कोणाला काय खोटं सांगितलं ते लक्षात ठेवावं लागतं. दुसऱ्या कोणाशी बोललं तरी आधीच्याशी काय खोटं बोललं होतं ते लक्षात ठेवावं लागतं. खरं सांगता येणं हे मात्र नक्की सुखाचं आहे. त्यानीच मैत्री होऊ शकते. मैत्रीची व्याख्या मानसशास्त्रात अशी केलीय् की मैत्रीत कुठचाही विषय वर्ज्य नसतो आणि कुठच्याही विषयाच्या बाबतीत अठ्याण्णव टक्के खरं सांगता येतं. बाकीच्यांचं नंतर बघू, निदान नवरा-बायकोची चांगली मैत्री असावी यासाठी विवाह-शिक्षण आहे.

लोकांना खरं बोलणं शक्य होत नाही याचं मुख्य कारण न दुखावता खरं सांगण्याची संवादकला अवगत नसणं. त्याचंच तर शिक्षण घ्यायचं आहे. वरवर दिसणारी कारणं अनेक आहेत. पैशाच्या नुकसानाची भीती, अपमानाची भीती, स्त्री किंवा पुरुष यांच्या संबंधांमधलं आकर्षण कमी किंवा नष्ट होण्याची भीती. या भीतीचा परिणाम म्हणजे काही न बोलता गप्प बसणं आणि यालाच शहाणपणा म्हणण्याची पद्धत रूढ आहे. काही वेळा एखाद्या चमत्कारिक प्रसंगात काही न बोलता गप्प बसणं समजण्याजोगं आहे, पण नेहमीच गप्प बसणं चांगलं नाही. फार सलग बोलणंही चांगलं नाही. याचा तोल साधणं हाच तर मुद्दा शिकण्याजोगा आहे.

ज्या निरनिराळ्या नात्यांच्यात खरं, अधिक खरं बोलायला शिकायचं आहे, त्यांमधे मित्रमैत्रिणी आहेत. सहकारी, भाऊ-बहिणी, मुलं, शिक्षक, आईवडील, काका, मामा, आत्या, मावश्या, घरातले आजी-आजोबा, शेजारीपाजारी, ओळखीचे, परके आणि अर्थात नवराबायको या सगळ्यांशी खरं बोलायचा मोठा पल्ला गाठायचा आहे. न दुखावता खरं बोलण्याचा सराव करण्यासाठी माझ्या मते घरच्या माणसांपासून सराव सुरू करणं जास्त सोयीस्कर. मुख्य म्हणजे चुकीचे सूर, शब्द, बोलले गेले तर दुरुस्ती सोपी असेल कारण ते तिथेच हजर असतील. हे खरं आपणहून सांगायचं आहे. दुसऱ्यांनी जाब विचारेपर्यंत थांबायचंच नाहीय.

भावी नवरा-बायकोंनी लग्नापूर्वी एकमेकांना खरं सांगायचं का नाही? समजा, एखादी गोष्ट आता नाही सांगितली आणि ती लग्नानंतर सांगितली तर दोन्ही शक्यता आहेत. खरं सांगितल्याबद्दल जोडीदाराला कौतुकही वाटू शकेल आणि कदाचित रागही येऊ शकेल.

याच विषयातला एक विनोद सांगतो. लग्नानंतरच्या पहिल्या रात्री नवरा बायकोला म्हणाला, 'एक गोष्ट मी तुला आधी सांगितली नव्हती, ती आज सांगतो, मी एका बुटाला उंच टाच वापरतो कारण माझा एक पाय आखूड आहे.

असा माझ्यात थोडा डिफेक्ट आहे.' बायको म्हणाली, 'मला पण तुला एक गोष्ट सांगायचीय. मी थोडीशी 'प्रेग्नंट' आहे.'

लग्न ठरल्यानंतर प्रत्यक्ष लग्न ठरेपर्यंत कमीतकमी सहा ते आठ महिने मधे जाऊ द्यावेत असं मी नेहमी सांगतो. त्या मधल्या काळातल्या भेटी खरं बोलण्यासाठी आहेत. त्यामुळे चुकून लग्न मोडणार असलं तर मोडू दे. नंतर मोडण्यापेक्षा आत्ता मोडणं चांगलं. जे लोक आत्ता लग्नाआधी आणि लग्नानंतर अठ्याण्णव टक्के खरं एकमेकांशी बोलू शकत नसतील ते बिचारे आहेत.

या खरं न बोलण्याची सुरुवात लहानपणी कशी होते हे शोधायला गेलं तर असं लक्षात येतं की, मुलांच्यादेखत पालक खोटं बोलतात त्यानी तर सुरुवात होते. माझ्या बांधकामाच्या व्यवसायात ठरलेलं कुठचंतरी काम माझ्या हातून झालं नव्हतं. ही 35-40 वर्षांपूर्वीची गोष्ट आहे. माझा मुलगा लहान होता. ज्याचं काम होतं त्या अशीलाचा फोन होता. शोभाला मी हळूच सांगितलं, 'त्यांना सांग, मी नाहीय्.' आणि शोभानी तसं सांगून तो कामातला प्रश्न मिटला. पण निराळाच प्रश्न माझ्या मनात चालू झाला. मुलाला तर कळलं होतं की, मी खोटं बोललो. आता त्याच्या मनावर काय संस्कार होईल? हे जे मी केलं तसं पालकांनी किती, केव्हा केलंय् हे आठवून बघावं. मी स्वतः त्या दिवशी जे खोटं वागलो, बोललो ते शेवटचं.

सुरुवात ही अशी होते आणि मग पुढे प्रवास कसा होतो ते जीवनसाथमधल्या अनेक तरुण मुलामुलींनी सांगितलं. त्यांत काही मध्यमवयीन, विवाहितही होते. कारण मिश्र गटात विवाह-अभ्यास मंडळ चालतं. ही उदाहरणं त्यांच्याच शब्दांत सांगतो –

'लहानपणीची खोटं बोलण्याची कारणं साधारणपणे अशी असायची– मार चुकवण्यासाठी, खाऊ किंवा शाबासकी मिळवण्यासाठी आम्ही खोटं बोलायचो. आत्ता अनिलदादा म्हणाले तसं मीही अनेक वेळा बाबा घरात नाहीत म्हणून सांगितलेलं आहे.'

'पॉकेटमनी वाढवून घेण्यासाठी तर दर सहा महिन्यांनी मी काहीतरी थापा मारायचो.' 'स्कूटरेट चालवायला लागल्यावर पेट्रोलसाठी खरं तर पन्नासच रुपये पुरायचे. पण बाबांकडून घ्यायचे शंभर! ॲव्हरेजच्या बाबतीत थापाथापी करत होतो.'

'पूर्वी दादाची आणि माझी फार घट्ट मैत्री होती. दादाचं लग्न झाल्यानंतर आवश्यक तेवढंच बोलावं असं मी अनुभवानी ठरवलंय. जरा सांभाळून, तारतम्य

ठेवून बोलते. त्यात स्वतःला 'ॲडजस्ट' करून घेते. माझी वहिनी चांगलीच आहे. पण मनात येणाऱ्या गोष्टी मी तिच्याशी नाही बोलू शकत. त्यामुळे त्या दादाशीही नाही बोलत. एक प्रकारे हे खोटं वागणंच आहे.'

'मी नेहमीच खरं बोलण्याचा प्रयत्न करते. पण कित्येकदा मनातलं आणि खरं बोलता येत नाही. मी शिक्षणासाठी होस्टेलला होते. घरी आईवडलांना सगळं खरं सांगायची. पण त्यानी गैरसमजच वाढलेत त्यामुळे पटत नाही कुणाशी! उदाहरणार्थ, माझं स्वावलंबी जगणं. आई-वडलांशीही खोटं वागलं तर ते त्यांना पटतं, पण खरं पचत नाही.'

'कॉलेजच्या दिवसांत आम्ही मुलं-मुली पिकनिक, पार्ट्या किंवा पिक्चरला जाणं असं काही काही ठरवायचो. आता त्यांत मुलगेपण आहेत हे सांगितलं तर परवानगी मिळणारच नाही. मग आम्ही सांगायचो, फक्त मुलीमुलीच जाणार आहोत. काय करणार?'

'मुलींचंच काय? आम्हा मुलांनाही असं खोटं बोलायला लागायचं. विशेषतः ट्रेक किंवा मुक्कामाची सहल. इथे मुलीही आहेत असं कळलं की पालकांचं ऑब्जेक्शन ठरलेलं! ते टाळण्यासाठी आम्ही खोटं बोलायचो.'

'आईबाबांशी खोटं बोलण्याबद्दल तुम्ही सांगताय्. पण कधीकधी उलटीही वेळ येते. माझ्या होणाऱ्या नवऱ्याच्या आणि माझ्या लग्न ठरण्याआधीच्या भेटी चालू होत्या. एकदा त्यानी मला त्याच्या मित्रांबरोबर रात्री नऊच्या शोला येणार का? असं विचारलं. मी 'हो' म्हणून गेले. नंतर आई-बाबांना सांगितल्यावर त्यांना ते योग्य वाटलं नाही. मला त्यांचं म्हणणं पटलं. पण आता त्याला काय सांगणार? मग मी चक्क फोन केला की, अचानक मावशीकडे राहायला जावं लागतंय् म्हणून मी येत नाही.'

'माझ्या एका मैत्रिणीनी लग्नापूर्वी एक अफेअर केलं होतं. पण नवरा संशयी आहे म्हणून भीतीमुळे तिनी लग्नापूर्वीचं प्रेमप्रकरण लपवलं. पण नंतर बाहेरून कळलं आणि भरपूर तमाशे झाले. शेवटपर्यंत या प्रश्नातून ते दोघं बाहेर आले नाहीत.'

'लग्नानंतर कदाचित मुलगा सुधारेल म्हणून अक्षम्य असलेल्या मानसिक विकृती असून देखील लग्न केलं. पुढे असं कळलं की, मुलाला 'शिझोफ्रेनिया' होता. त्या बिचाऱ्या मुलीनी काय पाप केलं होतं? पण तिचं आयुष्य उद्ध्वस्त झालं.'

'लग्नानंतर पहिल्या रात्री एकमेकांना सगळं खरं सांगू, याला काही अर्थ

नाही. ते आधीच सांगायला पाहिजे.' जेवढं लौकर तेवढं बरं.

'आमचा एक कॉलेजमित्र होता. एका मोठ्या अपघातात तो जखमी झाला. शस्त्रक्रियेच्या वेळी त्याला रक्त द्यावं लागलं. पण ते रक्त कुणा 'एच.आय.व्ही.' बाधित व्यक्तीचं असावं, कारण त्याला एडस् झाला. मात्र हे गुपित त्यानी कुणालाच सांगितलं नाही आणि लग्न पण केलं. पुढे सहा महिन्यांनी कंपनीच्या मेडिकल टेस्टमधे आपल्याला एडस् झालाय हे त्याला समजलं. त्यानी घरी पत्र पाठवून कळवलं. तेव्हा त्याच्या घरच्यांना आणि आम्हालाही समजलं. पुढच्या सहाच महिन्यांत तो दगावला. मग पुढे कोर्ट-कचेऱ्या वगैरे हे ओघानीच आलं. अर्थात होणारा मनस्तापही! ती मुलगी पण एचआयव्ही पॉझिटिव्ह झाली. त्या मित्रामागोमाग तीही वारली. दोन्ही कुटुंबांना मानसिक धक्का बसला. तो मित्र मोकळेपणी बोलला असता तर हे ओढवलं नसतं.'

'माझ्या बहिणीचं एका मुलाबरोबर लग्न ठरलं होतं. दोघं बरोबर हिंडायला-फिरायला जाऊ लागले. त्यावेळी बहिणीला जाणवलं की, हा मुलगा आपल्याला हवा तसा नाही. तिनी ते लपवलं नाही. कुटुंबाच्या विरोधाला बळी न पडता तिनी स्पष्टपणी 'आपल्याला इथे लग्न करणं जमणार नाही,' असं सांगितलं. त्यामुळे दोन्ही कुटुंबांना होणारा मानसिक त्रास टळला. स्वतःशी प्रामाणिक राहूनच ज्यानी त्यानी नेहमी निर्णय घ्यावा.'

'माझ्या माहितीत एक कुटुंब आहे. त्यातला मुलगा चांगल्या कंपनीत नोकरीला होता. तिथे त्याचा हुद्दा सामान्यच होता. त्याच्या लग्नाच्या वेळी ते लोक त्या नामांकित कंपनीचं नाव सांगायचे, हुद्दा सांगायचेच नाहीत.' 'कधीकधी पगाराच्या बाबतीत लबाडी करतात. एकूण पगाराचा आकडा सांगतात. पण त्यातून कर्जाचा हप्ता किती जातो हे मात्र सांगत नाहीत.'

'आमच्या माहितीत एका मुलाच्याही बाबतीत असंच केलं. त्याला कोड होतं. कपाळावरचा डाग त्यानं चिकटपट्टीनं लपवला. लग्न झालं. नंतर मुलीला कळलं. पण आता नाइलाजानी का होईना, ती संसार करतेय्.'

माझ्या बहिणीसाठी मागे एक स्थळ आलं होतं. आम्हाला बाहेरून कळलं की, तो डायव्होर्सी आहे. त्यानी स्वतः किंवा घरच्यांनी काही सांगितलं नाही. इतकंच नाही, आम्ही त्याला विचारलं, तेव्हा तो म्हणाला, 'माझं लग्न झालं खरं. पण ते एका महिन्यात मोडलं. म्हणून मी त्याला लग्न मानतच नाही.' मी थक्क झाले. खोटं बोलण्याची हाईट झाली की नाही?'

'सात-आठ वर्षांपूर्वी माझी एका मुलीमधे इनव्हॉल्वमेंट झाली होती. काही कारणानी ते लग्न होऊ शकलं नाही. साखरपुडाही न होता ते केवळ एक प्रेमप्रकरण म्हणून संपलं. घरात काही जणांचं मत पडलं की, आज सात-आठ वर्षांनंतर जोडीदाराची निवड करताना हे सांगायची काय गरज आहे? पण मला ते पटत नाही. माझी त्या मुलीमधे बरीच इनव्हॉल्व्हमेंट होती. त्यातून बाहेर पडायला मला बराच वेळ लागला. तेव्हा माझ्या होणाऱ्या जोडीदाराला ही गोष्ट मी नक्कीच सांगणार.'

'एका मुलीला फिटस् यायच्या. पण तिच्या आई-वडलांनी ही गोष्ट लपवून ठेवली. वरवर तर काहीच जाणवत नव्हतं. त्यामुळे पसंती झाली. लग्नही झालं. पण ऐन मंगळागौरीच्या दिवशी तिला फिट आली आणि सासरचे लोक बिथरले. आता हे लग्न टिकणं कठीण दिसतंय.'

एक बाई कामावरून घरी रिक्षानी चालल्या होत्या. त्या रिक्षावाल्यानी त्या बाईंना त्या रिक्षात बसलेल्या असतानाच छेडायला सुरुवात केली. त्यांना त्यांच्या घराबद्दल विनाकारणच माहिती विचारली. एवढ्यावरच तो थांबला असता तरी ठीक होतं. पण त्यांना घराजवळ सोडलं आणि त्यांच्याकडून रिक्षाचं भाडंही घेतलं नाही. वर 'आपण परत भेटू' असं म्हणाला. झालेला हा प्रकार विचित्र वाटल्यामुळे त्यांनी आपलं जवळचं माणूस म्हणून नवऱ्याला सांगितला. तर त्यांच्या नवऱ्यानी या सर्वांचा वेगळाच अर्थ काढला. 'तुझंच रिक्षावाल्याशी काहीतरी लफडं आहे. म्हणून त्यानी तुला असं विचारलं,' असं तो म्हणाला. आपल्या सर्वांत जवळचं माणूस म्हणून त्या बाईंनी सर्व घडलेला प्रकार नवऱ्याला सांगितला हेच त्यांचं चुकलं असं वाटतं. मग जवळचं माणूस कुणाला म्हणायचं? कुणाला मानायचं? हाच प्रश्न पडतो. नवऱ्यालाही एवढ्या वर्षांनंतर आपल्या बायकोबद्दल इतका अविश्वास असला तर खरं बोलण्याची सोय नाही असाच अर्थ झाला. मला वाटतं, असे नवरे अपवाद असावेत. एकमेकांवर विश्वास ठेवणाऱ्या आणि न ठेवणाऱ्यांच्या संख्येची आकडेवारी काढायलाच लागणार.

सध्याच्या काळात लग्नाचं वय 'पुढे' सरकलं असल्यानी मुलं-मुली दोघांच्याही बाबतीत शारीरिक संबंध घडले असण्याची शक्यता नाकारता येत नाही; त्यामुळे होणाऱ्या संततीसाठी तरी, त्यांच्या आरोग्याचा विचार करून एच.आय.व्ही. टेस्टला महत्त्व द्यावं. इतर शारीरिक स्वास्थ्याची तपासणीही

अर्थात आवश्यक आहे.

खरी गोष्ट काय ती जोडीदाराला कळेल किंवा कदाचित एखादेवेळी ते गुपित काही वर्षं झाकूनही राहील. या परिणामांवरून खरं बोलावं का नाही याचं उत्तर ठरवणं योग्य नाही. खरं बोलणं हे स्वतःसाठी महत्त्वाचं आहे, खरं हे एक मूल्य म्हणून ती व्यक्ती मानते का, हा खरं तर महत्त्वाचा प्रश्न आहे.

जीवनसाथ विवाह-अभ्यास मंडळामुळे खरं बोलण्याचं महत्त्व लोकांना कळायला लागलं आणि समाज एकदम बदलला अशी समजूत वरच्या सगळ्या विधानांमुळे होऊ शकते. प्रत्यक्षात फार मोठ्या मध्यमवर्गीय, सुशिक्षित आणि शहरी मराठीभाषिक लोकांसाठी मी काम करतो आणि त्यांच्यापैकी थोड्याच लोकांनी केलेली ही विधानं आहेत. बाकीचा लाखोंचा, काही कोटींचा मराठीभाषिक समाज किती प्रमाणात खरं बोलण्याच्या वाटेवर आहे याबद्दल मला शंकाच आहे.

जीवनसाथमधे अगदी नियमितपणी येणारी काही अविवाहित मुलं, मुली पुढे येईनाशी झाली. काही विवाहित जोडपी यायची ती यायची बंद झाली. काही गटचर्चेला न येता वैयक्तिक समुपदेशनाला यायला लागली. काही वेळा भेटले, मी त्यांना काही गोष्टी लिहायला सांगितल्या. त्या त्यांनी लिहिल्या. त्याच्या पुढच्या टप्प्यावर जेव्हा त्यांच्या खऱ्या अडचणीवर मी बोट ठेवायला लागलो तेव्हा ते येईनासे झाले. पूर्ण गायबच झाले. इतर लोकांकडून काय नेमकं झालं ते माझ्यापर्यंत केव्हातरी पोचतं. त्यांची मुख्य तक्रार अशी होती की, 'अनिलदादा फार खरं बोलतात.'

मला अशी खूप माणसं माहिती आहेत की जी खऱ्याला घाबरतात. त्यांचं अस्सल खऱ्या स्पष्ट मांडलेल्या विचाराशी वाकडं असतं त्यामुळे ती पळ काढतात. माझ्या वैयक्तिक समुपदेशनात खेदानी मला म्हणावंसं वाटतं की पुरुष जास्त प्रमाणात खोटं बोलतात. काही बायका नाइलाजानी संसार रेटतात. काहींचा नवरा या जातीच्या खरेपणावरचा विश्वास इतका उडतो की, तो संसार मोडतोच.

व्यवस्थापनशास्त्र शिकवणं हाच माझा व्यवसाय असल्यामुळे खरं बोलून बांधकाम व्यवसाय कसा करावा यासंबंधी मी अनेक वर्षं कार्यशाळा घ्यायचो. काही शाळांमधे अलीकडे मुलं फार खोटं बोलतात म्हणून माझ्याकडे मागणी आली की, अशीच कार्यशाळा शाळेतल्या मुला-मुलींसाठी घेता येईल का? प्रथम मी जरा तयारी केली, शाळेची कार्यपद्धती समजावून घेतली आणि मग अनेक शाळांमधे 'खरं बोलणं' या विषयावर कार्यशाळा झाल्या. आपला या पुस्तकाचा

विषय विवाह-अभ्यास असल्यामुळे त्या शाळेतल्या मुलांशी कुठच्या विषयावर आम्ही गप्पा मारल्या ते मी नुसते मुद्दे इथे देणार आहे.

या प्रत्येक विषयाविषयी खरं काय, ते खरं सांगण्यातल्या अडचणी आणि मानसशास्त्र, व्यवस्थापनशास्त्र आणि तत्वज्ञान या तीनही अंगांनी जरा जास्त खऱ्याच्या जवळ जाणारं कसं बोलता येईल यावर गप्पा झाल्या. मग याहीपेक्षा खरं, संपूर्ण खरं बोलायचं ठरवलं तर काय काय करावं लागेल, असं करत पुढच्या वेळेला पुन्हा भेटू त्यावेळेला 'माझे सत्याचे प्रयोग' याविषयी प्रत्येकानी बोलायचं ठरून कार्यशाळा संपली. आता ते विषय ओळीनी एकाखाली एक असे सांगतो.

| | | **किती खोटं** | **किती खरं** | **पूर्ण खरं** |
|---|---|---|---|---|
| 1) | शाळेमधे शिक्षकांशी गृहपाठाबद्दल | ,, | ,, | ,, |
| 2) | मार्कांबद्दल पालकांशी | ,, | ,, | ,, |
| 3) | मैत्रिणींबद्दल पालकांशी | ,, | ,, | ,, |
| 4) | पैशांबद्दल मित्रांशी | ,, | ,, | ,, |
| 5) | पैशांबद्दल पालकांशी | ,, | ,, | ,, |
| 6) | करमणुकी (सिनेमे)बद्दल पालकांशी | ,, | ,, | ,, |
| 7) | सिगारेट, दारू, गर्दबद्दल पालकांशी | ,, | ,, | ,, |
| 8) | हस्तमैथुनाबद्दल पालकांशी | ,, | ,, | ,, |
| 9) | खेळांबद्दल शिक्षकांशी | ,, | ,, | ,, |
| 10) | उशिराबद्दल मित्रांशी | ,, | ,, | ,, |
| 11) | उशिराबद्दल पालकांशी | ,, | ,, | ,, |
| 12) | आर्थिक परिस्थितीबद्दल मित्रांशी | ,, | ,, | ,, |
| 13) | आर्थिक परिस्थितीबद्दल मैत्रिणीशी | ,, | ,, | ,, |
| 14) | शाळेबद्दल बहीण-भावाशी | ,, | ,, | ,, |
| 15) | अन्यायाबद्दल शिक्षकांशी | ,, | ,, | ,, |
| 16) | फूटतूट झाल्याबद्दल पालकांशी | ,, | ,, | ,, |

अशा कार्यशाळांमुळे खोटं बोलण्यापासून खरं बोलण्यापर्यंतचा प्रवास अगदी सावकाश होतो, पण शेवटी होतो.

माझ्या लहानपणी दहाव्या वर्षापासून म्हणजे पाचव्या इयत्तेपासून स्त्री-पुरुष

आकर्षण हा विषय मुला-मुलींच्या डोक्यात घोळत असायचा. ही गोष्ट 62 वर्षांपूर्वीची असल्यामुळे मधल्या काळात बरेच बदल झाले आहेत. त्या सगळ्याचा परिणाम सगळ्यांवर होणारच. स्त्री-पुरुष आकर्षण अगदी लहानपणापासून असतं हे मान्य आहे, पण ते व्यक्त होण्याचं वय साधारण 10 होतं. ते आता दोन-तीन वर्षं अलीकडे आलं आहे. वर दिलेल्या इतर अनेक विषयांबद्दल मुलामुलींचं खोटं बोलण्याचं प्रमाण खूप आहेच, पण त्यात हा एक मोठा आणि महत्त्वाचा विषय वाढलेला आहे. शाळांमधून लैंगिक शिक्षण हा विषय शिकवला जात असला तरी माझ्या माहितीप्रमाणे अजूनही तो योग्य पद्धतीनी शिकवत नाहीत. त्यासाठी मी आणि शोभा लहानांना आणि मोठ्यांना लैंगिक शिक्षण देतो. वयाप्रमाणे तपशील, पद्धत यांत अर्थात बदल करावे लागतातच. या पुस्तकात 'लैंगिक शिक्षण' हा स्वतंत्र लेख असल्यामुळे शाळेतल्या मुलांच्यात चर्चा झालेले दोनच मुद्दे इथे मांडतो.

मुलगे आपलं प्रेमप्रकरण आहे असं मानण्यात आणि सांगण्यात अभिमान बाळगतात. याउलट मुली प्रेमप्रकरण शक्यतोवर टाळतात किंवा लपवतात कारण भविष्यात सुरक्षित आयुष्य, योग्य स्थळाशी लग्न वगैरे विचार त्यांच्या कुटुंबांनी लहानपणीच डोक्यात भरवलेले असतात.

आता पुन्हा लग्नाच्या वयाच्या मोठ्या तरुण मुला-मुलींकडे वळूया. जोडीदार निवडताना मुलगा-मुलगी दोघंच बोलले, आई-वडील त्यांच्यावतीनी बोलले तरी खोटं सांगण्याच्या कार्यक्रमात फरक नसतो. खरं म्हणजे प्रेमविवाहात देखील मुलगा-मुलगी एकमेकांशी खोटं बोलतात. आपली दुखणी, आजार यांच्याविषयी खोटं बोलणं चूक आहे. आधीच्या प्रेमप्रकरणांविषयी आणि प्राप्तीविषयीही सांगायलाच हवं. मुलगे पगार फुगवून सांगतात अशी अनेक मुलींची तक्रार असते. मुली पगार खरा सांगायला घाबरतात कारण तो जास्त असला तर पुरुषी अहंकार दुखावल्यामुळे नकाराची शक्यता असते. पण मुली वय खोटं सांगतात अशी मुलांची तक्रार असते. बघण्याच्या, लग्न ठरवण्याच्या बैठकांच्यामधे आवडीनिवडीविषयी सोयीस्करपणे खोटं बोलतात. आईनी केलेला खाद्यपदार्थ मुलीनी केलाय, असं तर सर्रास सांगतात.

पुन्हा सांगतो. आपण नोकरी मिळवण्यासाठी जसा बायोडेटा देतो, तसा मॅरेज बायोडेटा हा पूर्ण तपशिलात द्यायलाच पाहिजे असं मला वाटतं. खरं सांगितल्यानी नुकसान होतं यावर माझा विश्वासच नाही. खरं कसं बोलायचं हे

मात्र शिकावं लागतं.

याच्या दोन महत्त्वाच्या पायऱ्या आहेत. पहिली गोष्ट खरंच बोलायचं हा निर्णय घ्यावा लागतो. मग दुसऱ्या पायरीवर जाऊन त्याचं कसब आत्मसात करायचं. नाहीतर खरं बोलून नुकसान होतं. त्या धक्क्यामुळे खरं बोलण्यावरचा विश्वास उडतो. ही प्रक्रिया माणूस जेवढ्या लवकर सुरू करेल तेवढं चांगलं. म्हणजे निस्तरायच्या गोष्टी संख्येनी कमी आणि मर्यादित राहतात.

खरं बोलणं हा विषय शिकायला सुरुवात केली की त्याच्या पायऱ्या समजावून घ्याव्या लागतात. त्या पायऱ्या अशा –

1) कशाविषयी बोलायचंय् त्याची आधी कल्पना द्यायची.
2) कदाचित वाईट वाटेल, पटणार नाही म्हणून आधी माफी मागायची.
3) खरं बोलायचं. मुद्दा थेट पण थोडक्यात सांगायचा.
4) त्यामागचं खरं कारण सांगायचं.
5) शेवटी पुन्हा माफी मागायची.
6) संबंध बिघडू नयेत अशी विनंती करायची कारण तशी माझी इच्छा नाही सांगायचं.
7) यावर अधिक विचार करावा अशी विनंती करायची.
8) सर्वांत महत्त्वाचं. तिथे थांबून राहायचं नाही. निघतो असं सांगून निघायचं.

दुसऱ्यानी विचारलेल्या प्रश्नाला खरं उत्तर देणं कधीकधी कठीण असतं. एखाद्या वेळेला आसपासची माणसं, वेळ सोयीची नसते. कारण नंतर सांगीन म्हणून त्यावेळी काम उरकावं. पण नंतर आठवणीनी कारण सांगावं.

माझ्या आणि शोभाच्या हातून झालेली एक चूक सांगतो,

माझा एक घटस्फोटित मित्र आणि शोभाची एक घटस्फोटित मैत्रीण यांनी लग्न करणार असं आम्हाला सांगितलं. आम्ही बेचैन झालो कारण ती मुलगी अर्धवट होती आणि हा माझा मित्र मात्र चांगला होता. लग्नाला आठवडा राहिलेला. आम्हाला स्वस्थही वाटत नव्हतं आणि ते लग्न मोडण्याचं धाडसही होत नव्हतं. आम्ही शेवटपर्यंत ते त्यांना सांगू शकलो नाही. माझ्या मते आम्ही

गप्प बसलो म्हणजे खोटंच वागलो. त्यांचं पुढे बिनसलंच. पण आम्हाला अजून त्या गोष्टीचं वाईट वाटतं.

विवाहाच्या संदर्भातला आणखी एक मुद्दा म्हणजे विवाहबंधन म्हणजे एक प्रकारची कायदेशीर सनद आहे. पण ती जोडण्याची सनद आहे. तोडण्यासाठी ते लायसन्स नाहीय. शिवाय लग्न झाल्यामुळे आपल्याला कसंही वागण्याचं, न वागण्याचं लायसन्स मिळालं असं सरकारी पर्मनन्ट जॉब मिळाल्यासारखं वागू नये. अठ्याण्णव टक्के खरं कसं बोलायचं याचं प्रॅक्टिकल म्हणजे लग्न आहे. ते चॅलेंज घेऊन खरंच पण कसं बोलायचं ते एकमेकांपासून शिकण्याची गुरुशिष्यांची ती जोडी आहे. त्यांनी प्रॅक्टिकल्स करून एकमेकांना शिकवायचं आहे. त्यासाठी मदत व्हावी म्हणून विवाह प्रश्नावली आहे.

गल्फ कंट्रीजमधली एक गंमत सांगतो. तिथे अनेक कामगार झाडूवाले म्हणून जातात. इथल्या लोकांना ते काय काम करतो असं कळवतात माहितीय्? 'क्लीनिंग इंजिनियर.' तिथे गेल्यावरही हे पितळ उघड पडत नाही कारण तिथल्या पद्धतीप्रमाणे मालक राहण्याची जागा देतो, जाण्यायेण्याच्या वाहनाची सोय असते. पगार रोखीत मिळाल्यामुळे 'पे स्लिप'वर काम काय, हुद्दा काय हे वाचण्याचाही प्रसंग येत नाही. बायको, मुलं कामाच्या जागेवर कधीच जात नाहीत. बहुतेक वेळा हा प्रश्न येत नाही कारण कमी पगाराच्या छोट्या हुद्द्यावरच्या लोकांना फॅमिली व्हिसा मिळत नाही. त्यामुळे गेले तरी ते व्हिजिट व्हीसावर अगदी कमी दिवस जातात.

मी कन्स्ट्रक्शन मॅनेजमेंटमधला माणूस आहे. आमचा संबंध मोठ्यात मोठ्या साहेबांपासून अशिक्षित, अर्धशिक्षित कामगारांपर्यंत येतो आणि कमी वेळात बांधकाम करवून घेण्यासाठी लोकांशी गोड बोलावं लागतं. ते गोड म्हणजे खोटं मात्र चालत नाही. सत्य हे कटू असतं म्हणतात ते गोड कसं वाटेल, याचं शिक्षण घेण्याविषयी आपण बोलतो आहोत. कामगारांशी वागताना सुद्धा हा खऱ्याचा नियम सतत लागू आहे.

शोभाकडे अनेक लोक अनेक प्रकारच्या कामांसाठी येत असतात. शोभा त्यांना आश्वासनं देते. अनेक लोक अनेकांना आश्वासनं देताना आपण बघतो, पण ते ती पुरी करू शकत नाहीत. शोभाचं तसं नाही. शोभानी दिलेली आश्वासनं खरी असतात आणि ती पुरीही करते.

मी स्वतःला नशीबवान समजतो, कारण मी सल्ला-मसलतीच्या व्यवसायात

आहे. मला लोक खरं बोलण्यासाठी नेमतात. मग ते बांधकामाच्या सल्ल्यासंबंधी असो किंवा वैवाहिक समुपदेशनात असो.

काही लोकांशी आपलं जमत नाही. अमुक व्यक्ती मला आवडत नाही असं म्हणण्याऐवजी 'त्या व्यक्तीचं नि माझं जुळत नाही,' असं म्हटलं तर खरं, पण योग्य पद्धतीनी ते व्यक्त होतं.

या पुस्तकात इतर ठिकाणी अनेकदा केलेलं विधान पुन्हा शेवटी सांगतो.

समुपदेशक हा सल्लागार नसतो.

समुपदेशक हा वकील नसतो.

समुपदेशक हा प्रतिनिधी नसतो.

समुपदेशक हा न्यायाधीश नसतो.

समुपदेशक हा मध्यस्थ नसतो.

जे तुमच्या मनात आहे ते 'खरं', खरे विचार, खऱ्या भावना बाहेर काढायला, व्यक्त करायला तो मदत करतो, प्रोत्साहन देतो. त्यानीच खरी मदत होते.



# 4

# नकार देण्याची कला

दुनियेत माणसांच्या एकूण दोन जाती आढळतात. एका जमातीला त्यांनी स्वतःहून ठरवलेली इतकी कामं असतात की त्यांना दिवसाचे 24 तास, आठवड्याचे 7 दिवस, महिन्याचे 30 दिवस कसे पुरवू असा कायमचा प्रश्न पडलेला असतो. थोडक्यात त्यांचं अखंड वेळेचं युद्ध चालू असतं. दुसऱ्या जमातीची परिस्थिती थेट उलट असते. करायला काही अर्थपूर्ण काम नसतं. वेळ कसा घालवायचा हा मुख्य प्रश्न असल्यामुळं सण, व्रतं, समारंभ त्याचबरोबर कुचाळक्या आणि टवाळी यांच्या आधारानी ते कसाबसा प्रत्येक दिवस ढकलतात. साधारणपणे या दोन जातींच्यात एका बाजूकडून दुसरीकडे जाण्याचा प्रसंग क्वचितच घडतो. प्रयत्न केलाच तर त्याचा त्रास होतो. त्यामुळे बहुतेक लोक आपल्या मूळ जातीत परत येतात.

आपला जो आजचा विषय आहे त्याचा याचा संबंध सांगतो. वेळ घालवायची पंचाईत असलेल्यांना एखाद्या गोष्टीला नकार द्यावासा वाटला तरी त्यांच्याकडे तेवढं धाडस नसतं. खूप काम असलेल्यांना नकाराचं धाडस असतं, पण आयुष्यात नेमका कशाला नकार याची त्यांची यादी बनायला फार वेळ लागतो. वेळ हीच त्यांची मुख्य पंचाईत असल्यामुळे नको असलेल्या गोष्टी त्यांना वेळेवर माहीत झाल्या तर फार चांगलं होईल. त्यामुळे खऱ्या अर्थपूर्ण गोष्टींसाठी स्वतःला असलेला वेळ वाढेल. अप्लाइड सायकॉलॉजीचं शास्त्र असं म्हणतं की नकार देण्याची ताकद ही खरी ताकद आहे आणि ही अतिशय सकारात्मक गोष्ट आहे. आपण पूर्वी करून बघण्याविषयी बोललो होतो. करून बघत असताना एक फायदा असतो. काय करायचं आणि कशाला नकार द्यायचा याची यादी एकाच वेळेला बनत असते. व्यवस्थापनशास्त्रातलं एक फार महत्त्वाचं तत्व आहे. ते

असं. 'काही दारं बंद केल्याशिवाय दुसरी काही दारं उघडत नाहीत नि काही दारं उघडल्याशिवाय दुसरी काही दारं बंद करता येत नाहीत.' लहानपणापासून प्रत्येकानी आठवून बघावं. ज्याला चांगल्या पद्धतीनी म्हणजे यशस्वीपणे नकार देता येतो, त्याचं चांगलं होतं. लग्नसमारंभात नको असताना जिलब्यांचा वाढलेला ढीग आठवून पाहा. चहा नको असताना जो चहा टाळू शकतो त्याचं भलं होतं.

मधे थोडं नकार देण्याच्या पद्धतीविषयी बोलूया. मुखदुर्बळाला नकार देणं कठीण जातं कारण त्यासाठी विशिष्ट पद्धतीनी बोलावं हे लागतंच. त्या पद्धतीमधलं मर्म थोडक्यात असं. आपल्याला ती गोष्ट का नको ते शब्दांत सांगणं, दुसऱ्याची त्याबद्दलची कळलेली अडचण शब्दात मांडणं. त्याच्यापुढे नकाराबद्दल ज्याला स्पष्ट शब्दाबद्दल माफी मागता येते त्याला काळजीचं कारण नाही. नुसत्या ओशाळलेल्या चेहऱ्यानी काम होणार नाही. आम्ही दोघं, म्हणजे मी आणि शोभा सतत वेळेच्या युद्धात गुंतलेले असल्यामुळे आम्हाला ही पद्धत वापरावीच लागते. स्वतःचा व्यवसाय आणि आपल्या आवडीचं सामाजिक काम यात आमचा वेळ कसा जातो, आम्हाला पत्ताच लागत नाही. या पद्धतीच्या आयुष्यात खूप मजा येते हे आम्ही अभिमानानी आवर्जून सांगतो आहोत.

एक महत्त्वाची गोष्ट स्पष्ट करायची राहिली ती स्पष्ट करतो. वर्कलोड बॅलन्स नावाची गोष्ट छान, पण काल्पनिक आहे. प्रत्यक्षात ती अशक्य आहे. अनेक वर्षांच्या आमच्या अनेक देशातल्या अनुभवात आम्हाला असा एकही आठवडा आठवत नाही की, आपल्याला असलेला वेळ, आपली 'एनर्जी' आणि समोर असलेली कामाची यादी यांचा बरोबर मेळ जमला. कधी पैसे कमी, तर कधी माणसं कमी. कामाची यादी मात्र ढीगानी वाढते. नकारासाठी काही लोक खोट्याचा आधार घेतात तोही आम्ही घेत नाही.

माझ्या समुपदेशनाच्या वेळापत्रकात आधी कबूल केलेल्या वेळा मी कधीही चुकवत नाही. ठरल्या ठिकाणी ठरलेल्या वेळेला मी कायम हजर असतो. मी खूप कडक शिस्तीचा माणूस आहेच मुळात. कौटुंबिक गरजेसाठी मी कोणाशीही ठरलेली वेळ शक्यतोवर बदलत नाही. त्या ठरलेल्या वेळेमधेच भेटण्यासाठी दुसरं कोणी आग्रह करायला लागलं तर मी त्याला नकार देतो. 'अमुक वेळ दुसऱ्या व्यक्तीला कबूल केलेली असल्यामुळे मी त्या वेळेला तुम्हाला भेटू शकत नाही.' हे वाक्य अनेक लोकांना नकारात्मक वाटतं. प्रत्यक्षात हे बोलणं अतिशय

जबाबदारीचं म्हणजेच सकारात्मक आहे.

खरंच पण चांगल्या शब्दात कसं सांगायचं या विषयाचे आम्ही दोघं अनंतकाळचे विद्यार्थी आहोत. आम्ही दारू पीत नाही. त्यामुळे शक्यतोवर पार्ट्या टाळतो. काही ठिकाणी बरोबरच्यांची माफी मागून दारुला नकार द्यावाच लागतो, पण तुम्ही प्यायला आमची हरकत नाही हे आम्ही आवर्जून सांगतो. सिगारेटचं तसंच. आम्ही सोनं वापरत नाही त्यामुळे त्याची तशीच परिस्थिती होते. भारी कपडे वापरणं सोडून दिल्यानी आम्हाला अतिशय स्वस्थ आणि शांत वाटतं. पण त्यासाठी नकाराची ताकद हवी.

आम्ही नवरा-बायको दोन स्वतंत्र व्यक्ती असल्यामुळे आणि आम्ही व्यक्तिस्वातंत्र्य हे महत्त्वाचं मूल्य खूप मानत असल्यामुळे मी आणि शोभा यांच्या नकाराच्या यादीत किंवा नकाराच्या तीव्रतेत फरक असतो. उदा. मी लग्नसमारंभ किंवा त्यांसारखे कृत्रिमतेचे सगळे समारंभ पूर्ण कटाप केले. शोभा अजून क्वचित अशा समारंभांना जाते. लग्नसमारंभाचं निमंत्रण घेऊन आलेल्या माणसाला मी थोडक्यात माझी भूमिका समजावून सांगतो, माफी मागतो. चहा-कॉफी, सरबत काहीतरी देतो. लग्नाची धांदल संपली की जरूर शांतपणे भेटूया असं सांगतो.

भेटवस्तू देण्याघेण्यातला हिशेबीपणा फार बोचायला लागल्यानी मी भेटवस्तू देवाणघेवाण पूर्णपणे सोडून दिली तर शोभाला क्वचित त्या घ्याव्या लागतात. बुद्धिप्रामाण्यवादामुळे मी दुसऱ्या कोणाकडून नमस्कार करून घेत नाही, गंध लावून घेत नाही, प्रसाद घेत नाही. शोभाची या बाबतीतली पद्धत निराळी असते. आमच्या दोघांच्या मुलाच्या आणि मुलीच्या लग्नाच्या काळात आमच्या कुटुंबात एकमतानी एक स्पष्ट ठरलं होतं. श्रीमंत जोडीदार नको, मध्यमवर्गीय हवा हे पक्कं ठरलेलं होतं. 6-8 महिने एकमेकांशी चांगली ओळख झाल्याशिवाय लग्नाच्या बंधनात अडकायला आमच्या कुटुंबाचा नकार होता.

अशासारखे काही प्रसंग तुमच्याही आयुष्यात येत असतील. काही विवाहाचा संबंध असलेले, काही नसलेले. दर आठवड्याला कर्ज पाहिजे का, क्रेडिट कार्ड पाहिजे का, असं विचारत येणाऱ्या सेल्समनना तुम्ही स्पष्ट आणि सभ्यपणी नाही सांगू शकता का? दारावर येणाऱ्या विक्रेत्याला स्वस्त वाटणारी पण भिकार वस्तू पदरात पडण्याच्या शक्यतेमुळे तुम्ही स्पष्ट नकार देऊ शकता का? दुकानात गेल्यावर तुम्हाला काहीतरी वस्तू घेतल्याशिवाय न सोडणं हे त्या दुकानदाराचं काम आहे. पण खरोखर पसंत पडल्याशिवाय वस्तू न घेणं हे तुमचं काम आहे.

असं तुम्ही वागता का? नकार न देण्यामागची मुख्य प्रेरणा दुसऱ्याला काय वाटेल, समोरचा माणूस रागावेल, त्याला वाईट वाटेल ही भीती असते. आपल्याला स्वतःवर होणारा अन्याय आणि गैरसोय सहन न करता दुसऱ्याच्या राग, दुःख या भावना कमी करण्याचं तंत्र आपल्याकडे असलं तर काळजीचं कारण नाही.

पैशाच्या व्यवहारासंबंधी नकार देण्याची आणि नकार घेण्याची अनेकदा वेळ येते. समुपदेशनाला येणाऱ्या, बांधकाम, व्यवस्थापनक्षेत्रात सल्ल्यासाठी येणाऱ्या अनेक लोकांकडून मी फी घेत नाही. कधी संबंध खूप जवळचे असतात म्हणून तर कधी त्यांची पैशाची परिस्थिती माहीत असते म्हणून. मी पैसे घेणं न घेणं यापेक्षा मी ते कसं सांगतो याला फार महत्त्व आहे. मी त्यांना म्हणतो, 'आपले संबंध इतके जवळचे असल्यामुळे तुम्ही केव्हाही फोन करा, संकोच करू नका. फी घेत नाही यामुळे यायचं नाही असं करू नका.' खरी गोष्ट अशी आहे की, काही लोकांचा प्रश्न समजावून घेतल्यावर मी अशा निर्णयापर्यंत पोचतो की, या बाबतीत मी काही करू शकत नाही. मी त्यांच्याकडून फी घेत नाही. चुकून आधी घेतली असली तर मी चक्क फी परत करतो आणि त्याबद्दल माफी मागतो.

याच्या उलट परिस्थितीतून सुद्धा मी गेलेलो आहे. माझे आणि एकाचे खूप जवळचे संबंध आहेत. त्यानी मला अनेक वर्षं अनेक बाबतींत आपुलकीनी मदत केली आहे. मधे एक गोष्ट मला अशी सापडली की, ज्याचा मोबदला म्हणून मी त्याला पैसे देऊ शकेन. रोख घ्यायला तो खळखळ करेल म्हणून मी सोपं करण्यासाठी त्याला चेक दिला आणि घेण्याची विनंती केली. त्यानी तो चेक नाकारला, पण नाही म्हणण्याची त्याची पद्धत मला पसंत पडली नाही. मला वाईट वाटलं. हळूहळू ते मी विसरलो कारण आमचे कौटुंबिक संबंध खरोखरच फार जवळचे आहेत. अजून केव्हातरी मधेच तो प्रसंग आठवतो. त्यानी तो चेक आम्ही बसलो होतो तिथे चक्क बाजूला टाकून दिला.

अगदी साध्या प्रसंगांतला स्वतः विचार करून सांगितलेला निर्णय आठवून बघा. 'चहा आणखी नको, मी कॉफी घेत नाही, मी मांसाहार करत नाही, मी दारू पीत नाही, मला दोनच पोळ्या बास, जिलबी आणखी नको.'

'माझ्या परीक्षेचा पेपर आहे, माझा अभ्यास राहिला असला तरी मी तो रात्री जागून करीन. तुम्ही कोणी जागे राहू नका. मी रात्री चहा स्वतः करून घेईन. त्यासाठी मला कोणाची मदत नको.'

'हा सिनेमा मी दोनदा बघितलाय्. त्यामुळे मी येणार नाही.' 'आज मला वेळ नाही म्हणून नकार देतोय.' 'मी हे काम करू शकत नाही.'

'हा खेळ मला आवडत नाही. मी खेळणार नाही.'

'या विषयाची मला गोडी नाही. मी हा विषय घेणार नाही.'

'आईवडील, घरची माणसं अमुक कोर्सला जा, असं म्हणतायत्. पण मला हा कोर्स नको.'

'मला वाटतं, मी स्वतः नोकरी करून पैसे मिळवून शिकेन. डिस्टन्स एज्युकेशनचा एखादा आवडीचा कोर्स निवडून करीन. माझ्या आत्मसन्मानासाठी हे महत्त्वाचं असल्यामुळे मी वडलांकडे पैसे मागणार नाही, त्यांनी दिले तरी त्याला माझा नकार आहे.'

ही सगळी उदाहरणं सकारात्मक कारणांसाठी दिलेल्या नकारांची आहेत.

विवाह या विषयात काय काय होतं बघूया. मनातून पसंत नसलेल्या स्थळाला नकार द्यायलाच पाहिजे. ते आईवडलांना समजावून सांगता आलंच पाहिजे. त्याआधी स्वतःचे विचार तयार हवेत. ते विचार म्हणजे काय ते जरा एक एक करून बघूया.

स्थळाला नकार चांगल्या प्रकारे द्यायला शिकायचं असल्यामुळे नकार देण्याची माध्यमंही बारकाव्यात जाऊन तपासूया– 1) फोनवर, 2) पत्रानी, 3) प्रत्यक्ष भेटीत, 4) मध्यस्थामार्फत, 5) इंटरनेटवर.

1 ) **फोनवर** – माझ्या मते प्रत्यक्ष निवड ठरवण्यापासून नाही सांगण्यात पुढाकार मुलाचा किंवा मुलीचा असायला पाहिजे. ॲरेंज्ड मॅरेज असलं काय किंवा किंवा लव्ह मॅरेज असलं काय. पारंपरिक घरात हे मान्य होणार नाही हे मला माहीत आहे. जीवनसाथमधे वैयक्तिक समुपदेशनासाठी येणाऱ्या निम्म्या तरुण लोकांना आई-वडील, भाऊ-बहीण कोणीतरी घेऊन येतात. मग त्यांना कळतं किंवा कधीकधी सांगावं लागतं की, 'आता तुम्ही कुठेतरी चक्कर मारून या. आम्हाला दोघांनाच थोडं बोलायचंय. मुख्य म्हणजे याचा राग मानू नका. हा समुपदेशनाच्या पद्धतीतला भाग आहे.'

मला असं म्हणायचं आहे की, फोनवर बोलून नकारसुद्धा मुलानी किंवा मुलीनी स्वतः द्यायला पाहिजे. लोक फोनवर बोलतात, पण नकाराचं खरं

कारण सांगत नाहीत. नुसतं 'योग नाही' किंवा 'पत्रिका जुळत नाही' असं सांगतात. प्रत्यक्ष कारण कळणं हे फार महत्त्वाचं आहे. सबंध आयुष्यभरातली आपली गरज आठवून बघा. होकार किंवा नकार चालेल, पण उलगडा हवा अशी प्रत्येकाची इच्छा असते आणि होकार नकाराचं कारणही आवश्यक असतं. ते ऐकायचं, समजून घ्यायचं असतं. मुख्य म्हणजे कशामुळे काय जमत नाही हे कळलं की कशामुळे जमेल हे समजायच्या वाटेवर एक पाऊल पुढे जातं. नकाराचं कारण सांगण्यात आणखी एक फायदा आहे. ते कारण गैरसमजुतीवर आधारलेलं असलं तर पुनर्विचार करण्याची संधी असते.

2 ) **पत्रानी** – पत्रानी सांगण्यात एक फायदा निश्चित आहे. कागदावर आणि शब्दात लिहिताना दसपटीनी स्पष्ट विचार माणसाकडून होतो. पत्रात लिहिताना 'लग्न पहावं करून' या माझ्या पुस्तकातल्या फॉर्मचा उपयोग अवश्य करावा. स्वतःच्या व्यक्तिमत्त्वातले गुणदोष आणि ज्या व्यक्तीला नकार द्यायचा त्याच्या समजलेल्या व्यक्तिमत्त्वावर गुणदोषांसकट थोडक्यात पण स्पष्ट लिहावं आणि प्रत्यक्ष भेटून याविषयी बोलण्यात अडचण नाही असंही म्हणावं.

3 ) **प्रत्यक्ष भेटीत** – पहिली गोष्ट म्हणजे भेटल्याभेटल्या पहिल्या दोन मिनिटांत आपला नकार सांगण्यासाठी आपण भेटतो आहोत हे स्पष्ट करावं. हा लग्न ठरवण्याच्या प्रक्रियेचाच भाग असल्यामुळे त्यात हिरमुसलं होण्याजोगं काही नाही हे जरूर सांगावं. 'लग्न पहावं करून'चा उपयोग अवश्य करावा. बाहेर रेस्टॉरंटमधे भेट ठरली असली तर खाद्यपेयाचा खर्च विभागून घेऊ हे आधीच सांगावं. आपली ओळख झालीय् ती तशीच ठेवूया असंही सांगावं. माझ्या गेल्या 18 वर्षांतल्या निरीक्षणात मुलींकडून नकार असण्याचं एक महत्त्वाचं कारण म्हणजे मुलाकडून असलेली सक्तीच्या गृहिणीपदाची अट. करिअर गर्लला ही अट मान्य होणं शक्यच नाही.

4 ) **मध्यस्थामार्फत** – व्यक्ती किंवा संस्था. ही सर्वांत वाईट पण सर्वांत लोकप्रिय पद्धत आहे. यातली मुख्य अडचण म्हणजे आपण ज्या नाटकात भूमिका करतो त्यातले सगळे संवाद दुसऱ्यानी लिहिलेले असतात. आपल्या स्वतःबद्दलच आपल्याला पूर्ण माहिती नसते. त्यात ती माहिती दुसऱ्यापर्यंत पोचवणारी व्यक्ती मधे असली तर माहिती जुन्या कार्बन पेपरनी काढलेल्या अस्पष्ट कॉपीसारखी पोचते. शिवाय मध्यस्थाचं स्वतःचं व्यक्तिमत्त्व त्यात

मिसळलं जातं. त्याखेरीज जास्तीतजास्त लग्न जुळवण्याची मध्यस्थाची लालसा किंवा 'कमिशन' हेही कारण असतं. निवड करायचीच तर मध्यस्थ व्यक्तीपेक्षा मध्यस्थ संस्था बरी. त्यात निदान स्टँडर्डाईज्ड पद्धत असते.

5 ) **इंटरनेटवर –** मुळात माहिती इंटरनेटवर मिळणं, देणं या कल्पनेत काहीच चूक नाही. स्थळांची उपलब्धता एकदम प्रचंड वाढते. सबंध जगभरातली मुलं-मुली भेटू शकतात. आणि तरी मला वाटतं की, 'लग्न पहावं करून'मधल्या प्रश्नावलीचा तिथेही उपयोग करावा. नकार देण्याची सगळी पथ्यं तीच. याच पुस्तकात 'खरं बोलणं' हा विषय शिकण्याच्या ८ पायऱ्या सांगितल्या आहेत. त्या मार्गांनी जावं.

नकार कसा द्यायचा, तर चांगल्या पद्धतीनी, दुसऱ्याला न दुखावता द्यायचा आणि त्यामागचं मुख्य तत्व एकच. दुसऱ्याच्या तर्कबुद्धीला पटेल अशा पद्धतीनी नकार द्यायला हवा. नुसतं 'नाही' हे अन्याय करणारं आहे.

नकाराविषयी आपण बोलत असलो तरीसुद्धा समजा होकार दिला तर,याविषयी थोडा उल्लेख करतो. काही सुसंस्कृत घरातल्या मुलांचेही असे अनुभव येतात की, लग्न ठरणं ते लग्न होण्याच्या मधल्या काळात ते लगट करतात. त्या काळातल्या स्पर्शाच्या सापळ्यात अनेक मुली सापडतात. मुलानी वागण्यात गुण उधळल्यामुळे मुलीला नको नको वाटायला लागलं तरी ती मुलगी नकार देऊ शकत नाही, अशी खूप उदाहरणं आहेत. मुलाचं म्हणणं अगदी साधं असतं. लग्नानंतर लैंगिक संबंध मान्य आहे तर लग्नाआधी करण्यात काय अडचण आहे? खरी गोष्ट अशी आहे की, प्रत्यक्ष 'मॅरेज सर्टिफिकेट' बनेपर्यंत लग्न मोडण्याची संधी नक्की असते. ती शेवटची संधी हवी असेल तर नकार देता येणं हेच महत्त्वाचं. आम्ही दोघं आधीच्या पिढीचे आहोत, फार आदर्शवादी, प्यूरिटन विचार मांडतो आहोत या टीकेची आम्हाला कल्पना आहे, तरीही! भारतीय संस्कृतीतलं सहिष्णुतेचं महत्त्व आम्हाला माहीत आहे. पण ते इथं लागू नाही.

नकार देऊ शकणाऱ्या माणसाला 'जादा', 'आगाऊ' अशी विशेषणं लावण्याची प्रथा आपल्या समाजात आहे. पण अगदी विचार करून प्रामाणिकपणे सांगा– नकार देण्याजोगी दारं बंद केल्याशिवाय होकार देण्याजोगी दारं कशी उघडणार?

दुसऱ्याला न दुखवता नकार द्यायला कौशल्य लागतं. विवाह-अभ्यास

मंडळातल्या अभ्यासक्रमापैकी सभासदांनी पुढच्या कार्यक्रमाचा विषय निवडण्याची पद्धत असते. नकार देण्याची पद्धत याचा मधूनमधून नंबर लागतो. या विषयाच्या व्यवस्थित गटचर्चा पद्धतीनी कार्यशाळा असतात. त्यात अगदी लहानपणी मूल नाही म्हणायला शिकतं तिथपासून चर्चा होते. मग त्यांत बरेच मुद्दे येतात. दुसऱ्याला नाही म्हणताना स्वतःचा अहंकार सुखावतो. त्याचा आनंद आणि दुसऱ्याची निराशा जाणवल्यामुळे स्वतःला झालेलं दुःख या दोन्ही भावना प्रत्येकात असतातच. त्याचा आनंद जास्त होतो ती मनोवृत्ती, दुःख होतं ती मनोवृत्ती आणि काहींना याचा समतोल साधता येतो ते कसब, त्याचं व्यवस्थापनकौशल्य याचा कार्यशाळेत अभ्यास चालतो. प्रत्यक्ष संभाषण कार्यशाळेत आम्ही घटवूनच घेतो. त्याचं नाट्यीकरण, निरनिराळे प्रसंग, प्रश्नोत्तरं असं चालतं.

नकार देण्याची पद्धत हा विषय जोडीदाराची निवड इथे संपत नाही. लग्न झाल्यावरही अनेक प्रसंगांमधे नवऱ्याला, बायकोला नाही म्हणावं लागतं त्याविषयी बोलू. घरात इतर लोकांना, मुलांना, ज्येष्ठांनाही नाही म्हणता आलंच पाहिजे आणि तेही योग्य पद्धतीनी.

लग्नानंतर केव्हा मूल हवं याबद्दलची चर्चा पहिल्या शरीरसंबंधापूर्वीच व्हावी लागते. माझ्या माहितीप्रमाणे याविषयी लग्नाआधी बोलायला पाहिजे हे फार कमी जोडप्यांना, फार कमी कुटुंबांना कळतं. समजा, चर्चा झाली आणि वर्षभर तरी मूल नको असं ठरलं तर गर्भनिरोधाची व्यवस्था काय हे आधी पक्कं करावं लागतं, आणि समजा गर्भनिरोधक गोळ्या असा निर्णय झाला तर त्या आधीपासूनच चालू कराव्या लागतात. कंडोम ही सर्वांत सोपी गोष्ट आहे हे नक्की, पण त्याबद्दल काही विचारच केला नसल्यानी घोटाळा झाल्याची उदाहरणं खूप आहेत. अक्षरशः लग्नाच्या पहिल्या रात्री गर्भ आणि नऊ महिन्यात मूल अशी उदाहरणंही आहेत. या पुस्तकसंचात ‘लैंगिक शिक्षण’ या विषयात याबद्दल सविस्तर मजकूर असला तरी इथे हा उल्लेख करतोय्. कारण इतक्यात मूल नको याविषयी बोलणं म्हणजे लग्नानंतरचा पहिला महत्त्वाचा नकार असतो.

खरं म्हणजे लग्नानंतरची पहिली रात्र म्हणजे लैंगिक शरीरसंबंध केलाच पाहिजे, असं मानायचं कारण नाही. एकमेकांची नीट ओळख, काही प्रमाणात मैत्री, आकर्षण निर्माण झाल्यावर काही दिवसांनी पहिला संभोग झाला तरी काही बिघडत नाही. मुख्य म्हणजे दोघांनाही ही गोष्ट मान्य असली तर ठीक नाहीतर एवढ्या नाजुक, भावनिक, शारीरिक, संवेदनापूर्ण गोष्टीबद्दल पहिला नकार

त्रासदायक ठरू शकेल.

समजा, एकत्र कुटुंब असलं तर सासू-सासरे, दीर, भावजया, नणंदा सगळ्यांशी जमवून घेण्याची पाळी मुलीचीच असते. पूर्वीच्या मुलींनी हे सगळं मान्य केलेलं असायचं. पण सध्याच्या आधुनिकतेच्या वाटेवर प्रवास करणाऱ्या मुलींच्या वाट्याला पारंपरिक कुटुंब आलं तर कसे हाल होतात ते मला समुपदेशनाच्या कामात चांगलंच कळतंय्. काही वेळेला आधुनिकतेच्या वेषात पारंपरिक कुटुंबं वावरत असतात. तेव्हा तर खूपच गोंधळ होतो. अनेक परंपरा, रीतिरिवाज, व्रतवैकल्यं, सण-समारंभ, उत्सव यांना नकार द्यायचा असतो, पण कसा ते समजत नाही. 'जेवढी परीक्षा कठीण तेवढा जास्त कसोशीनी अभ्यास' हे तर आपल्या सगळ्यांनाच माहिती आहे. अशा सर्व नकारांच्या बाबतीत नवऱ्याची मदत गृहीत आहे. पण त्याची अजिबात खात्री नाही. 'तुझे प्रश्न तू सोडव, मला मधे घालू नको' म्हणणारे नवरे खूप असतात. खरं तर ही बेपर्वाई आहे. आईला घाबरणारे, वडलांशी धड न बोलू शकणारे नवरेही भरपूर प्रमाणात असतात. 'अस्वस्थ जोडपं, अस्वस्थ कुटुंब, अस्वस्थ आयुष्य' हा तर सबंध समाजाचा विकार आहे. माझ्या मते 'नकार देण्याची पद्धत' हा एक विषय सबंध कुटुंबानी अभ्यास करण्याजोगा आहे.

संसारातल्या आर्थिक व्यवहारात नवरा-बायको दोघांचाही सहभाग पाहिजेच. अनेक वस्तू घरात घ्यायच्या असतात. दोघांचा सहभाग आला की, चर्चा होणार. चर्चा झाली की कशाबद्दल तरी एकाचा कधीतरी नकार असणार. तो नकार देता आला पाहिजे. इतकी महाग वस्तू नको, इतक्यात नको, स्वस्तातलं न टिकणारं काहीतरी घ्यायला नको हे योग्य पद्धतीनी सांगता आलं पाहिजे.

कुटुंबात येणाऱ्या पाहुण्यांचे प्रकार असतात. अकस्मात येणारे पाहुणे, कळवून, सोय बघून येणारे. त्यांचं स्वागतच असतं. पण काही लोकांना हे कळत नाही की, 3-4 दिवसांचा तो पाहुणा. त्यानंतर घरातल्या लोकांना 'अतिथी तुम कब जाओगे?' असं वाटायला लागतं. कसाही पाहुणा असो, घरावर त्याचा ताण येतोच. खर्च, जागा, गैरसोय सगळ्याच दृष्टींनी अडचण असते. या सगळ्याची समज नसणारा पाहुणा असला तर नवराबायकोमधे पुढच्या वेळी त्या पाहुण्याशी वागताना काय काळजी घ्यायची याविषयी बोलणं व्हायलाच हवं. नवराबायकोचं, कुटुंबाचं बोलणं होऊन चर्चेमधे नकारात्मक गोष्ट मांडण्याची कामगिरी करता आलीच पाहिजे.

नवरा-बायकोच्या 'बेडरूम'मधला प्रसंग असला तरी नकाराचा प्रसंग येतोच. न रागावता-रुसता नवऱ्यानी बायकोला किंवा बायकोनी नवऱ्याला 'आज रात्री संभोग नको,' असं सांगायचं असलं तर ते गोड शब्दात सांगता येणं गरजेचं आहे. तुम्हाला कल्पना नसेल कदाचित, म्हणून सांगतो, नवराबायकोच्या विसंवादाच्या कारणांपैकी निम्म्या कारणांचा प्रत्यक्ष-अप्रत्यक्ष संबंध अयोग्य शारीरिक संबंधांशी असतो. प्रणय ही गोष्ट माहिती नसते, जोडीदाराचं समाधान ही गोष्ट माहिती नसते. याबाबतीत सांगावेत तेवढे प्रकार कमीच आहेत आणि बऱ्याच समस्यांचं मूळ 'नकार देण्याची चुकीची पद्धत' यात असतं.

दुसरं मूल हवं का नको, स्वतःचं का दत्तक याविषयीदेखील फार कमी जोडपी नीट चर्चा करतात. जिथे चर्चा तिथे होकार-नकार असणारच. बायकोची तब्येत, वय, करिअर, कुटुंबाची आर्थिक परिस्थिती या सगळ्या गोष्टींचा विचार करताना बरेच वेळा एक मूल बास असा निर्णय घ्यावाच लागतो. याचाच अर्थ दुसऱ्या मुलाला नकार देणं.

नकार देणं म्हणजे नकारात्मक वागणं अशी अनेकांची समजूत असल्याचं मला माहिती आहे, पण पुन्हा एकदा शेवटी सांगतो, की चांगल्या पद्धतीनी नकार देता आला तर ती सकारात्मकतेकडे जाणारी समतोल वागणूकच आहे.



*दुनियेत माणसांच्या एकूण दोन जाती आढळतात. एका जमातीला त्यांनी स्वतःहून ठरवलेली इतकी कामं असतात की त्यांना दिवसाचे 24 तास, आठवड्याचे 7 दिवस, महिन्याचे 30 दिवस कसे पुरवू असा कायमचा प्रश्न पडलेला असतो. थोडक्यात त्यांचं अखंड वेळेचं युद्ध चालू असतं. दुसऱ्या जमातीची परिस्थिती थेट उलट असते. करायला काही अर्थपूर्ण काम नसतं. वेळ कसा घालवायचा हा मुख्य प्रश्न असल्यामुळं सण, व्रतं, समारंभ त्याचबरोबर कुचाळक्या आणि टवाळी यांच्या आधारानी ते कसाबसा प्रत्येक दिवस ढकलतात. नकार देण्याजोगी दारं बंद केल्याशिवाय होकार देण्याजोगी दारं कशी उघडणार?*

# 5

# मी केलेल्या चुका

'आयुष्यात येणाऱ्या प्रत्येक प्रश्नाचं मर्म एकच – नशिबानी चांगल्या-वाईट अनेक घटना तुमच्या वाट्याला आयुष्यभर येणार. त्याची हाताळणी कशी करायची हे दुसरी कुठलीही शक्ती किंवा व्यक्ती ठरवत नसते. ते तुम्ही स्वतः ठरवायचं असतं. त्यासाठी त्या घटनेच्या सर्व अंगांचा अभ्यास करावा लागतो. त्या अभ्यासासाठी जीवनभर स्पष्ट विचारांची साथ लागते. ती म्हणजेच जीवनसाथ.'

जीवनसाथ हे वधू-वर सूचक मंडळ नाही. आयुष्यात येणाऱ्या विषयांच्या अभ्यासाचं अभ्यास-मंडळ आहे. एक ६० विषयांची यादी अगदी सुरुवातीच्या पुस्तकात, सुरुवातीच्या लेखात दिलीय्. तो म्हणजे अभ्यासक्रम. सगळ्या अभ्यासक्रमातला सर्वांत कठीण विषय म्हणजे 'मी केलेल्या चुका' गटासमोर सांगायच्या.

इतरांनी केलेल्या चुकांविषयी माणूस आयुष्यभर बोलतच असतो. नवरा चूक, बायको चुकीची वागते, मुलं चुका करतात, आई-वडलांना सध्याच्या पिढीचे प्रश्न समजत नाहीत, साहेब वाईट, कामगार सगळे इथून तिथून तसेच, नातेवाइकांचं काही खरं नाही, समाज फार बिघडलाय, भारत देश भिकेच्या वाटेला लागलाय्, ते ओबामा असलेच, जगात केव्हा महायुद्ध होईल सांगता येत नाही, एकूणच सगळ्यांचं चुकतं.

या यादीत फक्त स्वतःच्या चुका राहतात. त्या स्वतःला कळणं, स्वतःशी कबूल करणं आणि त्याच्या पुढची शेवटची पायरी म्हणजे इतरांच्यादेखत स्वतःच्या चुका कबूल करणं. सेल्फ काऊन्सेलिंगचाच हा एक भाग आहे. स्वतःकडे अलिप्तपणी बघितल्याशिवाय हे शक्य नाही.

या कार्यक्रमात 'लग्न केलं हेच चुकलं', किंवा 'या व्यक्तीशी लग्न केलं

हे चुकलं’ असं बोलायला परवानगी नाही. कारण तुम्ही तुमच्या कुवतीप्रमाणे, त्या वेळच्या परिस्थितीनुसार, उपलब्ध असलेल्या व्यक्तींपैकी स्वतः जोडीदाराची निवड केली आहे. जमलेल्या लोकांच्यात मी 72 वर्षांचा विवाह अभ्यासक बहुतेक वेळा सर्वांत मोठा असतो. अर्थातच मी सर्वांत वयानी जास्त चुका केलेल्या असणार. त्याशिवाय मी या कार्यक्रमाचा सूत्रधार आहे त्यामुळे सुरुवात मी करतो. सबंध विषयाचे मी 4 भाग केलेले आहेत ते विवाहितांच्या दृष्टिकोनातून. अविवाहितांना 3 च भाग लागू होतील. ते चार भाग असे :

1) नातेसंबंधांमधल्या माझ्या चुका
2) जोडीदार आणि मुलांशी वागताना मी केलेल्या चुका
3) आर्थिक व्यवहारासंबंधीच्या माझ्या चुका
4) माझा आत्मसन्मान मी जपला, पण दुसऱ्याच्या आत्मसन्मानाबद्दल मी चुकीचा वागलो अशा घटना.

आणखी एक गोष्ट स्पष्ट करतो. आजच्या या कार्यशाळेमधे चुका कबूल केल्या की, त्याच्यावर उपाय काय, त्या सुधारायच्या कशा याची चर्चा आपण करणार नाही. स्वतःच्या चुकांबद्दल इतरांसमोर माणूस बोलायला लागला की एका महत्त्वाच्या टप्प्यावर तो पोचला समजायचं. त्यानंतर तो माणूस स्वतःच्या चुका स्वतः ठरवून सुधारतोच. इतर प्रगत देशांत ‘सेल्फ काउन्सेलिंग’च्या प्रक्रियेमधून गेल्याशिवाय आणि स्वतःच्या उणीवांवर मात केल्याशिवाय दुसऱ्याचं समुपदेशन करायला परवानगीच नसते. भारतात मात्र कोणालाही समुपदेशक म्हणवून घेता येतं. अगदी वधू-वर सूचक संस्था चालवणाऱ्या, पूर्णपणे त्यांचा धंदा करणाऱ्या व्यक्तीलादेखील. त्यांचीही गरज समाजाला आहेच कारण प्रश्न खूप आणि प्रश्न असणाऱ्यांची संख्यादेखील खूप.

मधे माझ्याकडे एक जोडपं समुपदेशनाला येत होतं. त्यातल्या एका जोडीदाराला हे मान्य होतं की, आपल्या हातून काही चुका झाल्या आहेत. दुसऱ्या जोडीदाराला हे मान्यच नव्हतं की, आपल्या हातून काही चुका झाल्या आहेत. दोघांपैकी फक्त एकाची चूक असणं अशक्य आहे. सांगूनही जाम पटत नव्हतं. ‘मी या सबंध कुटुंबावर प्रेम केलं हीच माझी चूक,’ एवढंच ती व्यक्ती उगाळत राहिली. यापुढे गाडीच जात नाही म्हटल्यावर समुपदेशन थांबलं.

आता आजच्या विषयाला सुरुवात करूया.

## १ ) मी नातेसंबंधाच्या बाबतीत केलेल्या चुका

मी तेव्हा किती वर्षांचा होतो ते आठवत नाही, पण स्त्री-शरीराविषयीचं आकर्षण खूप प्रमाणात मनात निर्माण झालं होतं, त्या अर्थी 10-11 वर्षांचा असणार. त्यावेळी मी एका अगदी जवळच्या मोठ्या स्त्रीच्या अंगाला हात लावण्याचा प्रयत्न केला. प्रयत्न युक्तीनी केलेला असल्यामुळे चुकून हात लागला वगैरे थापा मारणं शक्य झालं. त्यामुळे बोंबाबोंब, मारपीट न होता माझी सुटका झाली. प्रत्यक्षात मला ती माझी चूक वाटते. मागे एका कार्यशाळेतले एक गृहस्थ असाही वाद घालत होते की, हे नैसर्गिक आहे. त्यामुळे त्याला चूक कशी म्हणता येईल? मी त्यांना सांगितलं की, हा निर्णय ज्याचा त्यानी घ्यायचा असतो. मला ही माझी मोठी चूक वाटते. मी स्वभावानी भिडस्त असतो तर माझा असं वागण्याचा धीर झाला नसता. पण मी भिडस्त नाही आणि युक्ती शोधून मी लबाडी केली असं मला वाटतं.

आम्ही ठाण्याला राहायचो पण उन्हाळ्याच्या सुटीत पुण्याला मामाकडे राहायला जायचो. त्याच्या घराच्या आवारात एका गॅरेजमधे एक तरुण जोडपं राहायचं. गॅरेजला जोडून मोरी नसल्यामुळे त्याला लागून वरून उघडी पण तट्ट्याची एक आंघोळीची जागा बनवलेली होती. त्या गॅरेजशेजारी एक झाड होतं आणि झाडावर चढून गॅरेजच्या छपरावर पोचता यायचं. तिथे राहणारा एक माझ्याच वयाचा मित्र आणि मी दोघंही विकृतीच्या वयाचेच होतो. एकदा आम्ही गॅरेजच्या स्लॅबवर चढून त्या जोडप्यातल्या बाईंची आंघोळ वरून बघितली. एखाद्या मिनिटातच त्या बाईंच्या ते लक्षात आलं आणि त्या ओरडायला लागल्या. आम्ही पळालो नि आपापल्या घरात गेलो. खूप बोंबाबोंब झाली, पण आम्ही कोणाच्या हातात सापडलो नाही. माझी खात्री आहे की, अशी चूक जमलेल्यांपैकी कोणीतरी केलेली असणार, पण कोणीही सांगितली नाही. काही हरकत नाही.

कॉलेजमधे असताना माझ्यापेक्षा दोन-तीन वर्षांनी मोठ्या असलेल्या एका बऱ्यापैकी सुस्वरूप मुलीवर माझं मन जडायला लागलं होतं. वय या गोष्टीबद्दल माझा नीट स्पष्ट विचार नव्हता, हा एक अडसर होता. शिवाय तिला मी आवडत होतो की नाही याबद्दल खात्री नव्हती. मला ठरवता येत नव्हतं की, या मुलीवर माझं प्रेम आहे की नाही. आम्ही नियमित भेटत तर होतो. मग मी सगळ्यांना सांगायला लागलो की आम्ही दोघं एकमेकांना बहीणभाऊ मानतो. आता मला

वाटतं, तो माझा थेट मूर्खपणा होता. तिच्या घरी मी जायचो आणि खूप वेळ थांबूनही राहायचो. मला तिच्या घरचे कधी काही म्हणाले नाहीत. पण माझ्या माघारी मला वागायचं कळत नाही, असं ते बोलत असणार असं मला वाटतं.

मी माझ्या वयाच्या तेवीसाव्या वर्षी इंग्लंडला नोकरीसाठी गेलो. तिथेच एका छोट्या 'आर्किटेक्चरल फर्म'मधे नोकरी करायचो. प्रत्यक्ष माझा बॉस अत्यंत चांगला माणूस होता. आमचं एकमेकांविषयी उत्तम मत होतं आणि तरी माझ्या मनात इंग्लंडविषयी, यांनी आपल्या देशावर 150 वर्षं राज्य केलं याविषयी साठलेला राग होता. खुद्द इंग्लंड देशाला तर मी काही शासन करू शकत नव्हतो. या चमत्कारिक मानसिक अवस्थेत मी एक चुकीची गोष्ट केली. माझ्याच ऑफिसमधल्या छोट्या छोट्या काही गोष्टी, म्हणजे स्टेशनरी आयटेम्स मी चोरले. नंतर मला माझी चूक कळली, वाईट वाटलं. पण त्या गोष्टी पुन्हा गुपचुप ऑफिसमधे ठेवून येण्याची मला कधी संधीच मिळाली नाही.

अजूनही मी एकटाच चुका सांगत होतो. त्यानंतर दोन-तीन लोकांनी आईवडलांशी कसं खोटं बोललो, बारीक खेळणी कशी चोरली वगैरे गोष्टी सांगितल्या. पण खऱ्या गंभीर चुका कोणीच सांगेना. हा अनुभव मला नवीन नव्हता. पूर्वी एका कार्यशाळेमधे इतर कोणी काहीच न बोलल्यामुळे दोन तास, या विषयावरच्या कार्यशाळेला माझ्या भाषणाचं स्वरूप आलं होतं.

मी आणि शोभा यांचं लग्न पत्रमैत्रीतून ठरलं. लग्नापूर्वी वर्षभर पत्रव्यवहार चालू होता. 'लग्न पहावं करून' पुस्तकात जी प्रश्नावली आहे तशी एक एक करून पत्रामधून मी भरत होतो नि शोभाला सांगत होतो. शोभाला मी तिच्या किशोरवयात म्हणजे साधारण 15 वर्षांची असताना एक मिनिट बघितलेलं होतं. पण त्यानंतर आम्ही एकमेकांना बघितलंच नव्हतं. शोभाला माझी आधुनिक विचाराची पद्धत आवडली होती. तिचं कुटुंब खूप पारंपरिक नसलं तरी आधुनिकही नव्हतं. तिच्या कुटुंबाला मी थेट विक्षिप्त वाटत होतो. शोभाचा मोठा भाऊ माझ्या खूप ओळखीचा होता. तोही मला चांगला ओळखत होता. त्याच्या मते शोभाचं नि माझं जुळण्याजोगं नव्हतं.

पण शोभाला मी आवडलो होतो. ती पत्रामधून सारखं सुचवत होती, आपण लग्न करूया. मला दोन अडचणी जाणवत होत्या. एक म्हणजे मला मनातून गोरी बायको हवी होती. याउलट शोभा फोटोतून मला सावळ्या पण सुंदर मुली असतात त्यांपैकी दिसत होती आणि दुसरी गोष्ट, मला तिला प्रत्यक्ष

भेटायला जायला भारतात येणं पैशानी परवडण्याजोगं नव्हतं. शेवटी मी होकार कळवला आणि मग शोभा यू.एस.ए.ला येऊन आम्ही फिलाडेल्फियामधे नोंदणी पद्धतीनी लग्न केलं.

शोभामधे प्रत्यक्षात तेव्हा मला न कळलेले बरेच गुण आहेत, तसेच माझ्यातही आहेत हे शोभाला कळलं. त्यामुळे आमचं पुढे जुळलं. मग यामधे माझ्या चुकीचा प्रश्न कुठे आला? माझ्या मते प्रत्यक्ष भेटून अनेक मुद्द्यांवर चर्चा व्हायला हवी. त्या काळात म्हणजे 45 वर्षांपूर्वी मी निदान एकदा शोभाला प्रत्यक्ष भेटायला भारतात यायला हवं होतं. खर्च या गोष्टीला मी एवढं महत्त्व द्यायला नको होतं. थोडक्यात माझ्या मते माझी लग्न ठरवण्याची पद्धत ही चूक होती. त्यामुळे दोन्ही कुटुंबांना मनस्ताप सोसावा लागला.

फिलाडेल्फियामधे आम्ही राहात असताना बहुतेक आमच्या लग्नानंतर सहा महिन्यांनी मी केलेली वागण्यातली एक चूक सांगतो. आमचे काही अविवाहित मित्र होते. त्यांच्याकडे आमचं दोघांचं जाणं-येणं होतं. बऱ्यापैकी जवळच्या अंतरावर घरं होती आणि तरी फोन करूनच प्रत्यक्ष भेटायला जायची पद्धत होती. एकदा दोघं अविवाहित मित्र फोन न करता आमच्याकडे आले. मी दार उघडून त्यांना म्हणालो, ‘असे कसे तुम्ही न कळवता आलात?’ आणि मी त्यांना घरात न घेताच बाहेरच्या बाहेर कटवलं. प्रत्यक्षात असं असभ्यपणे वागणारा मी तेव्हाही नव्हतो आणि आत्ताही नाही. सोशल कर्ट्सी म्हणजे काय मला व्यवस्थित समजतं, पण तरी मी तेव्हा तसं बोललो.

वयाच्या अठराव्या वर्षापासून बावन्न वर्षं मी कार ड्रायव्हिंग करतोय्. अगदी सुरुवातीपासून माझा कटाक्ष असायचा की रस्त्यावरच्या रहदारीचे सगळे संकेत आणि नियम पाळायचे. आणि तरी फिलाडेल्फियाला असताना मी एकदा ड्रायव्हिंग करत असताना चालू गाडीतून बाहेर बघून रस्त्यावरच्या पाटीवरचा एक पत्ता शोधण्यासाठी अर्धा सेकंद समोरची नजर हटवली. नशिबानी त्याच अर्ध्या सेकंदात समोरची गाडी थांबली नि माझी गाडी मागून जाऊन त्यावर आदळली. माझ्यासारख्या अत्यंत सुरक्षितपणी, जबाबदारीनी गाडी चालवणाऱ्याकडून अशी चूक शोभण्याजोगी नव्हती. भारतात परतल्यानंतरदेखील मी एकदा निर्मनुष्य, सुनसान रस्त्यावर आरशात न बघता उजवीकडे अकस्मात गाडी वळवली. नेमकी मागून एक स्कूटरेट येत होती. अपघात झाला नाही पण चूक माझीच होती.

सर्वसाधारण पुरुषांपेक्षा माझ्यामधे स्त्री-सहवासाचं आकर्षण जास्त आहे.

सुंदर चेहरा आणि शरीरसौष्ठव मला मोहवतं. माझ्या मध्यमवयीन आयुष्यात मी या अतिरिक्त आकर्षणामुळे पुरुषांशी मैत्री आणि स्त्रियांशी मैत्री यामधे वागणुकीत भेदभाव करायचो. यावरून शोभाचे आणि माझे वादही झाले. शोभाच्या गैरहजेरीत काही मैत्रिणींना मी घरी बोलवायचो, पण खुबीनी. माझं कोणाशी लफडं नव्हतं, ते फक्त स्त्री-सहवासाचं आकर्षण होतं. माझ्या मते माझं वागणं चुकीचं होतं. शोभा मोठ्या मनाची असल्यामुळे तिनी याचा बाऊ केला नाही.

मला आता चांगलंच समजतं की, वय वाढलं की माणसाला भारतीय पद्धतीचा संडास चालत नाही, पाश्चात्य पद्धतीचा कमोडच लागतो. आम्ही भारतात, पुण्यात राहायला आलो तेव्हा माझे आजोबा भागवतवाड्यात एकटे राहायचे. आम्ही आमच्या घरातल्या भारतीय संडासावर फोल्डिंग कमोड बसवू शकलो असतो, पण तो विचारच न सुचणं ही माझी वैयक्तिक चूक होती. याचा अर्थ मी आजोबांविषयी पुरेसा विचार केला नाही असाच होतो.

## 2 ) बायको ( स्त्रियांनी नवऱ्याविषयी सांगावं ) आणि मुलं यांच्याशी वागताना केलेल्या चुका

शोभाचं आणि माझं लग्न होऊन साधारण 2 महिने झाले असतील. अर्थात अमेरिकेमधे, कारण तिथेच आमचा संसार सुरू झाला. एका पुस्तकाला शोभानी ब्राऊन पेपरचं कव्हर घातलं. ते बघून मी म्हणालो, 'कोडोलीकरांकडे असं कव्हर घालतात का? भागवतांकडे असं कव्हर कोणी घातलं नसतं.' खरी गोष्ट म्हणजे दोन निराळी कुटुंबं म्हणजे पद्धतींच्यात फरक असणारच. आता मला हे कळतं, पण तेव्हा मी असं बोललो ना!

आमचा मुलगा शोनील अडीच-तीन वर्षांचा असेल. त्याला काही झालं की मारायची सवय लागत होती. माझं पालकत्वामधलं मत पक्कं होतं की, मुलांना मारू नये. अजूनही आहे. पण लागतं कसं ते कळावं म्हणून मी त्याला पायावर जोरात फटका मारला. शोनीलला आता ते आठवतही नाही, पण माझा हात अजून दुखतो.

आमची मुलगी आभा पुण्याच्याच एका दवाखान्यात जन्मली. माझ्या व्यवसायातल्या चढउतारांपैकी त्या काळात स्पष्ट उतार होता. माझ्यावर कामापेक्षा कामं मिळवण्याचा ताण होता. शोभा ज्या हॉस्पिटलमधे होती तिथे मी तिला फावल्या वेळेत करण्यासाठी तिनी करण्याजोगं काहीतरी काम नेऊन दिलं. मुळात आधार देणं, काळजी घेणं याऐवजी मी तिला काम करायला सांगितलं ही एक

चूक आणि वर ते का झालं नाही म्हणून जाब विचारला, रागावलो.

एवढ्या गोष्टी मी सांगितल्यावर दोन-तीन लोकांच्या डोक्यात जरा हालचाल झाली आणि काही काही किरकोळ गोष्टी थोड्या प्रमाणात तरी लोकांनी सांगितल्या. पण खरोखरच बिनमहत्त्वाच्या. खऱ्या महत्त्वाच्या चुका आणि त्याही भिन्नलिंगी व्यक्तीशी वागण्याबद्दल, लग्नाआधी आणि नवराबायकोंनी एकमेकांशी वागण्यात केलेल्या चुका याबद्दल लोक आजच्या कार्यशाळेत पोचतील असं मला वाटेना.

तेवढ्यात एका विवाहित पुरुषानी सांगितलं की लग्नापूर्वी त्यानी बायकोला पगार सांगितला होता, कामाच्या स्वरूपाची कल्पना दिली होती, पण पैशाच्या कौटुंबिक जबाबदाऱ्यांविषयी नीट कल्पना दिली नव्हती ही त्याला चूक वाटते.

मग एका विवाहित मध्यमवयीन स्त्रीनी सांगितलं की तिनी स्वतःचं मन सारखं मारलं. स्वतःला काय त्रास वाटतो हे सासरच्या इतरांनाच काय नवऱ्यालादेखील सांगितलं नाही. प्रत्यक्षात सासरचे लोक वाईट नाहीत पण या बाईचंच स्वतःचं वागायला चुकलं. त्यामुळे अनेक वर्षं उगीच सोसलं असं त्यांना वाटत होतं. या बाई आमच्या खूप ओळखीच्या आहेत. स्वभावानी अगदी सरळ नि गरीब आहेत.

दुसरी विवाहित घटस्फोटित स्त्री साधारण अशीच चूक सांगत होती. मोठ्या भावानी चांगलं नाही वागवलं. भलत्या मुलाच्या गळ्यात बांधलं. भावाच्या आणि हिच्या वयात अंतर फार आणि हिचा स्वभाव गरीब. आत्मविश्वासाचा अभाव हा दुर्गुण नंतर तिनी जीवनसाथच्या मदतीनी बऱ्याच प्रमाणात घालवला. पण आधी सगळ्या चुकाच झाल्या.

इतरांचं बोलणं थांबल्यामुळे मी माझ्या चुका सांगायला सुरुवात केली.

जीवनसाथमधल्या एका मुलीबद्दल असं होतं की आम्ही दोघं एकमेकांना आवडायचो. ती अनेक वेळा माझ्या ऑफिसवर भेटायला यायची. पुढे ती बहुधा ठरवून शोभाच्या नसण्याच्या वेळा साधून यायला लागली. आमची मैत्री नुसती मैत्री नाही, जरा जास्तच आहे असं शोभाला वाटायला लागलं. प्रत्यक्षात शोभाच्या आणि माझ्या नात्यापेक्षा त्या मुलीशी असलेली माझी मैत्री जास्त महत्त्वाची कधीच नव्हती. मला हे समजून मी त्या मुलीचं शोभाच्या गैरहजेरीतलं येणं युक्तीयुक्तीनी थांबवायला पाहिजे होतं. मी वेळेवर तसं न केल्यामुळे एकदा शोभाचं नि माझं सौम्य भांडणच झालं. मला वाटतं त्या प्रकरणात माझं वागायला चुकलं.

मी इंग्लंडमधे असताना दोन मित्रांच्याबरोबर राहत होतो. वरणभात, भाजी, आमटी एवढे स्वयंपाकातले पदार्थ शिकलो होतो. लग्न झाल्या झाल्या पहिल्या एखाद्या महिन्यात मी चक्क खिमा करी बनवलीही होती. पण पुढे शोभानी स्वयंपाकाची जबाबदारी घेतली नि माझी सवयच सुटली. पुढे माझी नोकरी, माझा व्यवसाय, अशी स्वयंपाक न करण्याची अनेक कारणं मला मिळाली. मी त्या सगळ्या निमित्तांचा पुरेपूर वापर करून स्वयंपाक करण्याची संधी येऊनही टाळाटाळ केली. एवढ्या वर्षांच्या खंडानंतर आता मला अजिबात स्वयंपाक येत नाही, अशा अवस्थेत मी आहे. एरवी मी पूर्ण स्त्री-पुरुष समानतेनी वागणारा आहे, पण स्वयंपाक न येणं हे एक मोठं भगदाड त्यात आहे. ही चूक माझ्या हातून झाली आहे, पण लवकरच मी ती सुधारीन.

जमलेल्यांपैकी सगळ्यांना 'मी केलेल्या चुका' हा विषय 2-3 आठवडे आधी एस.एम.एस.नी कळवला होता. तयारी करून यायलाही सांगितलं होतं. प्रत्यक्षात तीन-चार लोक जरा विचार करून आले होते. मी सांगितलेल्या चुका ऐकून आणखी एक-दोघांनी जणू काही स्वयंपाक हाच विषय आजच्या चर्चेला निवडलाय् अशा पद्धतीनी त्यासंबंधी चुका सांगितल्या. एका बाईंनी सांगितलं की, त्यांच्या तरुण मुलाला त्यांनी थोडातरी स्वयंपाक करता यावा असा वाढत्या वयात आग्रह करायला पाहिजे होता. ती चूक केल्यामुळे मुलाच्या बाबतीत त्या काळजीत आहेत.

जमलेल्यांपैकी काही इतरांच्या म्हणजे नवऱ्याच्या, बायकोच्या, मुलांच्या, सासू-सासऱ्यांच्या, जावा-नणंदांच्या चुका सांगायला लागले. त्यांना मला थांबवावं लागलं. आजचा विषय फक्त 'स्वतःच्या चुका' एवढाच आहे याची आठवण करून द्यावी लागली.

मग मी पुन्हा शोभाच्या आणि माझ्या वादाच्या प्रसंगी एकदा कसा चुकीचा वागलो ते सांगितलं. माझं फार पूर्वीपासूनचं मत आहे की, आपला रंग, चेहरा ही गोष्ट आपल्या हातात नाही. पण तो कायम नीटनेटका ठेवणं, तेलकट, मळका दिसू नये म्हणून आठवणीनी चेहरा धुणं, पावडर लावणं, केस सारखे करणं हे आपल्या हातात आहे. विशेषतः नवरा-बायकोंनी एकमेकांसाठी आकर्षक दिसण्याचा प्रयत्न करणं हे आवश्यकच आहे. कशाचीच गरज नाही, अजिबात आरशात कधीही न बघता नैसर्गिकपणे चेहरा कायम सुंदरच असतो, असे जन्मजात सुंदर लोक लाखात एक या प्रमाणातच असतात. आपण त्यांपैकी नाही

हे कळल्यावर माणसानी स्वतःच्या चेहऱ्याकडे लक्ष दिलंच पाहिजे. खरं म्हणजे स्वतःला बरं वाटावं म्हणूनच त्याची गरज आहे.

पण शोभावर लहानपणापासून असे काहीतरी संस्कार झाले होते की, आपण आहोत तसे आहोत. चांगलं दिसण्यासाठी काहीही प्रयत्न करायचा नाही. मी तिला म्हणायचो की स्वतःसाठी नाही तर नवऱ्यासाठी हे करायला पाहिजे. हे मी तिला अनेक प्रकारे सांगून पटवू शकलो नाही. जेव्हा शोभा चेहरा नीट ठेवायची नाही तेव्हा मी सुरुवातीला शब्दात, खुणेनी सांगायचो. त्याचा उपयोग होईना म्हणून अशा वेळी चष्मा काढून ठेवायचो. माझ्या चष्म्याचा नंबर खूप असल्यामुळे चष्मा काढला की, मला तिचा चेहराच नीट दिसायचा नाही. मनाला त्रास कमी व्हायचा कारण डोळ्यांना त्रास व्हायचा नाही. या सगळ्याला मी शेवटी कंटाळलो. एका संध्याकाळी मी शोभाला या माझ्या त्रासाबद्दलची चिठ्ठी ठेवून एका रात्रीपुरता घरातून निघून एका मित्राकडे राहायला गेलो. चिठ्ठीत लिहिलं, 'मला शोधण्याचा प्रयत्न करू नको, मी उद्या सकाळी घरी परत येईन.' शोभाला हा झटका मिळावा असाच माझा उद्देश होता. बिचारा शोनील म्हणजे आमचा मुलगा रात्री मला दोन ठिकाणी शोधायचा प्रयत्न करून आला. मी दुसऱ्या दिवशी सकाळी घरी आलो. एकूण मला वाटतं, मी इतकी तीव्र उपाययोजना नसती केली तर बरं झालं असतं.

एकेका माणसाला एखाद्या गोष्टीची खूप शिसारी असू शकते. कोणाला वासाची, कोणाला आवाजाची, कुणाला चवीची. या सगळ्याचं टोक म्हणजे ओ.सी.डी. (ऑब्सेसिव्ह कंपल्सरी डिसऑर्डर) अशा अवस्थेला थेट मानसिक आजार समजून मानसोपचार तज्ज्ञाकडेच न्यावं लागतं. मला एका विशिष्ट प्रकारच्या वागणुकीचा खूप त्रास होतो. तो म्हणजे माझ्यादेखत कोणी स्वतःच्या नाकात बोटं घालत असेल तर. संपूर्ण शरीराबरोबर नाकाच्या स्वच्छतेची गरज मला समजते. पण ती गोष्ट मोरीत बंद दरवाज्याच्या आड करण्याची आहे, असं मला वाटतं. इतर कोणाच्याही देखत नाही. मानसोपचार तज्ज्ञाकडे हा प्रश्न घेऊन जाण्याइतका मला याचा त्रास होत नाही, पण असं वागणाऱ्या व्यक्तीकडे बघणं मी टाळतो आणि माझा प्रश्न सोडवतो. एकदा माझा मोठा नातू साधारण 4 वर्षांचा असताना नाकात बोटं घालून माझ्या शर्टला पुसत होता. मी त्याच्या अंगावर भयंकर जोरानी ओरडलो. इतक्या जोरानी की, या गोष्टीला तीन वर्षं होऊन गेली तरी तो अजून खूप जोरानी ओरडल्यामुळे मी त्याला आवडत नाही

असं म्हणतो. माझ्या मते मी त्याला खूप चांगल्या पद्धतीनी हे सांगू शकलो असतो. शेवटी तो म्हणजे एक 4 वर्षांचं मूलच होता ना!

### 3 ) मी आर्थिक व्यवहारासंबंधी केलेल्या चुका

मी आणि शोभा जेव्हा यू.एस.ए.मधे व्यवस्थित नोकऱ्या करत होतो तेव्हा पुण्यात जमिनी स्वस्त होत्या. मी आणि माझ्या वडलांनी याविषयी चर्चा केली आणि ठरवलं की पुण्यात आपल्या मालकीचा वाडा आहे, मुंबईत दादर भागात फ्लॅट आहे त्यामुळे आणखी कुठे जागेत पैसे गुंतवण्याची गरजच नाही. अमेरिकेतल्या माझ्याबरोबरच्या अनेकांनी भारतात जमिनी घेतल्या. पण माझ्या वडलांना आणि मला आर्थिक दूरदृष्टी नव्हती. आम्ही जमीन घ्यायची नाही असं ठरवलं, एवढंच नाही तर, दोन प्लॉट्स होते ते विकून टाकले. मला वाटतं, हा फार चुकीचा निर्णय होता. मी आणि शोभा यू.एस.ए.मधे फिलाडेल्फियामधे आणखी एक वर्षं थांबून इकडे पैसे पाठवून जमिनी घेऊन ठेवल्या असत्या तर माझ्या त्यानंतरच्या इथल्या धंद्यात खूप फरक पडला असता.

परदेशात मी नोकरी करत असताना दोन गोष्टी डोक्यात बसल्या होत्या. एक म्हणजे ग्रुप प्रॅक्टिस आणि दुसरी म्हणजे कामं स्वतः करण्याऐवजी करवून घेण्याचं महत्त्व. या दोन्ही गोष्टींच्या थियरीज एकदम पक्क्या होत्या त्या माझ्या मॅनेजमेंटच्या शिक्षणामुळे. पण प्रॅक्टिकल इथे सुरू व्हायचं होतं. मी आल्यावर एक वर्षं मुंबई आणि पुणे दोन्ही ठिकाणी व्यवसाय चालू केला. कामं थोडीच होती, पण मी मुंबईत एक आणि पुण्यात एक अशी दोन माणसं कामाला ठेवली. थोडक्यात कामं मिळवण्याचा विभाग माझ्याकडे आणि ती प्रत्यक्ष करायची या दोन माणसांनी. मी रेल्वेचा पास काढून मुंबई-पुणे प्रवास करायचो. सबंध वर्षात मिळकतीपेक्षा खर्च जास्त झाला. असा कुठचाही व्यवहार म्हणजे चूकच. मग मी मुंबईतली कामं बंद करून पुण्यात कुटुंबासकट स्थायिक झालो. ग्रुप प्रॅक्टिसच्या कल्पनेमुळे पुण्यात ज्युनिअर पार्टनरच्या शोधात राहिलो. काही वर्षांत पहिला गेल्यामुळे दुसरा, तो गेल्यावर तिसरा असे दहा पार्टनर्स झाले. चांगली लोकं गेली आणि चुकीचा भागीदार टिकला. अशा ज्युनिअर पार्टनर्सशी वागण्याची खुबी माझ्याकडे नव्हती. नुसतं उत्तम तांत्रिक ज्ञान असून धंद्यात चालत नाही. घर चालण्यापुरते पैसे मिळाले, पण नुकसानही खूप झालं. मी माणूस तयार करायचा आणि मग त्यानी माझी नोकरी सोडून स्वतःचा व्यवसाय चालू करायचा

यात माझं फार नुकसान झालं. थोडक्यात मी धंद्यात चुकाच चुका केल्या.

मी माझ्या व्यवसायातल्या अडचणींना तोंड देत अनेक वर्षं झगडलो. खूप वेळ त्यात जायचा. आम्ही पुण्यात राहायचो आणि माझे आईवडल मुंबईला राहायचे. या सगळ्या काळात वडील नोकरीतून निवृत्त झालेले होते. काही काळानी त्यांनी म्हातारपणी दुसरी पार्टटाईम नोकरी केली. केवळ त्यामुळे त्यांचा चरितार्थ भागला. मधल्या काही काळात आईवडील चरितार्थाच्या चिंतेत होते हे त्यांनी मला कधी सांगितलं नाही, पण मुद्द्याची गोष्ट अशी की, आईवडिलांचा चरितार्थ कसा चाललाय् याची मी कधी चौकशीदेखील केली नाही. ज्यांनी मला अनेक प्रकारे निरनिराळ्या काळात मदत केली त्यांच्याबद्दल माझ्या मनात नेहमी कृतज्ञता असते. त्यामुळे ही गोष्ट मला मोठी चूक वाटते.

पाश्चात्य कल्पनांच्या पगड्यामुळे मी आणि शोभानी पुण्याच्या पश्चिम भागात एक प्लॉट घेऊन त्यावर बंगला बांधला. वीकेंडला तिकडे जाऊन राहायचं म्हणून. एकट्याला प्लॉट घेणं पैशानी परवडण्याजोगं नव्हतं म्हणून भागीत प्लॉट आणि भागीत जॉईंट ओनरशिपचा बंगला बांधला. आधीच्या व्यवसायामधल्या भागीदारीचा अनुभव असूनदेखील भागीदारीत जागा बांधण्याची मोठी चूक हातून झाली. खूप त्रास झाला. बांधताना आणि नंतर बंगला विकतानाही.

जीवनसाथच्या पहिल्या रविवारच्या कार्यक्रमांना आमची मुलगी बहुतेक वेळा हजर असते. 'जनमानस प्रतिष्ठान' या ट्रस्टची ती ट्रस्टीदेखील झाली आहे. ती 'मी केलेल्या चुका' या कार्यशाळेला हजर होती. ती म्हणाली, 'पैशाच्या व्यवहाराच्या बाबतीत मी पहिल्यापासून कच्चीच आहे नि लग्न होऊन बारा वर्षं झाली तरी मला गुंतवणुकी, पैशाचे व्यवहार याचं संकटच वाटतं. ही गोष्ट चूक आहे असं मला वाटतं.'

मी काही वर्षं थेट बिल्डरचा व्यवसाय करत होतो. केवळ अनुभव म्हणून. माझ्याबरोबर भागीदारही होते. एका स्कीममधे एक कटकट्या माणूस होता. सगळेजण त्या गिऱ्हाइकाला वैतागलेले असायचे. कस्टमर म्हटल्यावर काहीतरी तक्रारी मधूनमधून असणारच, पण यांचं प्रकरण जरा अतीच होतं. एकदा ते जेव्हा एक तक्रार घेऊन माझ्याकडे आले तेव्हा इतके दिवस त्यांना शांत करणारा मी पण वैतागलो. त्यांना म्हणालो, 'इतक्या तुमच्या तक्रारी असतील तर तुम्ही आपला सरळ आमच्यावर खटला भरा.' त्यांनी खरोखरच खटला भरला आणि आम्हाला त्यांना कोर्ट ऑर्डरनी भरपाई द्यावी लागली. माझे ते शब्द ही माझी

मोठी चूकच झाली.

धंद्याच्या नंतरच्या एका टप्प्यात मी पैशाच्या अडचणीत सापडलो. मला गल्फमधे जाणं शक्य होतं. पण मला तिकडे जाऊन नोकरी करून एकटं राहणं हे फार मोठं संकट वाटत होतं. गल्फमधे जाणं भाग पडण्यापूर्वीची शेवटची संधी म्हणून मी लातूर-किल्लारी भूकंपग्रस्त भागातलं एक मोठं काम मिळवण्याचा प्रयत्न केला. एरवी मी करारावर सह्या झाल्याशिवाय आणि आगाऊ रक्कम मिळाल्याशिवाय कधीच काम करत नाही, पण या ठिकाणी परदेशी जाणं टाळण्याच्या मोहात सापडून मी हे मोठं काम तर चालू केलं, पैसे गुंतवत गेलो आणि शेवटी आधीच्या पैशाच्या ओझ्यामधे भर घालण्याची चूक केली. मीच माझ्या चुकीमुळे फसला गेलो.

जनमानस प्रतिष्ठान या ट्रस्टचं मुख्य सगळं काम मीच बघायचो. या ट्रस्टसाठी काही देणग्या मी मिळवल्या होत्या. त्यामुळे काही पैसे हाताशी होते. या ट्रस्टच्या कामासाठी एक पगारी माणूस ठेवावा अशी कल्पना मी मांडली. एक माणूस नजरेसमोर होता. माझ्याखेरीज शोभासकट सगळ्या ट्रस्टींचा त्या माणसाची नेमणूक करायला विरोध होता. तरी माझ्या आग्रहासाठी त्याची नेमणूक केली. त्यानी ट्रस्टला फसवलं. काही काम प्रत्यक्षात केलं नाही, नुसत्या थापा मारल्या आणि त्याला दिलेला तीन महिन्यांचा पगार वाया गेला. मला कोणी काही म्हटलं नाही कारण मीच पैसे मिळवले होते आणि घालवले होते. दुसरं म्हणजे माझ्या प्रामाणिकपणावर आणि चांगल्या हेतूबद्दल सगळ्यांना खात्री होती आणि तरी जी पारख इतरांना झाली ती मला झाली नाही ही चूकच होती.

आमचा भागवत वाडा शनिवार पेठेत, मेहुणपुऱ्यात आणि दीडशे वर्षं जुना होता. जेव्हा केव्हा वाडा विकायचा ठरेल तेव्हा फक्त जमिनीला किंमत असते, त्याच्यावरच्या बांधकामाची किंमत शून्य असते हे मला माहिती होतं, तरी कुटुंबाच्या सोयीसाठी मी त्यावर खर्च केला. माझ्या मनात वाडा विकायचा नव्हता. पण शोभा, शोनील, आभा यांच्या दृष्टीनी विकायचा होता. शेवटी वाडा विकला. त्याआधी वर्षभर मी त्याच्यावर सहा-सात लाख रुपये खर्च केला होता. ते सगळे पैसे वाया गेले. निर्णय घेण्यात जेव्हा अडचण वाटेल तेव्हा वापरण्याचं क्रिटिकल ॲनालिसिस तंत्र मी चांगलं जाणतो, ते मी इतरांना शिकवतोदेखील, पण स्वतःच्या मालकीच्या वाड्याच्या बाबतीत माझ्या हातून चूकच झाली.

## 4 ) दुसऱ्याचा आत्मसन्मान जपण्याच्या बाबतीत मी केलेल्या चुका

खूप पूर्वीची गोष्ट आहे. चष्म्याचा नंबर कमी व्हावा म्हणून मी एक औषध डोळ्यात घालायचो. बरंच झोंबायचं. माझा सख्खा मामा मला एकदा म्हणाला की, त्यालाही चष्मा आहे, त्यामुळे एकदा त्याला ते औषध डोळ्यात घालून बघायचं आहे. मी मूर्खासारखं त्याला उत्तर दिलं, 'हे औषध फार महाग आहे!'

मी जाहीर कर्मकांडविरोधी होतो, हे शोभाला लग्नाआधीपासून माहीत होतं. पण जेव्हा आम्ही भारतात परत आलो तेव्हा शोभाच्या माहेरी असे फार प्रसंग घडायला लागले. शोभानी अशा सगळ्या कर्मकांडांना विरोध करावा म्हणून मी शोभाच्या फार मागे लागलो. आता मला वाटतं, माझं वागणं चुकीचं होतं. तिच्या वेगानी तिनी लोकांशी वागण्यात बदल करणं हेच जास्त चांगलं झालं असतं.

प्रत्यक्षात माझा आरडाओरडा करण्यावर अजिबात विश्वास नाही. पण एका साइटवरचे कॉन्ट्रॅक्टर बराच आरडाओरडा करायला लागले. म्हणून मी पण त्यांच्यावर संतापून खूप जोरात ओरडलो. बसलेले सगळेजण एकदम चपापले कारण माझ्या पदाला, प्रतिमेला आणि भूमिकेला माझं ओरडणं शोभणारं नव्हतं.

जीवनसाथमधली एक महत्त्वाची व्यक्ती, माझी आणि शोभाची जवळची मैत्रीण, आमच्याकडे अनेक वेळेला यायची. आता ती इथे नसते त्यामुळे आमची गाठ पडत नाही. ती माझ्याशी जीवनसाथविषयी बोलायला आली असताना मला कुठच्यातरी त्यावेळी घेत असलेल्या औषधाच्या गोळीमुळे झोप यायला लागली. मी खरं तर तिला हे स्पष्ट करायला हवं होतं. त्याऐवजी मी सरळ झोपून गेलो. ती काही वेळ थांबून बिचारी कंटाळून निघून गेली. त्याच्यानंतर आता साधारण चार-पाच वर्षांत आमची गाठ नाही, फोन नाही. तिची माफी मागायची माझ्याकडून राहूनच गेलीय्. कुठच्यातरी निमित्तानी ती पुण्यात येईल तेव्हाच माझी ही इच्छा पूर्ण होईल.

खरं म्हणजे शोभाची नि माझी कामावर ठेवलेल्या माणसांच्या जबाबदारीची व्यवस्थित विभागणी आहे. पण एकदा शोभा नव्हती. शोभानी त्या मुलीला सांगायला मला फोनवर निरोप सांगितला. दुकानामधून एक वस्तू आणून हवी होती. त्या मुलीनी नकार दिला आणि म्हणाली की, हे तिचं काम नाही. खरं म्हणजे कामाच्या विभागणीच्या शिस्तीप्रमाणे मी शोभाला पुन्हा फोन करून निर्णय विचारायला हवा होता. त्यावेळी मी त्या मुलीला म्हणालो, 'हे तुझं वागणं

बरोबर नाही. उद्यापासून तू येऊ नकोस.' मी व्यवस्थापनशास्त्रातला अनुभवी माणूस, हे बोलणं मला शोभलंच नाही.

आजच्या वेळेच्या मर्यादेमुळे आता इथे आपण थांबूया. मी याखेरीजही बऱ्याच चुका आयुष्यात केलेल्या आहेत. पण त्या पुन्हा केव्हातरी सांगीन. या कार्यशाळेमधून तुम्ही काय आणि किती शिकायचं हे अर्थात तुम्ही ठरवायचंय्. या प्रकारे कुटुंबातल्या लोकांशी बोलून बघा. पथ्य एकच. फक्त स्वतःच्या चुका सांगायच्या. तात्पुरता स्वतःच्या मनाला त्रास होईल, पण कौटुंबिक जवळीक वाढेल. चुका सांगून झाल्या की स्वतःला बरं वाटतं. जोडीदारालाही बरं वाटतं.

मुख्य भीती अशी असते की यामुळे दुसऱ्यांचं आपल्याविषयी वाईट मत होईल की काय? मी तुम्हाला खात्रीनी सांगतो की, वाईट मत तर होत नाहीच. पण आपल्याविषयी आदर वाढतो.

खरं म्हणजे असं आहे. दुसऱ्यानी आपली चूक दाखवली आणि मग ती आपण मान्य केली तर जास्त वाईट वाटतं. आपण स्वतः ती आपण होऊन मान्य केली तर स्वतःला कमी वाईट वाटतं. ही गोष्ट माहिती असून लोक असं करतात. कारण त्यांना वाटतं आपली चूक कोणाच्या लक्षात येणार नाही. प्रत्यक्षात क्वचितच असं होतं. बहुतेक वेळा आपलं वागणं, त्याचं कारण लपत नाही, दुसरा त्याविषयी बोलत नाही एवढंच.

हे तुम्हाला पटलं आणि तुम्ही म्हणालात तर अशी या विषयाची कार्यशाळा पुन्हा घेऊ. मुद्दाम नवराबायको जोडीनी हजर व्हा. त्याचा खूप फायदा होईल.

या विषयाचा पुढचा विषय विवाहितांना जास्त उपयोगाचा आहे, तोही आपण पुन्हा तुम्ही म्हणाल तेव्हा ठेवू. तो म्हणजे 'मी जोडीदाराकडून काय शिकलो?' अविवाहितांनी हाच विषय 'मी एका विशिष्ट व्यक्तीकडून काय शिकलो?' असा मानावा म्हणजे ती विचार करण्याची पद्धत त्यांना विवाहानंतर उपयोगी पडेल.

सगळ्या लोकांना आवाहन आहे की, स्वतः केलेल्या चुका कळवण्याची, जाहीरपणी सांगण्याची त्यांना बुद्धी झाली तर त्यांनी नाव, पत्ता, फोननंबरसकट जरूर जरूर कळवावं. आम्ही तो मजकूर पुढच्या आवृत्तीत जरूर छापू.



# 6

# मी जोडीदाराकडून काय शिकलो/ शिकले किंवा विशिष्ट व्यक्तीकडून काय शिकलो/शिकले

जीवनसाथमधे ज्या मिश्रगटचर्चा होतात, त्यांचा सगळ्यांना फायदा होतो. विवाहितांचे विचार अविवाहित लोकांसाठी खूप उपयोगी ठरतात. जे नवरा-बायको जोडीनी हजर असतात त्यांना एकमेकांच्या मनात स्वतःविषयी काय भावना आहेत ते नव्यानी किंवा अधिक स्पष्ट कळतं. सांगणाऱ्याला व्यक्त करण्यामुळे बरं वाटतं.

लग्न कशासाठी या विषयाचा आपण जेव्हा अभ्यास करतो तेव्हा लग्न करणं हा व्यक्तिमत्त्व विकासाचा एक मार्ग आहे हे स्पष्ट होतं. त्या विकासाच्या प्रक्रियेत ज्या व्यक्तीचा सर्वांत जास्त सहवास असतो ती व्यक्ती म्हणजे लग्न केलेला जोडीदार. त्याच्याकडून आपण जर काही शिकलो नाही तर वैवाहिक जीवन व्यर्थच ठरतं.

जोडीदार निराळ्या कुटुंबातला असतो. निराळी पार्श्वभूमी असते. निराळे संस्कार, निराळी वागण्याची, निर्णय घेण्याची पद्धत असते. दोन कुटुंबांच्या संस्कारांचा मध्य काढून विवाहित जोडप्याला नवीन संस्कृती निर्माण करायची असते. हा तर सगळा एकमेकांकडून शिकण्याचाच प्रवास असतो. दोघं एकमेकांकडून काही शिकत नसले तर घोटाळाच समजायचा. आणखी एक शक्यता असते. एकमेकांकडून शिकणं चालू असतं पण ते शब्दात मांडण्याची अडचण असते. त्यासाठी या कार्यशाळेचा उपयोग होतो.

अविवाहितांची गोष्ट थोडीशी निराळी असते. विवाहाचा जोडीदार न

सापडल्यामुळे ते एकापेक्षा अधिक व्यक्तींकडून शिकत असतात. आजच्या कार्यशाळेत अविवाहितांकडून अशी अपेक्षा आहे की त्यांनी एखादी व्यक्ती निवडावी आणि त्या व्यक्तीकडून काय शिकलो ते सांगावं.

तुमच्यापैकी कोणी विधवा, विधुर, घटस्फोटित थोडक्यात वैवाहिक जीवनाचा अनुभव असूनही सध्या एकट्यानी आयुष्य जगणं चालू असेल तर त्यानी कुठचीही एक व्यक्ती ठरवून त्या विशिष्ट व्यक्तीकडून आपण काय शिकलो ते सांगावं.

अशा विषयांवरच्या कार्यशाळा कठीण असतात. विषय मांडणं, मोकळेपणानी गटाशी बोलणं ही गोष्ट सोपी नसते. अशा वेळेला बहुतेक वेळा मलाच सुरुवात करावी लागते. आजही मी शोभाकडून काय शिकलो ते मी आधी सविस्तर सांगतो. मी या विषयाचे तीन भाग केलेले आहेत. 1) नातेसंबंधांबद्दल, 2) पैशांबद्दल आणि 3) आत्मसन्मानाबद्दल.



## 1) नातेसंबंधांबद्दल मी शोभाकडून काय शिकलो

1) घरामधे कोणीही वरिष्ठ कोणीही कनिष्ठ नसतं. पुरुषप्रधान संस्कारांमुळे मी प्रत्यक्षपणी नाही पण अप्रत्यक्षपणी स्वतः श्रेष्ठ आणि वरिष्ठ असल्यासारखा कधीकधी वागायचो. शोभापेक्षा मी तीन वर्षांनी मोठा असलो तरी लग्नाच्या वयातल्या परिपक्वतेमधे तीन वर्षांचं अंतर म्हणजे काहीच नाही.

2) फेमिनिस्ट मॅनेजमेंट - हाय ई. क्यू. ('इमोशनल कोशंट'.) थोडक्यात स्वतःव्यतिरिक्त दुसऱ्याचा विचार करण्याची क्षमता. याबाबतीत शोभाचं माहेर म्हणजे कोडोलीकर कुटुंब माझ्या म्हणजे भागवत कुटुंबीयांपेक्षा पहिल्यापासून सरसच होतं. अर्थात शोभाचा भावनांक माझ्या भावनांकापेक्षा जास्त होता. त्या भावनांचा वापर करून आपल्या नोकरी-व्यवसायातदेखील इतरांशी वागणं याला 'फेमिनिस्ट मॅनेजमेंट' म्हणतात. शोभा जरी नोकरीत असली तरी तिच्यावर स्वतःचा व्यवसाय असल्यासारखी जबाबदारी कायम होती. अजूनही आहे. तिच्या कामातले रोजचे प्रश्न, अनुभव आणि माझ्या कामातले प्रश्न-उपाय यांच्याविषयी आमचं नियमित बोलणं व्हायचं. मध्य काढायचंच शिक्षण चालू असल्यामुळे मी तिची वागण्याची पद्धत शिकत होतो. कामावरच्या लोकांशी वैयक्तिक, कौटुंबिक नातेसंबंध जोडायलाच पाहिजेत अशी काही सक्ती नसते. तरीही मी तसे नातेसंबंध जोडले. त्याचे अगदी थोडे तोटे असतात. पण बाकी सगळे फायदेच फायदे.

3) पालक शिक्षण - मुलांसाठी वेळ काढावाच लागतो. साधारण 35 वर्षांपूर्वी मी आणि शोभानी दोघांनीही पालक –शिक्षणाचा कोर्स केला होता. त्यामधे आम्ही ही गोष्ट शिकलो होतो की मुलांना नुसता क्वालिटी टाइम देऊ असं म्हणून चालत नाही. क्वांटिटी ही द्यावीच लागते. शोभा या गोष्टी अमलात आणत होती, पण मी तसं करत नव्हतो. माझ्याकडे माझ्या चुकीच्या वागणुकीसाठी देण्याची अनेक कारणं तयार होती. ती सगळी कारणं खरी होती आणि तरी त्यांच्यातून थोडा वेळ काढून मी मुलांना देऊ शकलो असतो हेही खरं होतं. मुलांसाठी मी सुरुवातीला अगदी थोडा वेळ काढला. मग थोड्या युक्त्या शिकलो आणि थोडा थोडा वेळ वाढवत नेला. वेळेचा दर्जा हा कसबाचा प्रश्न आहे. ते कसबही वाढवत नेलं. थोडक्यात ते

शोभाकडून शिकत गेलो.

4) जसं मुलांचं तसंच जोडीदाराचं. बायकोसाठी वेळ द्यावाच लागतो आणि त्या वेळेचा दर्जाही सुधारावा लागतो. शोभाकडून मी हे शिकलो. सध्याच्या पिढीचा मोबाइल फोनवर चालू असलेला 'मो-संसार' किंवा एकमेकांशी ई-मेलवर संपर्क साधून केलेला 'ई-संसार' काही कामाचा नाही.

5) शोभाची एक खासियत म्हणजे तिच्यावर व्यक्तीच्या बाह्यरूपाचा चांगला-वाईट काहीच परिणाम होत नाही. तिचं सगळं लक्ष समोरच्या व्यक्तीच्या अंतर्गुणांकडे असतं. माझं तसं नसायचं. अजूनही तसं वागणं मला कठीण जातं. पण शोभामुळे मी बाह्यरूप आणि अंतर्गुण दोन्हींचा विचार करायला लागलो.

6) शोभाचं तिच्या सासूबाईंशी म्हणजे माझ्या आईशी वागणं आणि शोनीलच्या बायकोशी म्हणजे सुनेशी वागणं - गेल्या 18 वर्षांच्या अभ्यासानी आता मी नक्की सांगू शकतो की, सासूशी किंवा सुनेशी घाईघाईनी मैत्री करणं चुकीचं आहे. हळूहळू जसं नातं घट्ट होत जाईल, स्वभावातले बारकावे कळतील तशी त्या वेगानी मैत्री होऊ द्यावी. शोभाला मात्र ते उपजत बुद्धीनीच कळत होतं. आता माझी आई हयात नाही. पण जरूर तेवढं अंतर ठेवून सगळी कर्तव्यं पार पाडण्याची युक्ती शोभाकडे असल्यामुळे त्या दोघींचं चांगलं जुळायचं. सून ॲनास्तेसियाचं तसंच. तिचं आणि शोभाचं मस्त जमलंय. हे शिकण्याजोगं होतं. त्यामुळे मी ती गोष्ट आत्मसात केली.

## 2) पैशांच्या विचारसरणीबद्दल मी शोभाकडून काय शिकलो

1) पैसे आज असतात, उद्या नसतात असं शोभाचे वडील म्हणायचे. शोभामधेही ती वडलांची शिकवण पूर्णपणे उतरली. माझ्यामधेही साधारण वृत्ती अशीच होती. पण माझ्या व्यवसायातल्या चढउतारांमुळे काळजी करण्याजोगे बरेच प्रसंग आले. मी अस्वस्थ व्हायचो पण शोभा शांतपणी त्यातून मार्ग काढायची. आता मला ते बऱ्याच प्रमाणात जमायला लागलंय.

2) ज्युनिअर पार्टनर्स, स्टाफ यांच्याशी मी कसा वागायचो हे मला व्यवस्थित आठवतं. शोभादेखील एका मोठ्या संस्थेची संचालक आहे. आम्हा दोघांनाही आपापल्या कामात सतत पैशांबद्दलचे निर्णय घ्यायला लागायचे. माझ्या धंद्यात पैशांवर नियंत्रण कठीण होतं. मला ते कधीच मनाजोगं जमलं नाही.

शोभाला मात्र तिच्या कामात ते नियंत्रण साधलं. गरवारे बालभवनमधे पैशांवरून वादाचा प्रसंगच कधी आला नाही. मी शोभाकडून या बाबतीत जे शिकलो त्याचं वर्णन म्हणजे – विश्वासानी पण सगळ्या पैशांच्या व्यवहारांकडे सतत लक्ष ठेवावं लागतं.

## 3) आत्मसन्मानाबद्दल मी शोभाकडून काय शिकलो

1) प्रत्येक वेळेला आपलं म्हणणं सौम्य, सभ्य शब्दांतच मांडायला हवं. माझ्याकडून याबाबतीत बऱ्याच चुका झालेल्या आहेत. शोभाकडून अशी गोष्ट जवळजवळ नाही असं म्हणण्याइतकी क्वचित होते.
2) नवराबायको हेतुपूर्वक एकमेकांचा अपमान करणं शक्य नाही. बोलण्यात चूक, गैरसमजूत होईल हे शक्य आहे. जीवनसाथमधे मी ही गोष्ट अनेकांना अनेक वेळा सांगतो, पण शोभाला ती गोष्ट उपजतच माहिती होती.
3) नवरा-बायकोचे स्वभाव निराळेच असतात. त्याच्या तपशीलांच्यातला मध्य काढावा लागतो. ही गोष्ट पुरुष असल्यामुळे मला नीट जमत नव्हती. शोभाला ती उपजत बुद्धी होती.

**शोभानी याचप्रकारे माझ्याबद्दल सांगायचं होतं. ती काय बोलली ते मुद्दे तिच्या शब्दात देतो–**

मी अनिलकडून एवढ्या गोष्टी शिकले.

1) सतत डायरी जवळ बाळगणं. सगळ्या जबाबदाऱ्या लक्षात ठेवण्यासाठी दुसरा पर्यायच नाही. अनिलला मी भेटले तेव्हापासून मी हे बघतेय.
2) व्यवस्थापनाची मूलतत्त्वं तो मला नेहमी सांगतो. बालभवनच्या कामात मला त्याचा खूप उपयोग होतो. अनिल प्रचंड व्यवस्थित आहे. ते शिक्षण माझं अजूनही चालू आहे.
3) कामात झोकून देण्याची वृत्ती - अनिल प्रचंड मेहनती आहे. या पुस्तकाच्या उदाहरणात मी ते बघतेय. तो पहाटे चारचा गरज लावून उठून कामाला बसतो. रात्री दहा पर्यंत कामात असतो. त्याची शिस्त, जिद्द, नियोजन अफाट आहे.
4) संवादाच्या बाबतीत अनिल एकदम तत्पर आहे. तो त्याच्या मनातली गोष्ट सांगतो म्हणजे सांगतोच. स्पष्टतेसाठी तो घरातल्या घरात मला पत्रही लिहितो. मला ही गोष्ट नवीन होती.

5) कोणाशीही प्रत्यक्षात, फोनवर बोलायच्या आधी अनिल कागदावर मुद्दे योग्य क्रमानी लिहून काढतो. आता ती सवय मलाही लागली आहे.

6) मुलं, नातवंडं यांच्याबाबतीत तो अतिशय उत्सुक असतो. तत्पर असतो. त्यांच्यासाठी करण्यात तो कधी कंटाळा करत नाही. मीच त्या बाबतीत थोडी कमी पडते.

7) अनिलच्या गरजा कमीतकमी असतात. त्याचे कपडे अगदी मोजकेच असतात. पहिला कपडा फाटल्याशिवाय तो नवीन शिवतच नाही. विजेचा वापर, पाण्याचा वापर तो विचार करून करतो. साबण, शांपू अशा वस्तू कमीत कमी वापरतो. त्याला सगळे खाद्यपदार्थ आवडतात. नाश्त्याला, जेवणाला काहीही चालतं. मला या गोष्टी अजून जमलेल्या नाहीत, पण काही प्रमाणात मी अनिलकडून शिकले.

कार्यशाळेमधल्या जोडप्यांनी जे मुद्दे मांडले ते त्यांच्याच शब्दात इथे देतो.

## स्मिता पाटील आणि अनिल वळसंगकर (जोडपं)

स्मिता अनिलबद्दल म्हणाली–

- बोलताना नकळतपणे काही जातिवाचक शब्द तोंडातून बाहेर पडू नयेत याची खबरदारी घ्यायला अनिलकडून शिकले. (मनात जातिभेद नसतानाही)
- कठीण परिस्थितीतही शांत राहून त्यातून बाहेर पडणं हे त्याच्याकडून शिकले.
- नातेसंबंध टिकवण्यासाठी तो अत्यंत कमी प्रयत्न करतो आणि खूप गैरसमज होतात. त्यामुळे कसं वागायचं नाही हे शिकले.
- सगळ्यांना 'हो'च म्हणणं या माझ्या भिडस्तपणामुळे स्वतःला, घराला खूप त्रास होतो. त्यामुळे योग्य ठिकाणी न दुखावता ठामपणी नाही म्हणणं हे शिकले.

अनिल स्मिताबद्दल म्हणाला–

- सहनशीलता - माझ्याबद्दलची, मित्रांबद्दलची, नातेवाइकांबद्दलची
- क्रिएटिव्हिटी - भोवतालची परिस्थिती अनुकूल-प्रतिकूल कशीही असली तरी नवनवीन गोष्टी करत राहणं.
- ॲडजस्टमेंट - माणसांशी / परिस्थितीशी जुळवून घेणं.

## तुषार आणि श्रद्धा

तुषार बोरोटीकर आणि श्रद्धा कानेटकर हे जीवनसाथमधे नियमितपणे येणारं आणखी एक जोडपं आहे. त्यातली श्रद्धा तुषारबद्दल अशा गोष्टी सांगते–

● सर्व गोष्टी जिथल्या तिथे ठेवण्याची शिस्त ● पैसे वापरण्याची पद्धत ● क्षमा करण्याची वृत्ती ● व्यायाम ● घरच्यांना धरून पण 'कंपल्शन' मधून बाहेर पडून आयुष्य जगणं. ● व्यवहार्य दृष्टी (प्रॅक्टिकल आस्पेक्टस्) शिकले.

तुषार श्रद्धाकडून काय शिकला ते त्यानी सांगितलं.

● स्त्री असून स्त्री व पुरुष दोघांप्रमाणे विचार करू शकणं. ● कप्प्यांनी विचार करू शकणं. ● प्रेमळपणा ● समजून घेण्याची क्षमता ● बेधडकपणी, जबाबदाऱ्या घेऊन स्वतःहून पार पाडू शकणं. ● 'चेतना, प्रेरणा, उत्साह', हे स्त्रीचे गुणधर्म शिकण्यास मिळाले. ● शक्यतो विस्मृती न होणे ● मानसिक ताकद ● सकारात्मकता ● (नकोशा) गोष्टी विसरण्याची क्षमता ● गोष्टी/भावना/विचार शक्य तितक्या योग्य शब्दांत एक्सप्लेन करू शकणं ● पॅशनेट नेचर, फ्लेक्सिबिलिटी ● सहनशक्ती, संस्कारक्षमता

## शीतल आणि सुवर्णा

जीवनसाथमधे नियमित येणारं एक ठाण्याला राहणारं जोडपं आहे. शीतल रसाळ आणि सुवर्णा रसाळ. त्यापैकी शीतलनी सुवर्णाबद्दल असं म्हटलं–

जीवनसाथीकडून (जोडीदाराकडून) शिकाव्याशा (शिकलेलो नाही) वाटणाऱ्या गोष्टी : (शिकायची इच्छा आहे)

● साधेपणानी राहणं, काटकसरीनी राहाणं. ● शांतपणा, अजिबात न चिडणं, न रागावणं ● अतिशय मोकळेपणानी वागणं.

## स्मिता मुद्गल

स्मिता मुद्गल आणि दीपा मुद्गल या दोन सख्ख्या जावा जावा. जीवनसाथमधे नियमित येतात. त्यांचे नवरे येत नाहीत. त्यापैकी स्मिता मुद्गल नवऱ्याविषयी (चारुदत्त मुद्गल) अशा गोष्टी सांगत होत्या.

1) कुणालाही कमी न लेखता, समोरच्याच्या वयाप्रमाणे, मानाप्रमाणे, त्याची आवड लक्षात घेऊन त्याप्रमाणे त्या व्यक्तीशी समंजसपणानी वागणं.
2) शक्यतो समोरच्यातील अवगुण न बघता, त्याला नावं न ठेवता, माणूस

म्हणून त्याच्याकडे बघून, त्याप्रमाणे वागायचा प्रयत्न करणं.

3) (अपशब्द न वापरता) चांगल्या भाषेत सगळ्यांशी संवाद साधण्याचा प्रयत्न करणं.
4) आपल्या वागण्यानी इतरांना धाक, दडपण वाटेल असं अजिबात न वागणं.
5) नवीन गोष्टी स्वीकारून आत्मसात करण्याचा प्रयत्न करणं.
6) गरजा कमी
7) नेहमी कष्ट करण्याची तयारी - सहनशीलता
8) व्यवहारात (धंद्यात) कुटुंबात सर्वांच्या विचारांनी, एकत्रित निर्णय घेऊन, एकजुटीनी पुढे जाण्याची धडपड.
9) व्यवसायात, कुटुंबात स्वतःच्या जबाबदारीची योग्य जाण ठेवणं.
10) मधे न बोलता समोरच्यांनी सांगितलेलं शांतपणे ऐकून घेणं.
11) रागावर नियंत्रण ठेवण्याचा प्रयत्न

## दीपा मुद्‌गल

दीपा मुद्‌गलनी नवऱ्याबद्दल (कौस्तुभ मुद्‌गल) अशा गोष्टी सांगितल्या–

1) नवनवीन विषय शिकण्याची कला आहे.
2) मनाशी एखादी गोष्ट ठरवली की शेवटपर्यंत निभावणं.
3) गोष्टीत सातत्य राखणं.
4) (स्वतःच्या तब्येतीशी निगडित गोष्टींची, उदा. जेवण, झोप इ.) वेळ पाळणं.
5) नियमित व्यायाम
6) आपल्या आवडीच्या गोष्टी, छंदाविषयी वगैरेसाठी वेळ काढणं

## शैवल मेढेकर

शैवल मेढेकरचा नवरा काही वर्षांपूर्वी वारला. तिला दहा वर्षांचा मुलगा आहे. तिनी विशिष्ट व्यक्तीकडून काय शिकले हे सांगितले.

1) अनिलदादांकडून मी अशा गोष्टी शिकले– समोरच्याला निर्भीडपणी पण सभ्यपणी आपलं म्हणणं सांगणं. मी आमच्या घरातलं सर्वांत लहान भावंड असल्यामुळे कायम गप्प बसले. भावना कधी व्यक्त केल्या नाहीत. अनिलदादांची मला यातून बाहेर येण्यासाठी खूप मदत झाली.

   अनिलदादांकडून मी आयुष्याच्या व्यवस्थापनासाठी वापरण्याची डायरी सिस्टिम शिकले. त्यामुळे स्वतःच्या आयुष्यावरचं नियंत्रण वाढतं. मनःशांती मिळते.

2) पंतप्रधान मोदीजींमुळे माझ्या विचारांना पुन्हा स्फूर्ती मिळाली. पूर्वी माझी वृत्ती देशभक्तीची, उत्तम नागरिक बनण्याची होती. माझ्या आयुष्यातल्या निरनिराळ्या अपघातांमुळे मी त्याबद्दल विचलित झाले होते. मोदीजींच्या भाषणांमुळे मी पुन्हा हरवलेल्या अवस्थेतून मूळपदावर आले.
3) आयुष्यातल्या अनुभवांमधून मी असं शिकले की उगाच रडत बसायचं नाही. स्वतःच्या मनाप्रमाणे वागायचं, फक्त दुसऱ्यावर अन्याय करायचा नाही.

## अपूर्वा

अदिती आणि अपूर्वा संचेती या सख्ख्या बहिणी. अपूर्वानी आपल्या मोठ्या बहिणीबद्दल अशा गोष्टी सांगितल्या. त्या दोघी एकत्रपणे त्यांच्या शेतावर राहातात आणि एकत्र शेती करतात.

1) सुंदर हस्ताक्षर - तिची लिखाणाची पद्धत, हस्ताक्षर बघून मीही अधिक नीटनेटकं लिहायला लागले.
2) सात्त्विक अन्नाकडे कल - फळं, रोजचं जेवण आवडीनी जेवणं, वेळेवर जेवणं.
3) कामातला झपाटा - शेतीतल्या बऱ्याच कामांची आणि व्यापाची मनात एक भीती होती. होईल का नाही, संपेल ना वेळेवर... अदितीबरोबर काम करून ती खूपच कमी झाली. एकदा ठरलं की कामाला भिडायचं. मग सहज कामं पूर्ण होतात.
4) बरीच शेतातली कामं शिकले.
5) एखादी गोष्ट पटली की त्याला अधिक फाटे न फोडता तितक्याच एकाग्रतेनी, तन्मयतेनी ते करायचं.
6) तिच्यातला शांतपणा, सौम्यपणा स्वीकारला.
7) कोणत्याच व्यक्तीबद्दल जास्त टीकेचा सूर न काढता हवा तिथे सहयोग घेणं, देणं.
8) माणसाबद्दल जास्त ॲक्सेप्टन्सच्या मोडमधे राहणं.
9) स्वतःतली शिस्त मेटिक्युलस. शी गिव्हज् टु अदर्स व्हेरी ईझिली अँड क्वाअेटली.
10)स्ट्रेट फॉरवर्ड
11)टु बी अेफिशियंट वर्कर

## विजय जाधव

विजय जाधव हा वयानी बराच मोठा अविवाहित मुलगा जीवनसाथमधे अनेक वर्षं येतो. त्यानी सांगितलेल्या गोष्टी अशा -

1) ऑफिसच्या कामानिमित्त मी जेव्हा सातारा इथे अजिंक्यतारा किल्ल्यावर होतो तेव्हा मी माझ्या सहकाऱ्याकडून भाकरी करण्याची कला शिकलो.
2) आमच्या सरांकडून वर्तमानपत्र महिन्याप्रमाणे लावून ठेवण्याची कला शिकलो–
3) घरातील साहित्याची सूची (डिरेक्टरी) ठेवण्याची व ती अपडेट करण्याची कला माझ्या सरांकडूनच शिकलो.
4) एखादी व्यक्ती आपला अनादर करण्याच्या हेतूनी आपल्याशी वागत असेल तरी त्या व्यक्तीविषयी सुद्धा सकारात्मक दृष्टिकोन ठेवून त्या व्यक्तीविषयी मत व्यक्त करण्याची कला मी मामांकडून शिकलो.
5) एखादी चूक झाल्यानंतर त्या व्यक्तीला लगेच रागावू नये. ती चूक समजावून सांगावी कारण चूकीची दुरुस्ती होऊ शकते व त्या चुकीमधून माणूस सुधारू शकतो, नव्याने घडू शकतो हे मी माझ्या शाळेच्या मॅडमकडून शिकलो.

कार्यशाळेमधे 25-30 लोक हजर होते. जेवढी उदाहरणं मी वर दिलीयत त्याखेरीज बाकीचे लोक गप्प बसले. त्यांतले काही विवाहित तर काही अविवाहित होते. ते काही बोलले नाहीत याचा अर्थ त्यांनी अजून कोणाकडूनच शिकायला सुरुवात केलेली नाही.

अजून समजा कोणाला वाटलं तर जोडीदाराकडून किंवा विशिष्ट व्यक्तीकडून आपण काय शिकलो हे जाहीरपणी नावासकट सांगावं, तर कळवा, लिहा. पुढच्या आवृत्तीत अवश्य छापू.



# 7

# इ.क्यू. (इमोशनल कोशंट) म्हणजेच भावनिक गुणांक

## 1) भावनिक गुणांकाची (इ.क्यू.) मूळ कल्पना

प्रत्येक माणसाचा दुसऱ्याबद्दल विचार करण्याचा काही प्रकार असतो आणि तसा विचार करण्याची कमी-जास्त क्षमता असते. ज्या प्रकारे बुद्ध्यांक (आय. क्यू.) असतो तसाच इमोशनल कोशंट असतो (इ. क्यू.) असं प्रथम डॅनियल गोल्मन यानी मांडलं. त्याच्या म्हणण्याप्रमाणे तो आयक्यूच्या जोरावर थोडा बदलता येतो, पण मुळापासून बदलता येत नाही. डॅनियल गोल्मननी याची एक टेस्ट पण तयार केली. साधारण 15 ते 20 वर्षं आयक्यूबरोबर इक्यूचं मोजमाप असं जगभर मान्य झालं. मानसशास्त्राच्या पुढे केलेल्या प्रयोगांच्यात आयक्यूची पद्धत बदलली आणि इक्यूचं महत्त्व असतं एवढं तत्त्वतः मान्य केलं पण त्या टेस्टला मान्यता मिळाली नाही. त्यामुळे पुढे त्याचा वापर कमी झाला. आता मला स्वतःला काय वाटतं ते सांगतो.

माझ्या लहानपणी शाळेत एक नागरिकशास्त्र नावाचा विषय होता. प्रत्यक्ष त्या विषयात कुठचे धडे होते मला आठवतदेखील नाही. पण साधारण गोषवारा सामाजिक कर्तव्यं शिकवणारा होता. त्या सगळ्याचा सारांश, दुसऱ्याचा, एका व्यक्तीचा, अनेक व्यक्तींचा एकत्रित विचार करण्याची क्षमता असाच होता. त्या काळात त्यामधे दुसऱ्याच्या भावना असा शब्ददेखील वापरलेला नव्हता. पण या अभ्यासानंतर मला स्पष्ट दिसतंय की तो सगळा विषय ‘भावनिक गुणांक’ याचाच अभ्यास होता.

माझ्या दृष्टीनी हे सगळंच्या सगळं भारतीय वातावरणात तपासल्याशिवाय त्याबद्दल खरं काही ठरवणं कठीण आहे. त्यामुळे मी डॅनियल गोल्मनची टेस्ट न वापरता निराळ्याच पद्धतीनी इमोशनल कोशंट काढायचा प्रयत्न केला.

गोल्मननी तयार केलेली टेस्ट माझ्याकडे आहे. त्यातले विलायती संदर्भ, पाश्चिमात्य उदाहरणं बदलून आपल्या समाजाला उपयोगी अशी उदाहरणं वापरताही आली असती. मला निराळीच कल्पना सुचली आणि ती जास्त चांगली वाटली म्हणून मी प्रत्यक्ष गोल्मनची टेस्ट वापरली नाही.

मी जो प्रयत्न केला त्याला खरं म्हणजे 'फॉर्मल टेस्ट' असं पण म्हणता येत नाही. साध्या भाषेमधे ज्याला म्हणतात की मेंदूनी नाही पण हृदयानी विचार करा तसा अंदाज घेण्याचा मी प्रयत्न केला. माझं स्वतःचं असं पक्कं मत बनलं आहे की, माणसाची बुद्धिमत्ता महत्त्वाची आहे, म्हणजेच आय. क्यू. महत्त्वाचा आहे. पण विचार मांडण्याच्या एकूण वागण्याच्या पद्धतीत दुसऱ्याबद्दलचा विचार व्यक्त झाला तर तीच गोष्ट जास्त परिणामकारक आणि पटण्याजोगी ठरते. मी माझा अभ्यास करताना डॅनियल गोल्मन, कार्ल रॉजर्स आणि अल्बर्ट एलिस या तिघांचंही म्हणणं डोळ्यांसमोर ठेवून विवाहाच्या संदर्भात कसं वागायला पाहिजे याची सूत्रं तयार केली.

हे जरा समजावून सांगतो. कार्ल रॉजर्सच्या म्हणण्याप्रमाणे आपल्या आयुष्यातली सर्वांत महत्त्वाची व्यक्ती आपण स्वतः असतो. मला ते पूर्ण पटतं. डॅनियल गोल्मनच्या म्हणण्याप्रमाणे दुसऱ्याबद्दलचा विचार आपण व्यक्त केला पाहिजे. तेही बरोबर आहे असं मला वाटतं आणि अल्बर्ट एलिसच्या म्हणण्याप्रमाणे संबंधित प्रत्येक विषयाचा सर्व बारकाव्यानिशी एकत्रित आणि अधिक स्पष्ट असा विचार करता आला पाहिजे. हेही मला योग्य वाटतं. मला विचाराच्या या तीन निराळ्या दिशा वाटतच नाहीत.

इक्यू याचा अर्थ स्वतःचं मत बाजूला ठेवून दुसऱ्याच्या मनाप्रमाणे करणं असा नाही. त्याचा एकत्रित अर्थ असा की स्वतःचं महत्त्व तसंच ठेवून दुसऱ्याच्या मताचा विचार केला आहे हे व्यक्त करून अत्यंत स्पष्ट बोलता आलं पाहिजे. जो चालू विषय असेल तो विचार समजण्याची बौद्धिक कुवत पण पाहिजे आणि भावनिक कुवतही आवश्यक आहे. पुढचा खरा प्रश्न लोकांसमोर असा असतो की हे सगळं कृतीमधे आणण्याचं धाडस कमी पडतं. धाडस ही गोष्ट मात्र या तत्त्वांपेक्षा निराळी आहे.

मी याविषयी केलेल्या प्रयोगांविषयी थोडं सांगतो. या पुस्तकात स्वतंत्रपणे ‘पर्सनॅलिटी इंटरव्ह्यू’ याच्याविषयी लिहिलेलं आहे ते सगळं मी याच्यावरून विकसित केलंय. नुसत्या जोडप्याच्या माहिती सांगणाऱ्या मुलाखतीपेक्षा दोघांची वैचारिक, भावनिक व्यक्तिमत्त्वं स्वतंत्रपणे कशी आहेत आणि एकत्र संसारात कशी आहेत हे तपशीलात समजावून घेण्याचा हा प्रकार आहे. निराळ्या भाषेत सांगायचं तर त्या नवराबायकोनी स्वतःचा आणि त्याचवेळेला जोडीदाराचा किती स्पष्ट विचार केला हे सगळं त्याच्यावरून कळतं. मी जरी हा पर्सनॅलिटी इंटरव्ह्यूचा फॉर्म विवाहितांसाठी तयार केला असला, तरी असं काही वेळा झालं होतं की टेस्ट देण्याची इच्छा होती, पण ते दोघं मित्र मित्र होते. एकदा एक अविवाहित वयस्कर बाई होत्या आणखी त्यांना एकटीलाच टेस्ट द्यायची होती. त्यामधे काहीच अडचण आली नाही. त्यांनी त्या फॉर्ममधली प्रश्नोत्तरं अगदी मनापासून सांगितली. त्यांना खूप फायदा झाला.



## 2) स्त्रियांच्या आणि पुरुषांच्या भावनांकातला फरक

आता आपण काही उदाहरणं घेऊ म्हणजे ईक्यू प्रकरण जरा सोपं जाईल. शब्द न वापरता तान्हं बाळ आणि आई यांच्यात जो काही संवाद असतो ती म्हणजे ईक्यूची परिसीमा असते. बाळ काही बोलूच शकत नाही त्यामुळे शब्द हा प्रश्नच येत नाही. रडण्याच्या प्रकारावरून बाळाला नेमकं काय म्हणायचं आहे हे आई ओळखायला सुरुवात करते आणि जेव्हा तिला ते बरोबर कळतं तेव्हा तिचा दिसतो तो ईक्यू. हीच गोष्ट बाबांना करता येणार नाही असं अजिबात नाही, पण त्या ट्रेनिंगला सुरुवात आई आणि बाळ यांच्यापासून होते. बाबा जर मागे राहिले तर सबंध कुटुंबात ईक्यूमधला सर्वांत कच्चा गडी म्हणजे बाबा अशी परिस्थिती निर्माण होते.

मुलं जरा मोठी झाली की आई-वडलांसकट सगळे त्यांना बोलायला सुरुवात करतात. नुसतं रडून मला काय कळणार, तुला काय पाहिजे ते शब्दात सांग अशा आरडाओरडीला सुरुवात करतात. प्रत्यक्षात हा सगळा प्रश्न त्या ॲडल्ट माणसाच्या इक्यू लेव्हलचा आहे. ही जी कळायला लागलेली पण लहान मुलं असतात त्यांच्या आवडीनिवडी आई जास्त प्रमाणात लक्षात ठेवते आणि त्या मानानी वडील कमी. या प्रत्येक गोष्टीला अपवाद असणार याची आपल्याला कल्पना आहे. आपल्या पाच-सात वर्षांच्या मुलाला कुठची भाजी आवडते, कुठचा गोड पदार्थ आवडतो, काय नावडतं हे सगळं आईला माहिती असतं. पोषाखसुद्धा आपल्या मुलामुलींना लांडे, लांब, घट्ट, सैल यांतलं काय आवडतं आणि काय नावडतं हे आईला माहीत असतं, वडलांना नसतं. तसंच मुलांची आवडती मित्रमंडळी कोण, आवडते शिक्षक कोण हे सगळं आईला जास्त माहीत असतं. मागे आपण म्हटल्याप्रमाणे त्या त्या माणसाचा इक्यू कमी-जास्त आहे की नाही हे अगदी नेमकं सिद्ध करता आलेलं नाहीय. पण आपल्या समाजातला स्त्रियांचा ईक्यू संस्कारांमुळे, पुरुषप्रधान परंपरेमुळे जास्त असायलाच लागतो आणि ते ट्रेनिंग त्यांना आयुष्यभर पुरतं.

प्रयत्न केला तर पुरुषालाही हे अशक्य नाहीय. प्रश्न आहे तो हे आवश्यक आहे की नाही हे पुरुषाला पटण्याचा. दुसऱ्याचा विचार करणारा पुरुष किंवा

दुसऱ्याच्या भावनांची कदर करणारा पुरुष हे सर्वसाधारण पुरुषाचं वर्णन होऊ शकत नाही. एवढंच काय, कुटुंबात फार गुंतलेला, बायकोची कदर करणारा असा पुरुष असला तर त्याला बायल्या म्हणून हिणवतातदेखील. परदेशी मुली भारतीय मुलांना 'ममाज बॉय' म्हणजेच आयल्या म्हणून ओळखतात.

सबंध जगातल्या पुरुषांची एक पंचाईत असते. वाईट वाटलं तरी पुरुषांनी रडायचं नसतं. फार कमी अपवादात्मक पुरुष रडतात. त्यात बायकोसमोर, मुलांसमोर, इतरांसमोर तर नाहीच नाही. माझ्यावरदेखील असे न रडण्याचे संस्कार लहानपणापासून झालेले आहेत. मी अगदी क्वचित रडलो आहे, पण खरंच क्वचित.

एखाद्याला वाईट वाटलं तर त्यानी रडावं हेच योग्य. लहान मुलांसारखं मोठा आवाज करून रडणं मात्र मोठ्या माणसाला शोभत नाही. अगदी आई-वडील वारले, जोडीदार वारला तरी मोठा आवाज करून रडणं, छाती पिटून घेणं, डोकं आपटणं हे सगळं सिनेमात दाखवण्यासाठी असतं. प्रत्यक्षात तसं वागायचं नसतं.

आवाज न करता कोणी रडत असलं तर तो त्या माणसाच्या भावनेच्या तीव्रतेचा प्रश्न आहे. त्यामधे व्यक्तीव्यक्तीप्रमाणे कमी-जास्त फरक असतो. कुठच्याही माणसाला दुसऱ्या कोणी असं म्हणणं 'रडण्याजोगं त्यात काय आहे?' हे मात्र चुकीचं आहे. प्रत्यक्षात लोक काय वाट्टेल ते म्हणोत, बायकोची काळजी करणाऱ्या नवऱ्याला त्याची आई बायल्या, बाइलवेडा म्हणू देत, बायकोच्या धाकातला म्हणू देत, ताटाखालचं मांजर म्हणू देत, मित्रमंडळी चेष्टा करू देत, ते वागणं योग्यच आहे. विशेषतः बायकोला दिवस गेले हे कळल्यानंतर अगदी सिनेमातल्यासारखं कौतुकानी वागणारे नवरे दिसतील, पण गर्भार बायको, खाण्यापिण्याची पथ्यं, हालचालींवर मर्यादा अशा अवस्थेतल्या बायकोची जरूर तेवढी भावनिक काळजी बहुतेक पुरुष घेत नाहीत. गर्भारपणात, बाळंतपणात, मूल अंगावर पीत असेपर्यंत नवऱ्याच्या ई.क्यू. चीच परीक्षा असते. या परीक्षेत नापास होणारे नवरे खूप आहेत. मी स्वतः एकदा कसा चुकीचा वागलो होतो हे या पुस्तकातल्या 'मी केलेल्या चुका' या प्रकरणात सांगितलं आहे.

आत्मकेंद्री पुरुष बायकोनी संसाराचा गाडा रेटल्यामुळे झाकून जातो. आत्मकेंद्री स्वभावाची खूप टोकाची पुढची पायरी म्हणजे स्वमग्नता ऊर्फ ऑटिझम. याचाच अर्थ अगदी सौम्य प्रमाणात असलेली स्वमग्नता म्हणजे

आत्मकेंद्रीपणा. प्रमाण सौम्य असल्यामुळे त्यात सुधारणा करता येते. बहुतांश भारतीय पुरुष शेकडो वर्षांच्या पिढ्यान्‌पिढ्यांच्या परिणामामुळे आत्मकेंद्री असतात, बायको त्यामुळे अस्वस्थ असते, वैवाहिक जीवन अस्वस्थ असतं. पण अनेक वेळा सांगितलेलं महत्त्वाचं वाक्य पुन्हा सांगतो, 'विवाहाचं बिघडलेलं यंत्र कुठच्याही अवस्थेत दुरुस्त करता येतं.'

कुठच्या तरी पद्धतीनी अभ्यास करून, विचार करून किंवा उपजत बुद्धीनीसुद्धा लग्न झालेल्या पुरुषाचा ईक्यू बायकोच्या तोडीनी वाढला तर लोक त्यांना एकमेकांच्या प्रेमात असलेलं जोडपं म्हणून ओळखतात किंवा बायकोच्या धाकात आहे असं म्हणतात. कारण ते एकमेकांची कदर करताना सगळ्यांना स्पष्ट दिसतात. यालाच 'मेड फॉर इच अदर' असंही काही लोक म्हणतात.

आपल्या जवळच्या व्यक्तींबद्दल असलेली कदर, व्यक्त केलेली काळजी याला ईक्यू म्हटलं काय, किंवा सरळसरळ प्रेम म्हटलं काय, पण वैवाहिक जीवनातली ती खरं म्हणजे प्राथमिक अटच आहे. ती अट साध्या शब्दांत अशी आहे की, बायकोचा, मुलांचा, बायकोच्या नातेवाइकांचा, बायकोनी नवऱ्याच्या नातेवाइकांचा म्हणजे सर्व जवळच्या लोकांचा विचार करणार. अडीच हजार वर्षांपासून ग्रीक फिलॉसॉफीमधे सांगितल्याप्रमाणे प्रत्येकाला कॅथार्सिसची आवश्यकता आहे, (विचार आणि भावना व्यक्त करण्याची गरज) आणि त्यासाठी लग्न करायचं असतं. त्याखेरीज अर्थातच प्रजनन हा लग्नाचा हेतू मान्यच केला होता.

एखाद्या माणसाचा 'हाय ईक्यू' आहे असं मानलं तर 'लो इक्यू'च्या माणसाला म्हणतात काय? असा माणूस म्हणजे 'सेल्फ सेंटर्ड' किंवा आत्मकेंद्री माणूस. आत्मकेंद्री स्त्रिया अविवाहित राहाण्याची शक्यता जास्त असते किंवा त्यांचे संसार बिनसतात. पण पुरुष आत्मकेंद्री असला तर त्याचं लग्न होतं, त्याला मुलंही होतात आणि बायको सबंध संसार ओढून नेते.

या बाबतीत असं नेहमी आढळतं की, पुरुषांचा भावनिक गुणांक बायकांच्या तुलनेत कमी पडतो. हातातल्या ट्रेमधे 2-4 कप, पाण्याचे ग्लास घेऊन आलेल्या पाहुण्यांना ते नेऊन देणं ही महत्त्वाची परीक्षा असते. हे काम करणारे पुरुष कमी दिसतात. बहुतेक पुरुषांना त्यात थोडा कमीपणा वाटतो. संसारात अशा बऱ्याच गोष्टी असतात की जिथे पुरुष मागे राहतो. त्याचं कारण हे असतं.



# 3) भावनांक सुधारण्याचं शिक्षण

विवाह अभ्यास मंडळ म्हणजे काय या लेखामधे व्यक्तिगत समुपदेशनाचा एक प्रकार वर्णन केला आहे तो म्हणजे कॅरमबोर्ड टेक्निक. जेव्हा एखादा माणूस समुपदेशकाकडे हजरच होत नाही पण त्याचा प्रश्न घेऊन दुसरीच व्यक्ती हजर होते त्या वेळेला वापरण्याचं हे तंत्र मी विकसित केलं. जो हजर झालेला नाही तो स्वतःचा विचार, दुसऱ्याचा विचार एकाच वेळेला किती स्पष्टपणी करू शकतो हे शोधून काढायचं काम कॅरमबोर्ड टेक्निकमधे चालतं. काही ठिकाणी याला 'रिफर्ड कौन्सेलिंग' असंही म्हणतात.

रागावर नियंत्रण ठेवण्याची अनेक निरनिराळी तंत्रं तुम्ही ऐकली असतील, वाचली असतील. त्याविषयी आत्ता सांगण्याचं कारण एवढंच आहे की, रागावर नियंत्रण ठेवण्यातला सर्वांत महत्त्वाचा भाग म्हणजे आपला 'इक्यू'. रागावरच्या नियंत्रणासाठी अनेक निरनिराळी तंत्रं आहेतच. ती सगळी वापरण्याबाबत आपला काही आक्षेप नाही. पण खरं मुख्य जमलं पाहिजे ते म्हणजे आपल्याला राग येण्याजोगं दुसरा माणूस का वागला याचा विचार करता येणं.

प्रत्यक्षात असं आहे की, कुठचीही गोष्ट अकस्मात होत नाही. त्या भावनेची किंवा विचाराची मनात सुरुवात झाल्यापासून ती व्यक्त होईपर्यंत मधे वेळ जातोच. त्या मधल्या वेळात तो विचार रागाबद्दल असला, भावना चिडीची असली तर त्याला रोखणं आपल्याच हातात असतं. त्या व्यक्तीबद्दल, घटनेबद्दल, त्याच्या मागच्या कारणाबद्दल विचार करणं आपल्याच हातात असतं.

घटकाभर समजा, कुणीतरी माझ्यावर असा आरोप करतंय की मी फार निर्दयपणे वागलो. प्रत्यक्षात माझ्या दृष्टिकोनातून मी तत्त्वनिष्ठपणे वागत असतो. पण त्या माणसाला मी निर्दय वाटलो याचं केवळ एकच कारण असतं. त्याच्या अडचणीचा विचार मी केला आहे पण तरी मला हे तत्त्व पाळण्याखेरीज सध्याच्या परिस्थितीत काही गत्यंतर नव्हतं, ही गोष्ट मी त्याच्यापर्यंत नीट पोहोचवू शकलो नाही. या सगळ्या अडचणीमधे माझ्या भाषेवरच्या प्रभुत्वाचाही संबंध येतो. शब्दात व्यक्त करण्याची क्षमता याच्याइतकं अचूक दुसरं काही नाही. हे मी म्हटल्या म्हटल्या तुमच्या मनात काय येईल याची मला कल्पना आहे.

शब्दांखेरीज देखील निरनिराळ्या प्रकारची भाषा असते हे मला माहिती आहे. त्याचा अनादर करण्याची माझी अजिबात कल्पना नाही. पण कमी वेळात आणि अचूक व्यक्त करण्यासाठी मात्र शब्दच शेवटी उपयोगी पडतात.

योग्य शब्दांत, योग्य सुरात, थोडक्यात, योग्य पद्धतीनी दुसऱ्याला काय वाटतं आहे याचा आपण विचार केला, त्याचा उल्लेख केला की त्यानंतर कृती विरोधी असली तरी चालते. पुन्हा एकदा सांगतो की, 'इमोशनल कोशंट' चांगला याचा अर्थ दुसऱ्याच्या मताप्रमाणे करत सुटणं असा अजिबात नाही.

मधे एका अभ्यास गटात ई.क्यू. या विषयावर कार्यशाळा घ्यायला मला आणि शोभाला बोलावलं होतं. या लेखात सांगितलेलेच मुद्दे मी त्यांच्याशी बोलत होतो. चर्चेच्या शेवटी त्या सगळ्यांचं म्हणणं होतं की आम्ही इतरांचा विचार करायला, त्यांच्याशी चांगलं वागायला तयार आहोत, पण त्याचा फायदा आम्हाला लगेच दिसला पाहिजे. मी त्यांना समजावून सांगताना म्हणालो की, सावकाश परिणाम करणारी औषधं असतात तशी हळूहळू दुष्परिणाम करणारी हानिकारक द्रव्यं असतातच की! ई.क्यू. सुधारून इतरांशी, विशेषतः आपल्या जोडीदाराशी, कुटुंबं, मुलं, आजीआजोबा यांच्याशी चांगलं वागणं हे अशा औषधांसारखं असतं. परिणाम सावकाश, पण खात्रीशीर, आणि दुष्परिणाम अजिबात नाहीतच. अगदी परक्यांशीही चांगलं वागून फायदाच फायदा आहे.

शिक्षणानी खरं म्हणजे ई. क्यू. मधे सुधारणा व्हायला पाहिजे. स्वतःखेरीज इतरांशी कसं वागायचं म्हणजेच जगायचं कसं या शिक्षणात भावनांक वाढवणं हा महत्त्वाचा भाग असायला हवा. पण भारतामधल्या शिक्षणानी ते होत नाही, हा शिक्षणपद्धतीचा दोष आहे. त्यात मुळापासून बदल करण्याची गरज आहे.

ज्या जवळच्या, नेहमी भेटणाऱ्या माणसांविषयी बोलणं चालू आहे त्यामधे आपल्या घरातले कामवाले पण येतात. आपल्या सध्याच्या आसपासच्या समाजात कामाला ठेवलेल्या लोकांच्या बाबतीत जशी वागणूक असते त्याचे सरळसरळ दोन भाग पडतात. हाय ईक्यू असलेलं जोडपं असलं तर त्यांचे सगळे निर्णय त्या प्रकारे घेतलेले असतात. कष्टकऱ्यांना चांगली वागणूक देणं, आपल्या-बरोबर त्यांना खायला देणं, पैसे उधार देणं, त्यांना तब्येतीला काही झालं तर मदत करणं, विचारपूस करणं हा एक गट झाला. दुसऱ्या विरुद्ध गटाचं अगदी सरळसरळ म्हणणं असतं की, नोकरमाणसांना चढवून ठेवायचं नाही. त्यांना आपण मदत केली तर ते सोकावतात, आणखीन आणखीन मागणी करत सुटतात.

प्रत्यक्षात परिस्थिती अशी असते की, जवळजवळ सर्व कष्टकऱ्यांची भाषा कच्ची असते, शिक्षण बेताचं असतं, त्यांचा संसार जेमतेम भागत असतो त्यामुळे त्यांचं सामाजिक खच्चीकरण झालेलं असतं आणि ते निदान आपल्याशी तरी नॉन व्हर्बल असतात. ते एकमेकांच्यात गप्पा मारतात तेव्हा त्यांचे संदर्भ निराळे आणि त्यामुळे बोलणं निराळं असतं. आपल्याशी त्यांना मोकळेपणानी खरं बोलण्याचा धीर होत नाही. आपण काही वेळापूर्वी लहान मुलाविषयी बोललो तसंच यांच्याबाबतीत वागावं लागतं. ते शब्दांत बोलणार नाहीत, हे आपण ओळखायचं आहे. निरनिराळ्या शक्यता आपण विचारायच्या आहेत तर काहीतरी हाताशी लागेल.

मी ज्या ठिकाणी राहतो ती सोसायटी मोठी आहे. लिफ्टमधून जाता-येताना आमच्या इमारतीमधे काम करणाऱ्या ड्रायव्हर, कामगार, मोलकरीण या सगळ्यांशी हसतमुखानी थोडंसं बोललं तर त्यांना आपल्या मनातल्या समानतेची जाणीव होते. त्यातल्या काहींची नावं मला माहिती असतात. विचारपूस होते. आमच्या सोसायटीच्या वॉचमन लोकांशीही माझी बऱ्यापैकी ओळख असते. आमच्या इमारतीतल्या सगळ्यांनाच मी ओळखतो, बोलतो. पण रहिवाश्यांपैकी मात्र बहुतेक लोक ड्रायव्हर, कामवाले यांच्याकडे बघतसुद्धा नाहीत.

मी दोन बायका बोलताना प्रत्यक्ष ऐकलंय. त्या म्हणत होत्या, 'मोलकरणींना चढण्या-उतरण्याची, श्रमांची सवय असते. त्यांना लिफ्टची काय जरूर?' असे कष्टकरी लोक नॉनव्हर्बल असतात. पण याचा अर्थ ते मठ्ठ, भावनाशून्य, बेपर्वा असतात असा नाही.

समाईक वापरासाठी असलेल्या वस्तू वापरताना घ्यायची काळजी ही माणसाच्या भावनांकांची परीक्षा असते. आपण जातो तिथे कुठेतरी 'डोअर क्लोजर' असतो. तो शेवटचे काही सेकंद अगदी कमी वेगानी दार बंद व्हावं अशी व्यवस्था करतो. तेव्हा फक्त संयम बाळगायचा असतो.

लिफ्टचा दरवाजा ऑटोमॅटिक नसला तर हातानी नीट बंद करावा लागतो. तो घाईनी बंद केला तर उघडा राहाण्याची शक्यता असते. पुन्हा प्रश्न येतो तो संयमाचाच. म्हणजे भावनांकाचाच. लोकांचं काय होईल याची पर्वा असण्याचा तो प्रश्न असतो. दरवाजा नीट बंद झाल्याची खात्री करून घेऊनच लिफ्टपासून दूर जायला हवं, त्याआधी नाही.

'कन्स्ट्रक्शन मॅनेजमेंट'मधल्या 'लेबर सायकॉलॉजी' विषयात याविषयी

फार स्पष्टपणे शिकवतात. आत्ता त्या विषयात मी शिरणार नाही कारण 'विवाह, एरवीचं आयुष्य आणि व्यवस्थापनशास्त्र' या लेखात हे सविस्तरपणे सांगितलेलं आहे.

हे झालं आपल्या कुटुंबातल्या माणसांविषयी, नातेवाइकांविषयी आणि नेहमी भेटणाऱ्या माणसांविषयी. मधे आम्ही असं एक उदाहरण बघितलं की, एका नवरा-बायकोनी एका बाईंची जबाबदारी घेतली कारण त्यांचा नवरा वारला. या परक्या बाई या कुटुंबात राहायला येणार याविषयी कुतूहल असल्यामुळे आम्ही चौकशी केली तर असं लक्षात आलं की, जे गृहस्थ वारले होते त्यांची पहिली बायको वारली होती आणि तिचा हा भाऊ होता आणि त्यांनी आपल्या मेव्हण्यांच्या पश्चात डोक्यानी कमी असलेल्या दुसऱ्या बायकोची जबाबदारी आयुष्यभरासाठी घेतली. जबाबदारी घेणारे शहरी आणि वारलेला मेव्हणा, पहिली बायको, दुसरी बायको हे सगळे ग्रामीण.

या उदाहरणावरून एक गोष्ट लक्षात आली की, दुसऱ्याची कदर करायची म्हणजेच 'हाय ईक्यू' जपायचा. याचा ग्रामीण पार्श्वभूमीशी संबंध आहे. आपला अभ्यास शहरी लोकांचाच आहे हे मला मान्य आहे आणि तरीदेखील ग्रामीण म्हणजे खालच्या दर्जाचे असं मानण्याची चूक कधी कुणी करू नये. दुर्दैवानी शहरी लोकांना आपण शिकलेले आहोत, आपल्याकडे पैसे जास्त आहेत, आपला पोषाख निराळा असतो या सगळ्याविषयी माज असतो तो अगदी चुकीचा आहे. माणसाच्या अंगात निरनिराळे जे गुण असू शकतात त्यांपैकी काही गुण शहरी माणसाकडे जास्त असतील, पण 'इक्यू' या गुणापुरतं बोलायचं झालं तर ग्रामीण माणूस नक्की वरचढ आहे.

एकदा एका ऑफिसमधे एकाला भेटायला गेलो होतो आणि वेटिंगरूमधे बसलो होतो. प्रचंड उकाडा होता. रिसेप्शनिस्टच्या जवळ एक एकटीपुरता छोटा पंखा होता. वेटिंगरूममधे बसलेल्यांसाठी कूलर होता. त्या रिसेप्शनिस्ट मुलीनी मी आलोय् म्हटल्यावर आपणहून कूलर सुरू करायला हवा होता, पण नाही केला. मी काही वेळ उकाडा सहन केला आणि तिला कूलरविषयी विनंती करणार एवढ्यात आतून बोलावणं आलं आणि मी 'एअरकन्डिशन्ड' केबिनमधे गेलो. काही दिवसांनी पुन्हा हाच प्रसंग घडला. त्या मुलीला 'बॉस'कडून काहीच सूचना मिळालेल्या नव्हत्या. ती मुलगी किंवा बॉस किंवा दोघं यांची ईक्यू लेव्हल मला कळली.

उकाडा चालू असतानाच्या काळात घरी पाहुणे आले की पंखा लावणं,

त्यांना पाण्याची बाटली, भांडं देणं, हा सगळा दुसऱ्याचा विचारच आहे. हा सगळा विषय 'दुसऱ्याची सोय करण्याची इच्छा' यातला म्हणजेच भावनिक गुणांकाचाच आहे. बराच वेळ बसलेल्या पाहुण्याला मोरी वापरायची आहे का हे आपणहून विचारायला हवं असं माझं मत आहे. पाहुण्याला हे सांगायला संकोच होऊ शकतो हे यजमानानी ओळखून आपणहून विचारायला पाहिजे.

माझ्या अनेक ओळखीच्यांचं म्हणणं असं की, कोणाला चहा घ्याल का, असं विचारायचं नाही, थेट चहा करायचा आणि पाहुण्यासमोर कपच ठेवून द्यायचा. जेवायला कोणाला बोलावलं की खाद्यपदार्थ काय करू, विचारायचं नाही, थेट पाहिजे तो पदार्थ करून टाकायचा. मला स्वतःला वाटतं, न विचारणं ही गोष्ट पारंपरिक आहे आणि त्या परंपरेत आग्रहानी खाद्यपदार्थ वाढणं, केलाय् म्हणून जबरदस्तीनी चहा प्यायला लावणंही येतं. खरा नको असताना आपण केला म्हणून पाहुण्याला बळजबरीनी चहा प्यावा लागत असला तर त्यात पाहुण्याचा म्हणजेच दुसऱ्याचा विचार होतच नाही.

माझी थेट उलट पद्धत आहे. जेवायला बोलावल्यावर काय आवडतं, काय स्वैपाक करायचा याची व्यवस्थित आधी केलेली चौकशी मला सर्वांत योग्य वाटते. जेवायच्या वेळेला पाहुणा येणार असला किंवा आपण दुसऱ्याकडे पाहुणे म्हणून जाणार असलो तर जेवणार का नाही याचा स्पष्ट शब्दांत आधी उलगडा मला महत्त्वाचा वाटतो.

आपल्याकडे आलेल्या पाहुण्याला चहा, कॉफी, बोर्नव्हिटा, सरबत यांपैकी काय आवडेल, पाणी साधं का फ्रीजमधलं, पेय हवं असं ठरलं तर कपाचा आकार दाखवणं, स्वतंत्र साखर, प्रत्येक व्यक्तीसाठी स्वतंत्र चमचा, चमचा ठेवण्याची निराळी ताटली हे सगळं मला आधुनिक आणि योग्य वाटतं. मुख्य म्हणजे दुसऱ्याबद्दल खरा विचार करायचा असला तर या पद्धतीनी वागणंच मला पटू शकतं. इतर काही नाही. या पुस्तकात 'आधुनिक आणि पारंपरिक' अशा लेखात आधुनिकतेचे बरेच उल्लेख आहेत आणि पारंपरिकतेचेही खूप तपशील आहेत.

मी अनेक टॅक्स कन्सल्टंटस्, वकील, डॉक्टर्स यांच्या ऑफिसेसमधे अगणित वेळा गेलेलो आहे. ९९% ठिकाणी आलेल्या लोकांनी चपला दाराबाहेर काढायची सूचना असते. बहुतेक ठिकाणी चपला-बूट ठेवण्यासाठी नीट व्यवस्थाही नसते. आपण वेटिंगरूममधे बसलेले असताना ऑफिसचा स्टाफ किंवा मालक, पार्टनर आपल्यादेखत चपला, बूट घालून केबिनमधे जातात. मला हे वागणं

सर्वच दृष्टिकोनातून चुकीचं वाटतं. 'जो नियम दुसऱ्याला तोच स्वतःला' या तत्त्वात हे वागणं बसत नाहीच, स्वच्छतेच्या कल्पनेमधेही बसत नाही. स्वतःचं महत्त्व वाढवण्यासाठी जाणूनबुजून दुसऱ्याला दिलेली अन्यायकारक वागणूक या एकाच वर्णनात हे बसतं. अशा सगळ्या कन्सल्टंटस्‌चा प्रश्न 'लो इक्यू' हा असला पाहिजे असं मला वाटतं.

भारतीय समाजातले डॉक्टर्स एका विशिष्ट प्रकारे वागतात. प्रत्येकच गोष्टीला अपवाद असतात तसे याला आहेत, पण बहुतेक डॉक्टर्स जास्तीतजास्त पैसे मिळवण्याच्या मागे असतात. तपासणी करून औषध सांगून अमूक इतक्या मिनिटांत 'पेशंट' खोलीबाहेर जाऊन दुसरा आत आलेला पाहिजे याचं त्यांचं वेळेचं गणित पक्कं असतं. आणि तरी ते जाऊ दे, खरी अडचण पेशंटबद्दलच्या बेपर्वाईची आहे. इतरांची अनेक उदाहरणं मला माहिती आहेत, शोभाची आहेत, खुद्द माझी आहेत, शोनील आभाचीही आहेत. त्या उदाहरणांपैकी निवडक दोन-तीनच सांगतो. शोनील मागे महिनाभर आजारी होता. एका डॉक्टरांनी त्याला अनेक आठवडे टायफॉइडवर औषधं दिली. प्रत्यक्षात कंटाळून दुसरीकडे गेल्यावर त्याला मलेरिया झाला होता ठरलं, औषधं चालू झाली आणि तो बरा झाला.

माझ्या खांदेदुखीवर एका डॉक्टरांनी मला औषधं दिली. तीन दिवसांनी मला थोडीशी चक्कर यायला लागली. विचारल्यावर म्हणाले, 'हो, या औषधांनी होतंच असं.' तीन दिवस त्यांनी मला काळजीत टाकलं त्याचं काय? मागे माझा गुडघा दुखावला होता. पायाला एक प्रकारचा पट्टा बांधल्यावर पायऱ्या उतरताना आणि चढताना विशिष्ट तंत्र वापरावं लागतं. डॉक्टरांनी मला ते समजावून सांगायला पाव मिनिट पुरलं असतं. ते त्यांनी मला न सांगितल्यामुळे तंत्र शोधून काढायला मला काही दिवस लागले. हॉस्पिटल्समधल्या नर्सेस वगैरेंची बेपर्वाई तर वर्णनापलीकडची असते. या सगळ्यांना कशाचं ट्रेनिंग कमी पडतं तर दुसऱ्याशी वागतानाच्या ई.क्यू.चं.

ई.क्यू. कमी असलेल्या माणसांचं आणखी एक लक्षण असतं. अशी लोकं दुसऱ्याचं म्हणणं नीट समजून घेत नाहीत, नीट पूर्ण ऐकत नाहीत आणि मधे बोलून समोरच्याला वेड्यात काढतात.

शिक्षण घेणं आणि देणं याबद्दल विचार करायला लागलं की, भारतातले आय. ए. एस्. ऑफिसर्स डोळ्यांसमोर येतात. बऱ्याच आय.ए.एस. अधिकाऱ्यांचा

आम्हाला अनुभव आहे. त्यांना अनेक गोष्टी शिकवतात त्यामधे समोरच्याचं बोलणं नीट ऐकून घ्यायला नक्की शिकवत नाहीत. त्यांचं मुख्य कसब म्हणजे समोरच्याला निरुत्तर करण्याचं कसब. प्रश्न सोडवण्यासाठी त्यांना नेमलेलं असतं, पण ते बहुतेक प्रश्न नुसते पुढे ढकलतात. त्यांच्या बाजूनीही बोलण्याजोग्या काही गोष्टी दिसतात. मंत्री, राजकारणातले सगळेच लोक त्यांचे हाल करतात. अगदी केविलवाण्या परिस्थितीतले महानगराचे आयुक्त मी बरेच वेळा बघितलेले आहेत. सारांशात सांगायचं तर, त्यांचा सगळा प्रवास आय.क्यू.च्या दिशेनी असतो. ई.क्यू.शी काही संबंध ठेवायला त्यांच्या कामात त्यांना परवानगीच नाही.

सध्या जवळजवळ प्रत्येकाकडे मोबाईल असतो त्यामुळे अगदी सगळ्यांना समजेल असं उदाहरण घेतो. कारण वरची दोन उदाहरणं ही कित्येकांना पचली नसतील. आपण समजा, दुसऱ्या कुणालातरी मोबाईलवर फोन केला आणि त्याच्याकडे आपला नंबर 'सेव्हड्' नसला तर तो हॅलो, कोण बोलतंय वगैरे वगैरे बोलणार. यावरून आपल्याला कळतं की ज्या निवडक लोकांचा टेलिफोन नंबर मोबाईलमधे सेव्ह केलेला असतो त्या निवडक लोकांच्या यादीत आपला समावेश नाही. समजा, ती व्यक्ती आपल्या दृष्टिकोनातून जवळची आहे तर त्याचं नक्की वाईट वाटतं. पण इतका सूक्ष्म विचार लोकांना सुचत नाही असं माझं निरीक्षण आहे.

या पुस्तकात स्वतंत्रपणी धर्म या विषयाचा त्याच्याशी असलेला विवाहाचा संबंध उलगडून दाखवला आहे. इथे फक्त धर्माची व्याख्या सांगतो. स्वतःबद्दल प्रत्येक माणूस विचार करतोच पण दुसऱ्याबद्दल माणूस कुठच्या पद्धतीनी विचार करतो तो म्हणजे वागणुकीचा धर्म आणि त्याची ठरवलेली पद्धत म्हणजे धर्मशास्त्र. याचाच अर्थ दुसऱ्याबद्दल विचार करण्याचा आपला 'ईक्यू' असंही म्हणता येईल. धर्म कल्पनेत दैवी शक्तीवरचा विश्वास अभिप्रेत आहे हा फरक मात्र आहे.

आमच्या ओळखीची काही लोकं एका खास गटात आहेत. श्रीमंत आहेत. लोकांसाठी काम करण्याची, लोकांना देण्याची त्यांची वृत्ती आहे. आम्हाला त्यांच्याकडून सारख्या वस्तू, खाण्याचे पदार्थ अशा भेटी येत असतात. आम्हाला म्हणजे शोभाला, कारण मी काही घेत नाही हे त्यांना माहिती झालंय. मग शोभाही त्यांना काहीतरी देते. थोडक्यात दोन सधन लोकांनी एकमेकांना वस्तू देण्याचं प्रकरण सतत चालू असतं. मला आश्चर्य याचं वाटतं की, ही गोष्ट त्यांना

सांगूनही समजत कशी नाही? आम्हाला याचं किती वाईट वाटतं हे त्यांना समजत कसं नाही? याचं नाव 'सिलेक्टिव्ह ई.क्यू.' असणार. दुसरं काय?

आमच्या ओळखीत एक बेताच्या आर्थिक परिस्थितीतलं कुटुंब आहे. त्यातल्या मुलीचं लग्न सधन कुटुंबातल्या मुलाशी ठरलं. साड्या, दागिने द्यायला लगेचच सुरुवात झाली. भारी किमतीच्या वस्तू मुलाकडच्यांनी दिल्या की यांच्यासमोर दर वेळेला संकट. यात प्रश्न अनेक आहेत, पण त्यातला एक प्रश्न आहे तो मुलाच्या घरच्यांच्या भावनिक गुणांकाचा. मुलीकडच्यांनी अशा भेटवस्तूंची परतफेड करायची ठरवली तर त्यांच्या कुटुंबाला परवडत नाही आणि परतफेड नाही केली तर मनावरचं ओझं वाढत जातं. देणाऱ्यालाच हे समजायला हवं असं मला वाटतं.

मधे एका प्रार्थनेविषयीच्या कार्यशाळेला मी गेलो होतो. मला त्यातली एक गोष्ट चांगली वाटली. जमलेल्या सर्वांनी मिळून काही शब्द आणि सुरांच्या साहाय्यानी सगळ्यांच्या मनात एकच भावना निर्माण करण्याचा तो प्रयत्न असतो. श्राद्ध, पितृपंधरवडा यामागेदेखील सगळ्यांच्या मनात वारलेल्या व्यक्तींविषयी कृतज्ञतेची भावना जागृत करणं हा उद्देश असतो. मी प्रार्थना, श्राद्ध यातला नाही. मला त्या भावनांसाठी या आधारांची गरज नाही. पण एकूण भारतीय जनतेचा विचार केला तर त्यांना अशा आधारांची गरज आहे, असंच वाटतं.

आपण सगळा भावनांचा विचार करतो आहोत ते माणसांबद्दल. जनावरांच्या विचाराचा यात समावेश नाही. मी शहरी माणूस असल्यामुळे मला मुळात जनावरांचा विचार सुचलाही नव्हता. काही लोकांशी बोलल्यावर कळलं की, खेड्यामधे गोठ्यातले गाई-बैल ह्यांना कुटुंबामधले सदस्य असल्यासारखं स्थान आहे. दुष्काळामुळे जनावरं विकावी लागली तर घरातली माणसं ढसाढसा रडतात. विहिरीपाशी बैलांसाठी छप्पर बनवतात. मोटेतून पाणी ओढून बैल दमतात त्यांना विसावा मिळावा म्हणून खेड्यातले लोक जागरूक असतात. बैलांच्या सन्मानासाठी हौसेनी बैलपोळा साजरा करतात. बैलांना सजवून, विश्रांती देऊन आपली भावना ते व्यक्त करतात.

खरं म्हणजे संस्कार, सुसंस्कृत व्यक्ती या शब्दांचा अर्थ शोधायला लागलं तर शेवटी ते दुसऱ्याचा विचार करण्याची क्षमता इथेच येऊन पोचतं. निवडणुकीच्या प्रचारात लोकांना आकर्षण वाटेल अशा मुद्द्यांविषयी बोलण्याची धोरणं ठरतात. त्यासाठी एवढ्या प्रचंड संख्येनी जनतेला काय बोललं तर पसंत पडेल याची

समज आवश्यक असते. प्रत्यक्षात कुठचंही आश्वासन खरं नसतं हा भाग वेगळा, पण स्पर्धा मास इ.क्यू.चीच असते.

जसा आपल्याला व्यक्तीचा ई.क्यू. वागणुकीतून कळतो तसा; संस्थेचाही कळतो. गरवारे बालभवनची शोभा संचालक असल्यामुळे तिच्या ई. क्यू. चा परिणाम संस्थेतल्या सगळ्यांवर होतो आणि सर्वसाधारणपणे सगळे तसे वागायला लागले की तो संस्थेचा ई.क्यू. होतो. एखादी शॉपिंग मॉल्सची चेन असली तर त्यांच्या वागणुकीतून त्यांची धोरणं दिसतात आणि त्याच्यामागचा भावनिक गुणांक कळतो. तीच गोष्ट एखाद्या हॉटेलची किंवा हॉटेल चेनची असते. ई. क्यू. रीडिंगची कुठेही पाटी लावलेली नसली तरी तो आपल्याला कळतोच.

सामाजिक गटाचा, राजकीय पक्षाचा, देशाचा ई. क्यू. पण कळतो. उदाहरणार्थ, युरोपीय लोकांची भारतीयांशी आपुलकीची वागणूक आणि अमेरिकन लोकांची भारतीयांशी असलेली वागणूक यावरून आपल्याला देशाची ई. क्यू. लेव्हल कळते. अरब राष्ट्रांची ई. क्यू.ची अगदी खालची लेव्हल मला चांगलीच माहितीय.

मुद्दा आणखी समजण्यासाठी मी एक उदाहरण देतो. ई. क्यू. आणि संघटनाकौशल्य किंवा व्यवस्थापनकौशल्य यांची समाजातली प्रतिमा राजकीय पक्षाचीही असते. माझा यातला फारसा अभ्यास नाही, पण लोकांशी बोलून समजलं त्याप्रमाणे ई. क्यू आणि व्यवस्थापनकौशल्य या दोन्ही गुणांत चांगला असा पक्षच भारतात नसल्यामुळे भारतात स्थिर सरकार ही गोष्ट का अशक्य आहे हे लक्षात येतं.

पु.ल.देशपांडे हे मराठी साहित्यातलं इतकं मोठं नाव होतं की, सुनीताबाई देशपांड्यांनी ‘आहे मनोहर तरी’ लिहिणं हेच धाडसाचं होतं. बायकोनीच लिहिल्यामुळे त्यातल्या घटनांच्या अचूकतेबद्दल प्रश्नच नाही. शिवाय ते लिहिलंय् पण फार छान. त्या सबंध पुस्तकाचं मानसशास्त्रीय भाषेत वर्णन करायचं तर ते ‘समाजाच्या जाणीवांविषयी खूप हाय ईक्यू असलेल्या उत्तुंग व्यक्तिमत्त्वाचं कौटुंबिक पातळीवरचं ‘लो ईक्यू’चं रूप असं करायला हवं.

आजाऱ्याला भेटायला जाण्याचा एक उपचार आहे हे मला माहिती आहे. मी आजारी होतो तेव्हाचं आठवून बघितलं, शोभा आजारी असताना भेटायला आलेली माणसं आठवून बघितली. इतर अनेकांचे अनुभव विचारले. आजारी असताना भेटायला येणाऱ्या माणसांपैकी जी माणसं आल्यामुळे आजाऱ्याला

आनंद झाला, मनाला आणि शरीराला आराम वाटला अशांची संख्या कमी असते, उपद्रवच जास्त होतो. त्यांची सरबराई, थोडं का होईना बोलणं, याचा आजारी माणसाला आणि शुश्रुषा करणाऱ्याला त्रास वाटायला लागतो. माझं असं मत बनलंय् की, फार जवळचे संबंध असणाऱ्यांनीच फक्त आजाऱ्याला भेटायला जावं. बाकीच्यांनी जाऊ नये.

आजारपणात 'काही लागलं तर कळवा, मदत मागा,' असं सांगणारेही बरेच असतात पण तेवढं पुरत नाही. अगदी जवळचे लोक 5 संख्येच्या वर नसतात. त्यांची मदत आजारी माणूस लागली तर मागेल. बाकीच्यांकडे तो आपणहून मदत मागणार नाही हे नक्की आहे. आपणहून फोन करून 'मी आत्ता अमुक घेऊन येतोय/येतेय, आत्ता सोयीची वेळ आहे ना?' असं विचारलं तर होकार येईल हे कळणारे फार कमी असतात. हा जवळचे पाच लोक असा जो उल्लेख आहे त्याचं मानसशास्त्रीय स्पष्टीकरण इतर एक-दोन प्रकरणांत सापडेल.

आता दुसरी एक गोष्ट. आसपासचे भरपूर लोक दोन चाकी किंवा चार चाकी वाहनाचं ड्रायव्हिंग करताना काय विचार करतात, कसा विचार करतात आणि कसं ड्रायव्हिंग करतात हे सगळं ईक्यूचंच रूप आहे. आपण कल्पना करूया की निर्मनुष्य रस्त्यावर एकच वाहन एकच माणूस चालवतो आहे. अर्थातच दुसऱ्या कोणाचा विचार करण्याची जरूरच नाही. पण दुसरं वाहन रस्त्यावर आलं रे आलं की त्या वाहनाबरोबर अपघात होऊ नये, त्या वाहनाची आपल्यामुळे गैरसोय होऊ नये यासाठी सगळे संकेत आणि सगळे नियम हे पाळायलाच पाहिजेत. ड्रायव्हिंगच्याच भाषेत सांगतो, आपण उजवीकडे वळणार, डावीकडे वळणार, मागे जाणार, थांबणार या सगळ्या गोष्टी आसपासच्या वाहनांना कळाव्यात, अशा या सगळ्या योजना म्हणजे इक्यूचंच रूप आहे. एरवीच्या वागण्यात ज्या माणसाचा ईक्यू चांगला आहे तो माणूस सुरक्षित आणि चांगलं ड्रायव्हिंग या वाटेवर साधारणपणे जातो. जी वाहनं आपण आसपास सध्या रस्त्यावर बघतो, डावीकडून जाणारी, पुढे घुसणारी, सिग्नल तोडणारी, झेब्रा क्रॉसिंगवर जाऊन उभी राहणारी– अशा प्रत्येक वाहनाचा, प्रत्येक ड्रायव्हरचा माझ्या दृष्टिकोनातून ईक्यू हाच प्रश्न आहे.

प्रत्यक्षात वाहन चालवताना अपघात तर होऊ द्यायचा नाहीच. दुसऱ्याचा घोटाळा होऊ द्यायचा नाही आणि मुख्य म्हणजे दुसऱ्याला काळजीतही टाकायचं नाही. आपण गाडी चालवत असताना कोणीतरी दुचाकी चालवणारा डावीकडून

झप्पदिशी येऊन आपल्या गाडीसमोरून एक फुटावरून उजवीकडे जातो तेव्हा कसं वाटतं? प्रत्यक्ष अपघात न होताही अपघात होईल या भीतीनी आपल्या हृदयाचा ठोका चुकतो. हे सगळे पुढे घुसणारे लोक काही महत्त्वाचं काम खरोखर करतात का, असं बघायला गेलं तर बहुतेक वेळेला त्यांना भयंकर घाईनी नुसतं चकाट्या पिटायला कुठेतरी जायचं असतं. त्या लोकांना हे कबूल नसेल, पण खरी गोष्ट अशी असते की, ते घरून वेळेवर निघालेले नसतात आणि आता रस्त्यावर आल्यानंतर वेळ वाचवायला बघत असतात.

असे लोक बसच्या रांगेत, दुकानाच्या रांगेत पुढे घुसत असतात आणि असं करणारे सगळे लोक अगदी अभिमानानी सांगतात की सतत पुढे घुसलं पाहिजे, स्मार्ट बनलं पाहिजे. माझ्या दृष्टिकोनातून यांचा ईक्यू म्हणजेच नागरिकशास्त्राचा अभ्यास कच्चा राहिला आहे. मी कल्पना करू शकतो त्याप्रमाणे यांचं वैवाहिक, कौटुंबिक आयुष्य हा सुद्धा मला काळजीचाच विषय वाटतो.



# 4) समुपदेशनातले अनुभव

समुपदेशनासाठी येणाऱ्या काही लोकांचा त्यांनी सांगितलेला प्रश्न घेऊन समुपदेशनाला सुरुवात होते. त्यानंतर हळूहळू स्वभावातले कंगोरे एक एक करून समोर यायला लागतात. सुरुवातीला कळलेल्या प्रश्नापेक्षा निराळेच प्रश्न समोर यायला लागतात. अशा प्रश्नांच्यात 'लो ई. क्यू.' ही अडचण कधी कधी मुख्य प्रश्न बनलेली मला दिसते. बहुतेक वेळा ती व्यक्ती स्वतः तसं म्हणत नाही. पण वागणुकीतून ते मला जाणवायला लागतं.

स्वतः ठरलेल्या वेळेपेक्षा खूप उशिरा यायचं आणि तरी माफीचा शब्द काढायचा नाही. मला वेळ नसताना मी एखाद्या व्यक्तीला अडचण असते म्हणून कसाबसा वेळ काढलेला असतो. याबद्दल काही पर्वा न करता काहीतरी बोलत राहायचं आणि वेळ काढायचा असे लोक खूप वाढलेयत्. अशा लोकांचा 'लो ईक्यू' हा प्रश्न नक्की असणार. त्या दृष्टीनी मग मी प्रश्नाचा शोध घ्यायला सुरुवात करतो.

माझं स्वतःचं असं निरीक्षण आहे की, प्रत्येक माणूस दुसऱ्यानी आपल्याला काय हाक मारावी याबद्दल विचार करत असतो. ए आणि अहो याबद्दल माणसं संवेदनशील असतातच, शिवाय इतरही संबोधनांबद्दल असतात. त्या माणसाचा आत्मसन्मान त्यावर अवलंबून असतो. जीवनसाथच्या कधी कधी दोन-चार दिवसांच्या मोठ्या कार्यशाळा असतात. 15-20 लोकं आणि सारखी भेटणारी, कार्यक्रमात, जेवताना एकत्र असणारी अशी ही लोकं असतात. एकमेकांना कुठल्यातरी नावानी हाक मारावीच लागते. चुकीची हाक मारल्यामुळे माणूस दुखावू शकतं हे लक्षात घेऊन अगदी सुरुवातीलाच मी सगळ्यांना विचारून टाकतो की, इतरांनी तुम्हाला काय हाक मारावी अशी तुमची इच्छा आहे, ए, अहो हेही स्पष्ट करा. ते जे सांगतील ते नोंदवतो आणि सगळ्यांना सांगतो की, ही गोष्ट कटाक्षानी पाळायची आहे. हे सांगायचं कारण दुसऱ्याचं मन सांभाळण्याच्या मोठ्या प्रक्रियेमधली ही छोटी पण महत्त्वाची सुरुवात असते. अशा गटाला आम्ही सांगतो की, मला अहो अनिलदादा आणि शोभाला अहो शोभाताई म्हटलेलं आवडतं. मग लोक ते पाळतात. आपल्या रोजच्या आयुष्यातही

दुसऱ्याचं मन सांभाळण्यासाठी असं करणं आवश्यक आहे. त्यामुळे तुमचा भावनिक गुणांक समोरच्याला स्पष्ट होतो. कोणाला काय हाक मारायची हे नीट विचार करूनच ठरवावं लागतं.

भावनिक गुणांकाच्या कार्यशाळेत घेण्यायोगा एक उपयोगी खेळ आहे तो सांगतो. हा खेळ साधारण कार्यशाळेच्या मध्यावर घ्यावा. म्हणजे विषय सगळ्यांना कळलेला असतो. त्याशिवाय साधारण मध्यंतरामधे उपस्थिती जास्तीतजास्त असते. उशिरा येणारे आणि लवकर जाणारे सगळे तेव्हा सापडतात. आता खेळ सांगतो, वेळेच्या उपलब्धतेप्रमाणे काही लोकांनी आळीपाळीनी पुढाकार घ्यावा. जो प्रथम पुढाकार घेईल त्यानी शब्द न बोलता चेहऱ्यावरच्या हावभावांनी, हातवाऱ्यांनी एखादी भावना व्यक्त करायची. इतरांनी ती ओळखायचा प्रयत्न करायचा, शब्दात वर्णन करायचं. शेवटी पुढाकार घेणाऱ्यांनी त्याच्या काय भावना होत्या ते सांगायचं.



## 5) शोभा आणि मी यांचं उदाहरण

ई.क्यू. या एका विषयात शोभाचं आणि माझं उदाहरण देणं हे मला सर्वांत योग्य वाटतं. माझे पूर्वज पाच पिढ्यांपूर्वी शहरात आले आणि मूळ गावाकडे म्हणजे चिपळूणजवळच्या एका गावाकडे दीडशे वर्षांत कुणी फिरकलं नाही. हीच गोष्ट शोभाची सांगायची झाली तर शोभाचे आई-वडील हीच मुळात खेड्यातून शहराकडे आलेली पहिली पिढी. त्यामुळे कुटुंबासाठी करणं, नातेवाईकांसाठी करणं, गावच्या लोकांसाठी करणं या सगळ्या बाबतींत या आनुवंशिक गुणामुळे शोभाचा 'इक्यू' सरळसरळ माझ्यापेक्षा जास्त होता. आम्ही जेव्हा एकमेकांशी लग्न केलं त्यावेळेला हा विचार इतक्या स्पष्ट शब्दात आम्ही केलेला नव्हता.

एवढ्या पिढ्यांच्या शहरी संस्कारांमुळे मी इक्यूच्या बाबतीत बऱ्यापैकी बिघडलेला होतो. लग्नानंतर सुरुवातीच्या काही वर्षांमधे आमच्यामधे जे काही मतभेद होते त्यापैकी काहींचा संबंध 'इक्यू लेव्हल'चा होता हे आता मी खात्रीनी सांगू शकतो. शहरी माणूस प्रायव्हेट लिमिटेड कंपनी काढून बसलेला असतो. त्याचं घर म्हणजे 'प्रायव्हेट' आणि अगदी जवळची माणसं 'लिमिटेड'. आयुष्याकडे बघण्याचा दृष्टिकोनही अगदी लिमिटेड. या अर्थानी सहज शंभर-दोनशे प्रायव्हेट लिमिटेड कंपन्यांची उदाहरणं आम्हाला आसपास दिसतात. याउलट शोभाच्या दृष्टीनी घर म्हणजे बाहेरगावच्या पाहुण्यांची सारखी ये-जा, न कळवता येणारे बरेच पाहुणे, नातेवाईकांच्या आते-मामे-चुलत भावंडांसकट भरपूर खेपा असं सगळं निराळं कौटुंबिक चित्र होतं. मगाशी मी सांगितल्याप्रमाणे स्वतःचा विचार आणि दुसऱ्याचा विचार यांपैकी शोभा मुख्यतः दुसऱ्याचा विचार करणारी होती आणि मी मुख्यतः स्वतःचा विचार करणारा होतो.

मी मॅनेजमेंट सायन्स शिकलेला असल्यामुळे 'थिअरी' तर स्पष्ट शब्दांत माहिती होती. स्वतःचा विचार तर कोणालाच चुकत नाही. पण त्या असलेल्या एका क्षणात तुम्ही दुसऱ्याचाही विचार करू शकलात तर योग्य आणि चांगला निर्णय होतो. शोभाचं आणि माझं बरोब्बर उलट होतं. शोभानी कसलाही मॅनेजमेंटचा कोर्स केला नव्हता पण तिला उपजत बुद्धीनी दुसऱ्याचा विचार करण्याची सवय होती. त्यात दुसऱ्यामधे माझाही समावेश असल्यामुळे आणि

आम्ही सुरुवातीची काही वर्षं परदेशात असल्यामुळे शोभा माझ्या वाट्याला पुरेशा प्रमाणात येत असे. सोमवार ते शुक्रवार काम, आणि शनिवार, रविवार सुट्टी असायची. फिलाडेल्फियात असेपर्यंत याबद्दल प्रश्न समोर आलाच नाही.

माझी बारीकशी तक्रार शोभाविषयी असायची, परदेशात दोघंच्या दोघं असूनसुद्धा शोभाला स्वतः नीटनेटकं राहाण्याची पुरेशी समज नव्हती. याविषयी आमचं बऱ्याच वेळा बोलणं व्हायचं. रवींद्रनाथ टागोर, कृष्णमूर्ती अशा सगळ्या तत्त्वज्ञ लोकांविषयी पण चर्चा चालायची. तत्त्वज्ञानाच्या अभ्यासात एक खूप महत्त्वाचा मुद्दा असतो. तो म्हणजे 'असणं आणि दिसणं'. माणसानी चांगलं असायला हवं याबद्दल वादच नाही, पण चांगलं दिसायलाही हवं. काही लोक असण्याला जास्त महत्त्व देतात आणि दिसण्याला कमी महत्त्व देतात. काही दोन्हींना सारखं महत्त्व देतात तर तिसरा गट दिसण्याला जास्त आणि असण्याला कमी महत्त्व देतो. शोभा आणि मी उघडउघड दोन निराळ्या गटांचे होतो. शोभाच्या मते असण्याला जास्त महत्त्व होतं. माझ्या दृष्टीनी दोन्ही सारखं महत्त्वाचं होतं. कृष्णमूर्ती अविवाहित होते पण माझ्या गटातले होते. रविंद्रनाथ टागोर विवाहित होते आणि माझ्या गटातले होते. या दोघांचाही असणं आणि दिसणं याबद्दल कटाक्ष असायचा.

आमच्यातला हा मतभेद अजूनही संपलेला नाही, पण त्याबद्दलची संवेदनशीलता कमी झाली आणि मी शेवटी ईक्यू शब्द न वापरता असं म्हणायचो की, तुला स्वतःला काहीही वाटलं तरी मला त्याचं महत्त्व आहे म्हणून तू ते करावंस. शोभाच्या आणि माझ्या मतभेदांपैकी आणखी एक गोष्ट होती ती म्हणजे तिचं रात्री लवकर झोपून जाणं. माझ्या मते नवऱ्याविषयी पुरेशी कदर नसण्याचाच हा भाग आहे.

एरवी 'हाय ई.क्यू.' असलेली व्यक्ती काही बाबतींत म्हणजे जोडीदाराच्या नजरेला आपण कसे दिसत असू या बाबतीत काहीच विचार करू शकत नाही ही आश्चर्याची गोष्ट आहे. अगदी जांभई देताना तोंडावर हात न धरण्यानी समोरच्या व्यक्तीच्या भावनांची हिंसा होते हे जसं 'हाय ई.क्यू.' असलेल्या माणसाला समजलंच पाहिजे तसंच जे जे असुंदर ते टाळण्याचा त्या व्यक्तीनी प्रयत्न केलाच पाहिजे. उदाहरणार्थ, मी अगदी रात्री झोपताना कवळी काढतो. तोपर्यंत कवळी काढून वावरणंदेखील असुंदर आहे त्यामुळे ती हिंसाच आहे.

शोभाचा भावनांक उपजतच जास्त आहे हे मला माहिती आहे. मी माझ्या

भावनांकामधे सुधारणा करण्याच्या मागे आहे. थोडक्यात या एका समाईक गोष्टीमुळे आणि दोघांमधल्या इतर अनेक गुणांमुळे आमचं जुळलं.

इंग्लंडला असताना माझ्या बहिणीनी पाठवलेल्या पत्राबद्दल मागे मी बोललो होतो. ते पत्र घाईत खरडलं होतं याचा अर्थ माझ्या दृष्टीनी ती माझ्याविषयीची बेपर्वाई होती. तेव्हा मला भावनांक हा शब्दही माहीत नव्हता पण बहिणीबद्दलचा माझा आक्षेप तोच होता. मी जेव्हा त्या पत्राबद्दल उघड बोललो तेव्हा शोभाचा मोठा भाऊ सुरेश तिथेच होता. त्याला वाटलं, मी असं बहिणीबद्दल बोलतो म्हणजे माझा भावनांक कमी आहे.

प्रत्यक्षात मी दुसऱ्याचा विचार करतोच. माझी ते व्यक्त करण्याची पद्धत सर्वमान्य पद्धतीपेक्षा निराळी असते. मला इतरांची पर्वा नसती तर मी ग्रीनकार्ड होल्डर असताना अमेरिकेतून भारतात आलो असतो का? जीवनसाथसारखं काम चालू केलं असतं का? जनमानस ट्रस्ट आग्रहानी सुरू केला असता का? त्यात एवढा वेळ घालवला असता का? पालक-शिक्षणाचं काम एवढ्या हौसेनी केलं असतं का? इंग्लिश संभाषण शिकवण्याचे वर्ग घेतले असते का?

मगाशी म्हटल्याप्रमाणे भारतात कायम वास्तव्यासाठी परत येईपर्यंत नातेवाईक हा प्रश्न आमच्या 'ईक्यू फाईट'मधे कधी नव्हता आणि माझ्या वागण्यात अनेक चुका असूनदेखील शोभाच्या ईक्यूमुळे आमचं जमत होतं. पुढे मुलांचा जन्म झाला. माझ्या व्यवसायाला सुरुवात झाली. काही काही क्लायंट्सबरोबर जुळायचं तर काहींच्याबरोबर माझं नाही जुळायचं. हे पूर्वीचं सगळं आठवताना आत्ता मी खात्रीशीर सांगू शकतो की, माझ्याकडे प्रत्यक्ष कामाच्या ज्ञानाची कधीच उणीव नव्हती पण क्लायंटशी वागायचं कसं याच्या ज्ञानाची उणीव होती.

अगदी थोडक्यात स्पष्ट सांगतो, प्रत्यक्ष तांत्रिक ज्ञान किंचित कमी असलं तरी व्यवसायामधे एकवेळ चालेल पण वागणुकीचं ज्ञान हा व्यवसायाचा प्राण आहे. डॅनियल गोल्मननी हे अनेक उदाहरणांसकट अगदी स्पष्ट मांडलेलं आहे की नुसता हुशार माणूस असेल पण त्याला वागणुकीची समज नसेल तर लोक लांबून त्याचा आदर करतील पण त्याच्या जवळ जाणार नाहीत. नुसतं चांगलं वागणारा माणूस असेल तर तो तांत्रिक ज्ञान असलेल्या माणसाला कामालादेखील ठेवू शकतो. पण खरी यशस्वी जी माणसं असतात त्यांच्याकडे आय. क्यू. आणि ई. क्यू. हे दोन्ही गुण लागतात. अनेक थोर थोर शास्त्रज्ञांची डॅनियल गोल्मननी उदाहरणं दिलेली आहेत. ती त्यांच्या प्रयोगशाळेतल्या कामात कुशाग्र बुद्धीची,

विद्वान म्हणून लौकिक मिळवलेली पण कौटुंबिक आयुष्यात पूर्ण गाळात होती. अशा लोकांचं साध्या भाषेतलं वर्णन 'हुशार पण शहाणा नाही' असं करतात. साहजिकच असा माणूस समाधानी होऊ शकत नाही कारण त्याचा आयुष्याचा तोल बिघडलेला असतो.

पुन्हा शोभाचं आणि माझं उदाहरण चालू करतो. ज्या सुरुवातीच्या काळाचं मी वर्णन करतो आहे त्यात माझी अशी तक्रार असायची की शोभा मुलांकडे लक्ष देते, इतर सगळ्यांकडे लक्ष देते पण नवऱ्याकडे कमी लक्ष देते. या सगळ्याबद्दलची मानसशास्त्रीय भूमिका थोडक्यात वर्णन करतो. प्रत्येक माणसाची स्वतः सोडून दुसऱ्या सगळ्यांवर प्रेम करण्याची काही क्षमता असते. ती कमी-जास्त असते हे खरंच पण जास्तीत जास्त क्षमतेचा हा विषय समजावून सांगण्यापुरतं त्याला एक किलो प्रेम असं म्हणूया. नवरा, मुलं, समाज, कष्टकरी सगळ्यांसाठी मिळून एका किलोचं वाटप करायला लागतं. मला जर शोभाच्या नेमक्या हाय इक्यू या गुणाबद्दल तेव्हा नीट समज असती तर मला हे समजलं असतं. माझ्याशी चांगलं वागण्यासाठी किंवा माझ्या आग्रहामुळे शोभा इतरांकडे दुर्लक्ष करू शकत नाही.

एवढ्या वर्षांनंतर काही प्रमाणात माझ्यात झालेल्या बदलामुळे मला ही गोष्ट आता जास्त चांगल्या प्रकारे समजते. गेल्या काही वर्षांच्या आयुष्यात तर शोभा गरवारे बालभवनचं संपूर्ण काम, मुलांच्या आणि नातवंडांच्या गरजांकडे लक्ष, अधिक चार निरनिराळ्या संस्थांची 'ट्रस्टी' म्हणून मनापासून काम करते. मला जेवढी तिच्या ई.क्यू.बद्दल समज असेल तेवढं तिला हे सगळं सांभाळणं सोपं जाईल हे मला आता कळतं. त्यामुळे कित्येक बारीक गोष्टींकडे मी निराळ्या पद्धतीनी बघायला लागलो. हाय ई.क्यू. असलेल्या व्यक्तीची दुसरी बाजूही अटळ आहे. तो म्हणजे भिडस्त स्वभाव. जगातल्या प्रत्येक ऑल प्लीझिंग पर्सनॅलिटीची पंचाइत होणारच. शोभा दुसऱ्याचा विचार आधी करणार आणि स्वतःकडे नंतर लक्ष देणार. ती जातिवंत खानदानी भिडस्त आहे. मी भिडस्त नाही त्यामुळे आमच्यामधे काही प्रमाणात आयुष्यभर फरक राहाणार. त्यात स्त्री-पुरुष हा फरक. प्रश्न येणारच आणि ते सोडवावे लागणार.

मी निरनिराळ्या प्रसंगी निरनिराळ्या वेळच्या लेखनात हा मुद्दा नेहमीच मांडत आलेलो आहे की, अशा सगळ्या दृष्टिकोनातून विवाह या गोष्टीचा अभ्यास केल्यामुळे स्वतःचा आणि कुटुंबाचा खूप फायदा होतो. पुन्हा थोडं शोभाबद्दल सांगतो. दुसऱ्याला सोयीचं होईल असं वागण्याचा सतत प्रयत्न,

दुसऱ्याची भावनिक भाषा बोलण्याचा प्रयत्न हा शोभाचा स्थायीभावच आहे.

शोभाच्या वहिनीची मातृभाषा उडिया आहे. त्यांच्यामधे बहिणीला आपण जसं ताई म्हणतो तसं देई म्हणतात. शोभाच्या वहिनीच्या मोठ्या बहिणीचा उल्लेख करताना वहिनीला चांगलं वाटावं म्हणून शोभा आवर्जून देई असा उल्लेख करते. दुसऱ्याला हा प्रयत्न व्यवस्थित समजतो आणि मुख्य म्हणजे शोभाचा यात स्वार्थ काहीच नसतो. तिचा तो सततचा स्वभाव आहे. क्वचित केव्हातरी असा मूळ स्वभाव नसलेली लोकं शोभासारखं वागण्याचाही प्रयत्न करतात, ते त्यांना जमत नाही कारण ते त्यांच्या मूळ स्वभावाच्या विरुद्ध असतं. शोभासारखी माणसं समोरच्याला काय आवडतं, काय केलेलं आवडतं हे लक्षात ठेवतात आणि त्या पद्धतीनी वागतात.

शोभासारख्या माणसांचं विश्लेषण असं की, ही माणसं स्वतःच्या गरजांसकट सर्व गोष्टींचा एकत्रित विचार करून स्वतःच असा निर्णय घेतात की दुसऱ्याच्या मर्जीप्रमाणे वागायचं. काही वेळा आमच्याकडे कोणीतरी जेवायला येणार असतं. मला शोभाची तब्येत आणि स्वभाव माहिती असल्यामुळे मी शक्यतोवर नको म्हणतो. मग बाहेरून एखादा पदार्थ आणूया का, असं सुचवतो. तेही अयोग्यच असतं त्यामुळे शोभा त्याला नकार देते आणि मी ते मान्य करतो. मला स्वयंपाक येत नसल्यामुळे शेवटी शोभा खूप मेहनत घेऊन खूप पदार्थ करते. मी थोडीशी मदत करतो कारण तेवढंच मला शक्य आहे. एवढा पदार्थ लागणार नाही असं मी सुचवतो पण तेही शोभाला जमत नाही. पदार्थ चविष्ट असतात, अनेक प्रकारचे असतात नि भरपूर असतात. ते हमखास उरतात आणि आम्ही ते दोन-तीन दिवस खातो. माझ्या मते भावनांक चांगला असण्याचे फायदे बरेच असतात. पण काही तोट्यांपैकी हा एक तोटा आहे.

मधे एकदा एका छोट्या गावी पूर्ण अनोळखी व्यक्तीच्या कार्यक्रमाला शोभाला बोलावलं आणि ती हो म्हणाली. त्या कार्यक्रमात खूप वेळ जाणार होता, खूप दगदग होणार होती, वेळ भलती असल्यामुळे रात्री परतायला उशीर होणार होता, कार्यक्रम असा होता की त्याबद्दल एक रुपयादेखील मिळणार नव्हता. पैशांना काही महत्त्व नव्हतं पण शोभाच्या तब्येतीला हे झेपणारंच नव्हतं. मी रात्री घरी थांबणार आणि जागरण करणार म्हणजे मलाही त्रास होणारच होता.

कार्यक्रमाच्या दोन दिवस आधी मला हे कळल्यावर मी शोभाला तो कार्यक्रम रद्द करायला सांगत होतो, पण ज्या जवळच्या ओळखीच्या व्यक्तीच्याऐवजी

शोभाला जावं लागणार होतं ते लक्षात घेऊन तिला नाही म्हणणं शक्य नव्हतं. ज्या लोकांनी हा कार्यक्रम आयोजित केला होता त्यांचा आय.क्यू. आणि ई.क्यू. कमी असावा अशी माझी खात्री आहे आणि शोभाचा ई.क्यू. हा तर नक्कीच प्रश्न आहे. ती नाही म्हणू शकत नाही. अपेक्षेप्रमाणे सगळ्या गोष्टी घडल्या. शोभाला आणि मला भरपूर त्रास झाला.

शोभा गरवारे बालभवनची डायरेक्टर आहे हे तुम्हाला माहितीच आहे. बालभवनमधे अनेक कार्यक्रम असतात आणि निरनिराळी, राजकीय वर्तुळात वावरणारी लोकंही बालभवनमधे येतात. प्रत्यक्षात खाजगी संसारात शोभाच्या आणि माझ्या एवढ्या वर्षांच्या वैवाहिक आयुष्यात कसलेही पारंपरिक रीतिरिवाज आम्ही घरात पाळत नसूनही त्या येणाऱ्या पाहुण्यांना तसं लागतं म्हणून शोभा त्यांना शाल आणि श्रीफळ समारंभानी देते. खाजगीत तिचं आणि माझं बोलणं होतं. या गोष्टी निरर्थक आहेत, मी जशा सोडून देऊ शकलो तसा तूही प्रयत्न कर, असं मी तिला म्हणतो. मला असं वाटत नाही की हे शोभाला कधी जमेल. त्या लोकांना जे चांगलं वाटतं ते करण्याची धडपड हे तिच्या स्वभावाचं वर्णन आहे. प्रत्यक्षात मी पण सार्वजनिक समारंभांच्यात जातो, कार्यशाळांना जातो, त्या त्या कार्यक्रमाचा प्रमुख माणूस म्हणून खुर्चीवर बसलेलो असतो पण अशा सर्व निरर्थक, कृत्रिम गोष्टी मी माझ्या आयुष्यातून ठामपणी काढून टाकल्या आहेत कारण तो माझा स्वभाव आहे. याचाही संबंध इक्यूमधल्या फरकातच आहे. गरवारे बालभवनचा मी डायरेक्टर असतो तर मी यातलं काहीही केलं नसतं.

हाय ई. क्यू. म्हणजेच उच्च भावनांक असणाऱ्या माणसांना दुसऱ्याच्या नजरेतून बघता येण्याचं कसब जास्त असतं. त्यामुळे ती लोकं व्यावसायिक म्हणून, दुकानदार म्हणून, वक्ता म्हणून, समुपदेशक म्हणून जास्त परिणामकारक ठरतात. शोभा हे याचं सरळसरळ उदाहरण आहे.

बालभवनचा वाढदिवस हा संस्थेचं भविष्य, संस्थेपुढचे प्रश्न, काम करणाऱ्यांचा, पालकांचा विचार करून साजरा करावाच लागतो. माझ्या दृष्टीनी वाढदिवस या कल्पनेत काही अर्थ नाही. आमच्या घरात शोभाचा आणि माझा वाढदिवस, लग्नाचा वाढदिवस साजरे करणं दूरच, उल्लेखदेखील होत नाही.

आता जरा माझ्याविषयी सांगतो, मुळात माझा ईक्यू पूर्वी सांगितल्याप्रमाणे अनेक कारणांमुळे शोभापेक्षा कमी पातळीवरचा आहे. पण तीन निरनिराळ्या गोष्टींनी माणूस शिकत जातो. एक म्हणजे लग्न, त्याला व्यक्तिमत्त्व विकासातली

एक महत्त्वाची पायरी मानतात. लग्न केल्या दिवसापासून दुसऱ्याविषयी म्हणजे नवऱ्याविषयी किंवा बायकोविषयी विचार करायलाच लागतो. हे ज्यांना समजत नाही त्यांचा संसार नीरस व्हायला सुरुवात होते.

या विषयातला पुढचा गुरू म्हणजे मुलं. मुलं आपल्याला काय काय शिकवतात ती यादी संपणारच नाही. पण सर्वांत काही महत्त्वाची गोष्ट असेल तर ती म्हणजे ईक्यूची शिकवणी. एकदा आभा म्हणाली की, काहीतरी कारणानी तिचा धाकटा मुलगा रात्री रडत बसला होता. काही दुखत वगैरे नव्हतं, पण कशाचं तरी त्याला वाईट वाटत होतं आणि कारण तो सांगू शकत नव्हता. नातू काही वेळानी नीट झोपला, पण ते मला सकाळी कळलं. मला मात्र पुढच्या रात्री नीट झोप लागली नाही.

आणि तिसरा मोठा गुरू म्हणजे स्वतःचा व्यवसाय किंवा जबाबदारीच्या पदावरची नोकरी. मगाशी मी कन्स्ट्रक्शन मॅनेजमेंट प्रॅक्टिसबद्दल उल्लेख केलेलाच आहे. त्यातली एकच गोष्ट सांगतो की, सबंध प्रॉजेक्टमधल्या प्रत्येक गोष्टीशी, वस्तूशी आणि माणसांशी प्रॉजेक्ट मॅनेजरचा संबंध असतोच. त्यामुळे प्रत्येक माणसाचा आणि प्रत्येक वस्तूमागचा माणसाचा विचार करावाच लागतो. याच्याशी माझा संबंध नाही असं कधीही म्हणता येत नाही.

जसं मी म्हटलं की, शोभा तिच्या स्वभावामुळे आणि हाय ई.क्यू.मुळे दुसऱ्याला जे महत्त्वाचं आहे असं तिला वाटतं तसं वागते. माझा स्वभाव, माझा व्यवसायाचा प्रकार आणि इ.क्यू.ची मूळ पातळी यामुळे मी तसं करत नाही. मी माझी भाषा बोलतो. तेच मला योग्य वाटतं.

मधे जवळजवळ 15 वर्षं मी बिल्डर बिझनेस केला. कमी पैशात मोठा प्लॉट मिळवणं आणि प्लॉटचे आणि बाकीचे पैसे बाजारभावाप्रमाणे पण नंतरच्या टप्प्यात फ्लॅट्स् विकल्यानंतर देऊ असा करार करणं ही जबाबदारी माझ्याकडे असायची. त्यानंतर प्रत्यक्ष फ्लॅटस् बांधत असताना त्यांची विक्री करायची असं विक्रेत्याचं कामसुद्धा माझ्याकडे होतं. विक्री करण्याचं किंवा मार्केटिंगचं काम म्हणजे निम्मा भाग खोटा बोलायचा असं बाजारातलं चित्र तेव्हाही होतं आणि आत्ताही आहे.

माझ्याबरोबर काम करणारी इतर लोक प्रत्यक्ष बांधकामाची जबाबदारी, पुणे मनपाकडून परवानग्या मिळवण्याची जबाबदारी, ड्रॉईंग आणि एस्टिमेटस् अशी कामं करायचे. मी खरं फायनान्स मॅनेजमेंटचं शिक्षण घेतलेलं नाही. माझ्या

कन्स्ट्रक्शन मॅनेजमेंटच्या शिक्षणात अगदी छोटासा भाग तो होता. त्या छोट्याशा भागामधे एवढं मी शिकलेलो होतो की दुसऱ्याला कमीत कमी पैसे उशिरात उशिरा द्यायचे आणि आपल्याला मिळणारे पैसे मोठ्यात मोठ्या रकमेचे आणि लवकरात लवकर मिळवायचे. हे सगळं मॅनेज करणं आणि तरी खरं बोलून म्हणजे 'फायनान्स मॅनेजमेंट,' एवढं मला कळलं होतं आणि पटलं होतं.

इथल्या भारतातल्या वातावरणाप्रमाणे कमी किमतीत जमिनी मिळवायला आणि शक्य तेवढ्या जास्त किमतीत फ्लॅटस् विकायला मी अगदी नालायक होतो, कारण खरं बोलण्याबाबत माझा आग्रह होता. माझ्या बरोबरच्यांनी देखील मी म्हणतो तशा पद्धतीनी एखाद-दुसरी स्कीम करून बघू असा दृष्टिकोन ठेवला होता. प्रत्यक्षात असं झालं की, जमीन विकत घेताना जमिनीच्या मालकाला मी दोन्ही गोष्टी स्पष्ट सांगत असे. एक म्हणजे आम्ही एवढेच पैसे आत्ता देऊ शकतो आणि आमच्याकडे कुणीही पैसेवाला 'गॉडफादर' नाही. आम्ही मध्यमवर्गीय कुटुंबाच्यातले आणि मध्यमवर्गीय लोकांसाठी काम करणारे मध्यम ताकदीचे बिल्डर आहोत. माझ्या दृष्टिकोनातून बढाया, वल्गना यावर कायमच फुली होती. प्रत्यक्षात असं झालं की, बाजारातल्या अनेक फसव्या बिल्डरांच्या तुलनेत या खरं बोलणाऱ्या बिल्डरच्या हातामधे आपली जमीन देऊ असा लोकांचा निर्णय व्हायचा.

त्यावेळचे सगळे संवाद मला अजूनही आठवतात. त्यावेळेला इक्यू नावाचा शब्दसुद्धा मी ऐकला नव्हता. पण मी अशाप्रकारे त्यांच्याशी बोलायचो की तुमच्या दृष्टिकोनातून विचार केला तर आमच्या ताब्यात ही जमीन देण्यात असे काही फायदे आणि तोटे मला दिसतात. तुमच्या अडचणींना आपण दोघं मिळून उत्तर शोधू आणि आमच्या कंपनीच्या मर्यादांना पण उपाय शोधू. 'आपण मिळून' हा जो शब्दप्रयोग होता तो 'क्लिक' झाला आणि आम्हाला जमिनीमागोमाग जमिनी थोड्याशा पैशाच्या मोबदल्यात पुढच्या आश्वासनांच्या करारावर मिळायला सुरुवात झाली.

आता विचार केला तर वाटतं माझ्या वाढलेल्या इ.क्यू.चा तो परिणाम होता. कारण मी समोरच्या माणसाच्या दृष्टिकोनातून आमच्या कंपनीच्या क्षमता आणि मर्यादा यांच्याकडे बघू शकत होतो. यापुढे फ्लॅट्स् विकण्यासाठी नुसत्या कागदावरच्या ड्रॉइंगच्या आधारावर मी येणाऱ्या गिऱ्हाईकांना प्रत्यक्ष जमिनींवर गाडीमधून घेऊन जायला लागलो. जाताना आणि येताना त्या गिऱ्हाईकांशी मी

जे बोलत असे त्यात एकही गोष्ट कधी खोटी नव्हती. काही काही गोष्टींची उदाहरणं मला आठवताहेत. डेव्हलपमेंट प्लॅनमधे असा जवळून जाणारा साठ फुटी रस्ता दाखवलेला आहे. पण पुणे महानगरपालिकेचा कामांचा वेग लक्षात घेतला तर आमचं बांधकाम पुढच्या एक-दोन वर्षांत होईल, तुम्ही तिकडे राहायला जाऊ शकाल आणि त्यानंतर हा रस्ता 10 वर्षांनी होईल का 15 वर्षांनी हे खरं म्हणजे मी सांगू शकत नाही. ही जी बांधकामाची एक-दोन वर्षं मी म्हणतो आहे तीसुद्धा खरं म्हणजे होणाऱ्या बुकिंगवर अवलंबून आहेत, लवकर बुकिंग झालं तर लवकर पैशाची कमाई होईल आणि बांधकाम लवकर उरकता येईल. पण हा माझा अंदाज झाला, हा मी दिलेला शब्द समजता येणार नाही.

आपण प्रामाणिकपणे आणि खरेपणानी एखादी गोष्ट करणं जेवढं महत्त्वाचं आहे तेवढंच दुसऱ्याचा विश्वास संपादन करणं हे गरजेचं आहे. येणाऱ्या गिऱ्हाईकांपैकी निम्म्याच्या वर लोक मराठी मुंबईकर असायचे. त्यांचा आमच्या आडनावांवर आणि माझ्या बोलण्याच्या पद्धतीवर विश्वास बसायचा याला फार महत्त्व होतं.

गिऱ्हाईकांशी जे मी बोलायचो त्याच्यामधे ते सध्या कुठे राहतात, त्यांचा व्यवसाय काय प्रकारचा आहे, कुटुंब केवढं आहे या सगळ्याची चौकशी करून तुम्हाला अशा अशा ठिकाणचा, अमुक मजल्यावरचा फ्लॅट किंवा रो हाऊस असलं तर टोकाचा घेण्यात जास्त फायदा आहे असं मी सांगायचो. कित्येक वेळेला त्यांच्या वागण्या-बोलण्यावरून अंदाज करून मी असंही म्हणायचो की, मुळात तुमचा निर्णय हो असला पण बुकिंगचे पैसे तयार नाहीत एवढीच अडचण असली तर त्याला मार्ग काढता येईल हे लक्षात घेऊन निर्णय घ्या. ठिकाण किंवा बांधकामाचं वर्णन पसंत नसलं तर आमची दुसरी स्कीम मी तुम्हाला दाखवायला घेऊन जातो.

हा सगळा उद्योग जो मी करायचो त्याच्यामधे गाडीचा खर्च सोडला तर गिऱ्हाईकाबरोबर चहा पिणं याच्यापलीकडे मी आमच्या कंपनीचा काही खर्चसुद्धा केला नाही. मन वळवण्यासाठी जेवणावळी घालणं, दारू पाजणं या वाटेनी मी कधीही गेलो नाही. हे सगळं जे मी वागायचो त्याचं वर्णन आता मी नीट करू शकतो. ते ई.क्यू.चंच रूप होतं.

त्या काळात माझा प्रत्यक्ष लेबरशी संबंध यायचा नाही. माझं खरं शिक्षण लेबर सायकॉलॉजी म्हणजे लेबर मॅनेजमेंट याच्यात झालेलं असूनही मी तो

कामाचा विभाग निवडलेला नव्हता. दुसरा एक जण हे सगळं बघायचा, त्याच्याबद्दलच्या अडचणी घेऊन आमची गिऱ्हाईकं किंवा स्टाफ आणि लेबरसुद्धा माझ्याकडे यायचे. माझी वागण्याबोलण्याची पद्धत या लोकांना का पसंत होती याचं मला एकच महत्त्वाचं कारण दिसतं, मी केलेला ई.क्यू.चा वापर.

नंतर भाववाढीमुळे आमच्या या बिल्डरच्या बिझनेसमधे मोठ्या पैशाच्या अडचणी आल्या. पैशाची अडचण यापेक्षा कॅशफ्लोची अडचण निर्माण झाली. तात्पुरते वर्ष–दोन वर्षांपुरते पैसे उसने घ्यायला पाहिजेत आणि सगळी कामं लवकर पूर्ण करून यातून बाहेर पडायला पाहिजे असं लक्षात आलं. इतरांच्या तुलनेत माझा जनसंपर्क, अनुभव, शिक्षण सगळं जास्त होतं, त्यामुळे उसने पैसे मागायला कंपनीतर्फे मीच जायला पाहिजे असं आमच्या मीटिंगमधे ठरलं. या प्रश्नातून बाहेर आल्याशिवाय आणखीन नवीन जमिनी घ्यायच्या नाहीत असं पण ठरलं.

माझ्या ओळखीच्या लोकांकडे आणि मुंबई-पुण्याच्या नातेवाईकांकडे मागून साधारण सहा महिन्यांच्या काळात आवश्यक तेवढे सगळे पैसे मी व्याजानी जमा केले. या सर्व लोकांना जेव्हा मी भेटून कंपनीची अडचण सांगायचो तेव्हा मी तारण म्हणून काहीही ठेवू शकत नाही, तुमचा माझ्यावरचा विश्वास याच एका आधारावर तुम्ही काही रक्कम देऊ शकलात तर त्याबद्दल विचार करा, इतकं स्पष्ट सांगून ते पैसे व्याजानी मी जमा केले आणि त्यानंतर ते सगळे व्याजासकट फेडलेही. या सगळ्याचं कारण शोधलं तर मात्र एकच गोष्ट समोर येते ती म्हणजे माझा काही वर्षांत वाढलेला इ.क्यू. व्यवसाय हा आपला इ.क्यू. या विषयातला गुरू असतो हे जे मी म्हणालो होतो ते ह्या अर्थानी.

पुढे काही वर्षांनी मी बिल्डरचा धंदा थांबवायचा ठरवलं कारण बांधकाम व्यवस्थापन याचीच मला सर्वांत आवड आहे हे मला कळलं होतं. बिल्डर धंद्यात जसे निरनिराळी कामं सांभाळणारे लोक होते, तसं इथे कोणी नव्हतं. शब्दशः एकट्याचा हा सल्लागार व्यवसाय होता. दुसऱ्या कुठल्यातरी बांधकामाच्या प्रकल्पात प्रकल्पाचा आकार, अपेक्षित दर्जा आणि अपेक्षित वेळ हे लक्षात घेऊन माणसं कशी नेमावीत इथपासून माझा सल्ला चालू व्हायचा. ज्या मुख्य कॉन्ट्रॅक्टरचं ते काम असायचं त्याच्या दृष्टिकोनातून अमुक इतके टक्के नफा हेच फक्त महत्त्वाचं असायचं.

कधीकधी ते कॉन्ट्रॅक्टर, त्यांच्यापैकी एकजण किंवा अनेक भागीदार

माणसांच्या मुलाखती घेताना माझ्याबरोबर असायचे. प्राथमिक मुलाखतीनंतर मी त्या प्रत्येक माणसाला माझं 'व्यवस्थापनशास्त्र तुमच्यासाठी' हे पुस्तक भेट म्हणून द्यायचो आणि या पुस्तकात दिलेल्या सगळ्या व्यवस्थापन तत्त्वांविषयी तुम्हाला काय वाटतं आहे त्याविषयी बोलायला आपण पुन्हा भेटू आणि त्यानंतर एक-दोन दिवसांत निर्णय होईल, असं सांगायचो. ज्यांनी मला सल्लागार म्हणून नेमलेलं असायचं त्यांना एवढा वेळ घालवणं पसंत नसायचं. पण मी जास्तीच्या वेळेचे पैसे मागत नाहीय, हे कळल्यावर ते कबूल व्हायचे आणि त्यांच्यापैकी एखादा कोणीतरी असं करण्यामागचा उद्देश विचारायचा. मी त्यांना सांगायचो, पहिल्या भेटीमधे शिक्षण, आत्तापर्यंतचा कामाचा अनुभव, त्या विशिष्ट प्रकल्पाला लागणाऱ्या इंजिनिअरिंगचं ज्ञान एवढं मी तपासायचो. दुसऱ्या भेटीमधे जी गोष्ट मी तपासतो, त्याचं थोडक्यात वर्णन म्हणजे लोकांकडून काम करून घेण्यासाठी लागणारं कसब आणि ते कसब म्हणजे इ.क्यू.

ही जी दुसरी भेट असायची ती सगळ्या लोकांची एकत्र असायची. कधी कधी 5 जागांसाठी 50 लोकांचे अर्जदेखील असायचे. त्या 50 लोकांचा एकत्र ग्रुप इंटरव्ह्यू असायचा. त्यामधे कामगारांशी, बरोबरीच्या लोकांशी चांगली नाती कशी जपायची याबद्दल चर्चा असायची. काही काल्पनिक अडचणी मी सांगायचो नि हा प्रश्न कसा सोडवायचा ते विचारायचो. अशा मीटिंग्जमधे एकेकानी बोलण्याची फेरीही असायची, ज्याला इच्छा असेल त्यानी आपणहून पुढाकार घेऊन वृत्तांत, निष्कर्ष सांगणं असंही चालायचं. त्या त्या माणसाविषयी एका बाजूनी माझी टिपणं लिहिणं चालू असायचं. ग्रुप मीटिंगनंतर माझी क्लायंटबरोबर मीटिंग होऊन 50 पैकी 5 माणसांची निवड व्हायची.

साधारण 50 वर्षांच्या माझ्या बांधकाम क्षेत्राच्या करिअरमधे मला कामगारांवर, सुपरवायझर्सवर ओरडताना कधीही कुणीही बघितलेलं नाही. माझ्या मते सबंध आयुष्यात एक साधा नियम पक्का आहे, आपण दुसऱ्याची कदर केली तरच दुसरा आपली करतो. लोकांची अशी समजूत असते, की दुसऱ्याचा विचार म्हणजे आपलं नुकसान. ही समजूत चुकीची आहे असं माझं पक्कं मत आहे आणि माझ्या सबंध करिअरमधे आणि व्यवस्थापनशास्त्राच्या पुस्तकात हे मी लोकांना पटवून देण्याचा प्रयत्न केला आहे.

चांगलं वागण्यासाठी प्रत्यक्ष खर्च फारच क्षुल्लक येतो. पण त्यापासून होणारा फायदा पैशात मोजला तर असं लक्षात येतं की, ही कल्पना व्यवहारातसुद्धा

फायदेशीर आहे. ज्या जलद बांधकामाचा तज्ज्ञ म्हणून मी व्यवसाय केला त्यामधे साधं गणित असं होतं. एरवी जेवढ्या वेळेत बांधकाम व्हायचं त्याच्या एक तृतियांश वेळेत बांधकाम होऊ शकतं आणि तेही कधीही आरडाओरडा न करता. प्रत्यक्ष खर्च एरवीच्या दहा ते पंधरा टक्के जास्त येतो ते मान्य असल्याचं करारामधेच लिहिलेलं असायचं. दोन तृतियांश वेळ वाचल्यामुळे वाचणारा मनस्ताप, काळजी, प्रत्यक्ष बांधकामाच्या मालकाचा वेळ याची किंमत रुपयात किती होते हे ज्यानी त्यानी ठरवायचं असायचं. ज्या लोकांना पटायचं की हे प्रकरण खूप फायदेशीर आहे तेच लोक असा 'कन्सल्टंट' नेमायचे. हे सगळं सांगण्याचा उद्देश एवढाच आहे की, सबंध प्रकल्पामधली सल्लागाराची ई.क्यू. सांभाळण्याची भूमिका ज्यांना कळू शकत नाही अशा अशिलांचा स्वतःचा ई.क्यू. बहुतेक कमी असला पाहिजे असं माझं मत आहे.

साधारण 7-8 वर्षांपूर्वी मी बांधकामाच्या साइटवर व्यवस्थापन सल्लागार म्हणून जाणं बंद केलं. एक तर मी वैवाहिक समुपदेशाच्या कामात खूप गुंतायला लागलो होतो आणि दुसरं म्हणजे मला बांधकामाच्या साइटवरचं काम शारीरिकरीत्या झेपलं नसतं. तरी मी एखाद्दुसरं काम मान्य केलं. कारण त्यांची कामावरची अडचण अशी होती की दुसरं कोणी ते काम करू शकलं नसतं. माझ्या व्यवस्थापनाच्या करिअरमधे मी प्रत्येक काम लेखी करार करूनच करायचो. म्हणजे मी करण्याच्या कामात किंवा मला मिळणाऱ्या मोबदल्यात कधीही गैरसमजूत असू नये. आत्ता मी म्हणतोय् त्या निवृत्तीनंतरच्या कामांसाठी मी लेखी करार केला नव्हता. मला अशा गोष्टीचं वाईट वाटलं की, त्यामुळे त्या लेखी करार नसण्याचा गैरफायदा घेणारेही लोक मला भेटले. योग्य तेवढे पैसे त्यांनी दिले नाहीत. मीही ते काम पैशांसाठी करत नव्हतोच. पण ज्याला मदत करायला जावं तोच आपला गैरफायदा घेतोय् ही गोष्ट मनाला मात्र लागली. एवढं होऊनसुद्धा यापुढे एखाद्याला अशी अडचण असली की जिथे माझीच गरज आहे तर मी ती मदत करीन. याचं कारण म्हणजे माझा वाढलेला भावनिक गुणांक.

अगदी असं धरून चालू की, दुसरा माणूस चुकीचं वागला किंवा बोलला, तर त्या माणसाला स्पष्टीकरणाची संधी देणं, पुन्हा समजावून सांगण्याइतका संयम ठेवणं हे मात्र थेट तुमच्या ई.क्यू.वर अवलंबून असतं. माझ्या तीन गुरुंमुळे मी ही गोष्ट सावकाश सावकाश पण निश्चितपणे शिकलो.

मी जे मगाशी माझे तीन गुरू सांगितले, म्हणजे बायको, मुलं आणि

व्यवसाय त्या तिघांनी मला व्यवस्थित तयार केलं. त्याचा पुढे उपयोग मला समुपदेशन करताना खूप होतो. मी बऱ्याच उशिरा विवाह-समुपदेशनाचं काम चालू केल्यामुळे मी त्याचं चरितार्थासाठीच्या व्यवसायात रूपांतर करायचं नाही असा निर्णय घेतला. जीवनसाथ हा मदत गट म्हणून डेव्हलप केला. साहजिकच निराळं ऑफिस, रिसेप्शनिस्ट अशा गोष्टी जीवनसाथला परवडत पण नाहीत आणि मला पटत पण नाहीत. वैयक्तिक समुपदेशनासाठी येणारे लोक घरी येतात आणि त्यांचं प्रमाणही खूप असतं. घरावर कधी तरी आक्रमण होतंच. या सगळ्या लोकांच्या बाबतीत दोन अडचणी आहेत. ते वेळा पाळत नाहीत त्यामुळे समुपदेशनाला येणारी एक व्यक्ती आणि दुसरी व्यक्ती यांची गाठसुद्धा पडू नये अशी जी मूळ कल्पना असते ती जमत नाही. असे दोन लोक एकाच वेळेला दिवाणखान्यात बसले तर आधी उशिरा आलेल्या व्यक्तीशी बोलणं आवरतं घ्यावं लागतं. म्हणजेच पुढची वेळ ठरवावी लागते आणि माझा दोनदा वेळ जातो. दुसऱ्या वेळेलाही तेच पुन्हा घडू शकतं.

येणाऱ्या लोकांबद्दलची दुसरी अडचण म्हणजे ते गृहपाठ करत नाहीत. इथे आल्यावर प्रत्यक्ष बोलतात आणि ते मला लिहून लागतं त्यामुळे ते लिहून देण्यासाठी आणि त्यातल्या शंका विचारण्यासाठी पुन्हा भेटतात. आधीपासून सांगितलेलं असून झेरॉक्स काढायचं विसरतात आणि झेरॉक्स आणून देण्यासाठी आणखीन पुन्हा भेटतात.

या सगळ्यामधे घरावर आक्रमण आणखीन आणखीन वाढत जातं. चार खोल्यांचं घर असल्यामुळे शोभा घरात असली तर ती आतल्या खोलीत जाऊन बसते पण कित्येक वेळेला अडकून बसते. या सगळ्या लोकांच्या वागणुकीबद्दल माझी भावना अशी असते की, त्यांची अडचण आहे म्हणून तर ते इकडे आलेले आहेत. त्यात त्यांना आणखीन माझ्या शिस्तीचा त्रास सोसायला नको. म्हणून मी मुळात कितीही आग्रही आणि कडक असलो तरी या सगळ्या गोष्टी अतिशय सौम्यपणे सांगतो. पूर्वी मी खूप कडक शब्दांत बोलल्याचं मला आठवतंय. व्यवसायात, मुलांशी, काही वेळेला शोभाशी. पण हा सगळा माझ्यात झालेला बदल म्हणजे माझा वाढलेला ई.क्यू.

दुसऱ्याला सोयीचं वाटेल असं वागण्याची माझी पण इच्छा आहे. पण माझी नकारांची यादी खूप मोठी आहे. तत्त्वज्ञान या विषयाचा अभ्यास करताना जशी जशी एक एक गोष्ट स्पष्ट होत जाते तसा वागणुकीतल्या प्रत्येक बारीक

बारीक गोष्टीपुढे च लागायला लागतो. म्हणजे अमुक गोष्ट करणारच आणि तमूक गोष्ट करणार नाहीच यांची यादीच मोठी होते. असा माणूस आसपासच्या लोकांना पेलेनासा होतो. कित्येक वेळेला नावडतासुद्धा होतो. त्यामुळे एक गोष्ट आत्मसात करावी लागते; स्वतःची सगळी च ची यादी सांभाळायची पण वागण्या – बोलण्यातलं मार्दव मुद्दामहून शिकून घ्यायचं. मला हे पूर्णपणे जमलं आहे असं मी अजून म्हणू शकत नाही.

माझ्या चौथ्या गुरूचा उल्लेख करायला राहिला. त्या गुरूनी म्हणजे जीवनसाथ विवाह अभ्यास मंडळानी मला खूप गोष्टी शिकवल्या. निरनिराळ्या वयाच्या काहीशे लोकांशी संबंध येणार, निरनिराळ्या भूमिकांच्यातून येणार त्यामुळे दिवसभर मी शिकवत असतो पण प्रत्यक्षात शिकत असतो. एक गमतीची गोष्ट सांगतो. चांगला शिक्षक कोण याची व्याख्या शिक्षणशास्त्रात अशी केली आहे की, जो सदैव शिकायला तयार तो म्हणजे चांगला शिक्षक.

आता मूळ मुद्दा. माझी सगळी 'च' ची यादी सांभाळून दुसऱ्याशी सौम्यपणी म्हणजेच ई.क्यू. सांभाळून वागताना कसरत पण खूप होते. मी तुम्हाला काही उदाहरणं सांगतो. मी एवढ्या निरनिराळ्या ठिकाणी स्टेजवरच्या कार्यक्रमांना जातो. शक्यतोवर मी आधी कळवून ठेवलेलं असतं की, कृत्रिम आणि निरर्थक अशी कुठचीही कर्मकांडं तुमच्या कार्यक्रमात असली तर मी त्यात भाग घेऊ शकणार नाही. हे मी कधी पत्रानी कळवतो तर कधी प्रत्यक्ष भेटीत तर कधी फोनवर.

प्रत्यक्ष कार्यक्रमाच्या प्रसंगात संयोजकांची भरपूर पंचाईत होऊ शकते कारण माझ्याखेरीज इतर व्यासपीठावरची सर्व मंडळी याप्रकारच्या कर्मकांडांच्या बाजूची असतात. खुद्द संयोजक त्याच बाजूचे असतात. ज्या गोष्टींना माझा नकार असतो ती यादी बऱ्यापैकी मोठी आहे, ती तुम्हाला सांगतो. मी दीपप्रज्ज्वलनाला नकार देतो, कुठच्याही दैवी शक्तीचं पूजन करायला नकार देतो, माझ्या दृष्टीनी नारळ, हार, शाल, पुष्पगुच्छ हे सगळं वर्ज्य असतं. हे सगळं आधी कळवताना माझ्या मनात 'च' पक्का असतो पण मी तो संदेश च चा वापर न करता देतो आणि वरती माफीही मागतो. तुमची गैरसोय होत असेल याची मला कल्पना आहे, पण जी गोष्ट मला पटत नाही ती मी न करणं हेच योग्य नाही का, असं त्यांना विचारतो.

फार कमी लोक अशा वागणुकीमागचं कारण विचारतात. लोकांना इतक्या

वरवरच्या गोष्टींची सवय असते की, काही लोक इतरांना परस्पर सांगतात की त्यांना फुलांची ॲलर्जी आहे, ते धुराच्या जवळ जात नाहीत. अगदी क्वचित पण बोलायला सुरुवात करण्यापूर्वी मी अशा नकारांचा उलगडाही केलेला आठवतो. या सगळ्यात पंचाईत अशी आहे की, त्या लोकांनी म्हणजे संयोजकांनी नकारांची यादी मोठी असलेला पहिलाच माणूस म्हणजे मी बघितलेला असतो. त्यामुळे काहींना माझ्याशी कसं वागायचं ह्याची धास्ती वाटायला लागते. मग सगळेच प्रश्न चालू होतात. जरा लांबचं ठिकाण असलं तर खाण्यापिण्याची सोय असते त्याबद्दल शंका असतात. असा विक्षिप्त माणूस चहा घेईल का, कॉफी घेईल का, खाण्याचा केलेला पदार्थ त्याला चालेल का, कार्यक्रम चालू करणं, संपवणं याच्या वेळेबद्दल तो कडक असेल का, या सगळ्याबद्दल त्यांच्या मनात शंका असतात.

ह्या वागणुकीच्या बाबतीत शोभाचं धोरण निराळं आहे हे मगाशीच मी तुम्हाला सांगितलं. काही कार्यक्रम आमच्या दोघांचे मिळून असतात. कार्यक्रमाच्या आधी माझ्याशी संवाद झालेला असला तर सोपं असतं कारण ह्या गोष्टी मी आधीच सांगतो, पण आधीचं बोलणं शोभाशी झालेलं असलं तर आयत्यावेळेचे अडचणीचे प्रसंग पूर्णपणे टाळता येत नाहीत. शोभानी खरं म्हणजे या गोष्टी आठवणीनी त्यांना सांगायला हव्यात. पण एरवी उच्च भावनिक गुणांक असूनही या बाबतीत शोभा दुर्लक्ष करते. माझी भूमिका तिला पूर्णपणे पटत नाही हे त्याचं कारण आहे. अशा ठिकाणी मी तिथे गेल्या गेल्या थोडक्यात या गोष्टी संयोजकांना समजावून सांगतो.

हे असंच सगळं भेटवस्तूंच्या बाबतीत होतं. बाजारातून आणलेलं, कधी स्वस्तातलं तर काही फार महागातलं असं काहीतरी समोर येतं. मग तेही त्यांना माफी मागून, समजावून द्यावं लागतं आणि ज्याला कुणाला विचारण्यात रस असेल अशा माणसाला या सगळ्याला अपवाद कसा केला जातो हे पण सांगावं लागतं. कोणी हातानी बनवलेली वस्तू असेल आणि सामानात सहज मावण्याजोगी असेल तर ती वस्तू तत्त्वतः मला चालेल पण घरापर्यंत धड न पोहोचणारी अशी नाजूक वस्तू असेल तर त्यालाही नकार द्यावा लागतो.

हे सगळं सविस्तर वर्णन मी तुम्हाला सांगतो आहे याचं कारणच असं आहे की, दुसऱ्याचं मन सांभाळलं तर आपल्या मनाविरुद्ध करावं लागतं आणि आपलं मन सांभाळलं तर दुसऱ्याचं मन दुखावलं जाण्याची शक्यता असते. हेही लक्षात

ठेवलं पाहिजे की फारच क्वचित दोघांच्या मनाजोगा मार्ग निघतो आणि त्यामुळे बहुतेक वेळेला आपल्या मनाजोगं वागायचं पण दुसऱ्याची आपल्याला कदर आहे हे त्याला कळण्यासाठी माफी मागायची, याला दुसरा पर्याय नसतो. या लेखाच्या अगदी सुरुवातीला आपण जे म्हटलं आहे तेच तुम्हाला एकदा सांगतो, दुसऱ्याच्या मनाप्रमाणे वागणं असा ई.क्यू.चा अर्थ नाही.

आणखी एक निराळा मुद्दा सांगतो. समोर अनोळखी लोक आणि त्यांच्याशी बोलणारे आपण स्टेजवर या परिस्थितीत खरा आवश्यक गुण म्हणजे लोकांच्या मनाचा विचार करता येणं. ती एक कलाच आहे. शोभाकडे ती बऱ्याच प्रमाणात आहे आणि माझ्याकडे निश्चित कमी आहे.

दुसरं एक उदाहरण सांगतो. वयानी मोठ्या माणसाला वाकून नमस्कार करावा असे बहुतेक कुटुंबांचे संस्कार सांगतात. माझ्याही लहानपणी हे सगळे प्रश्न येत असत. उघडउघड मोठा माणूस असेल तर निदान कोणी कोणाला नमस्कार करायचा हे स्पष्ट असतं. पण कधी कधी कोण मोठं हे न समजल्यामुळे आम्ही मुलं नमस्कार टाळायचो. त्यात पुन्हा इतरही भानगडी असायच्या. दोन निरनिराळ्या पिढ्यांची माणसं समोर असली की सर्वांत वयस्कर माणसाला आधी नमस्कार करायचा हा सुद्धा संकेत असायचा. त्याखेरीज संकेत असाही होता की, लहान मुलाला आपणहून हे लक्षात नाही आलं तर वेडंवाकडं बोलायचं किंवा मारायचं.

असं काही वर्षं चाललं. मनात तऱ्हेतऱ्हेचे प्रश्न यायला लागले होते. अगदी साधा पहिला प्रश्न असा असायचा की, मी नमस्कार करण्याची या माणसाची लायकी आहे का? ही खळबळ काही वर्षं चालली. अगदी नेमकं कशामुळे काय बदललं हे मला नाही आठवत, पण मी एस.एस.सी. झालो त्याच काळात आमच्या कुटुंबानी जागा बदलली. एस.एस.सी. झाल्यामुळे आणि जागा बदलल्यामुळे 'आपण आता मोठे झालोत' असं बहुधा माझ्या मनानी ठरवलं आणि मी बरीच मोठी नकारांची यादी स्पष्ट बोलायला लागलो. चांगला भाग असा की, त्यावरून घरात मारपीट झाली नाही. कित्येक वेळेला असं होतं की, आपल्या मनात असतं, आपण जे बोलू शकत नसतो, ते दुसरं कोणी बोललं तर आपल्याला उलट बरं वाटतं. तसं बहुतेक माझ्या आई-वडलांचं झालं असावं.

आई-वडील आणि आम्ही तीन भावंडं. मी मधला पण बंडखोर असं घरात सगळ्यांनी मान्य केलं. त्यामुळे माझा पुढचा प्रवास फार झपाट्यानी चालू झाला.

त्या सगळ्या प्रवासाला पुरोगामित्वाचा, आधुनिकतेचा, सत्यशोधनाचा असा कसलाही प्रवास म्हटलं तरी चालेल. पण तो चालू झाला हे फार महत्त्वाचं. तत्त्वज्ञानाच्या भाषेत आधुनिकतेची व्याख्या जी केली आहे ती मुद्दामहून इथे सांगतो. आधुनिकता याचा अर्थ प्रत्येक गोष्टीमधे सत्यशोधनाच्या प्रयत्नात असणं. ते सापडलं नाही तरी काही बिघडत नाही. पण त्या मार्गावर माणूस असला तर त्याला आधुनिक म्हणायचं. अर्थातच त्याचं आजच्या वागण्याचं वर्णन आणि काही वर्षांनंतरच्या वागण्याचं वर्णन दोन्ही आधुनिकच असेल पण निराळं असेल, कारण त्या प्रवासाच्या पुढच्या 'स्टेशन'वर तो माणूस पोहोचला असेल. आता जरा पुन्हा वाकून नमस्काराबद्दल बोलूया. एकदा वय हा एकच एक विचार त्याचा निकष न बनता लायकीविषयी विचार केला तर बऱ्याच प्रश्नांना सुरुवात होते.

खुद्द आमचे नातेवाईक आणि मित्रमंडळी यांच्यात मला लायकी नसलेली, पण वयानी मोठी असलेली माणसं बरीच दिसायला लागली. त्या काळात मी निरनिराळ्या पद्धतीनी नमस्कार करून बघितला. एक किंचित वाकण्याचा नमस्कार असतो म्हणजे साधारण जपानी नमस्कारासारखा पण हात पुढे करून. परंपरावादी हट्टी लोकांना तो काही चालायचा नाही. त्याच काळात योगायोगानी काही बंगाली लोकं संपर्कात आली. त्यांचा नमस्कार बघून आपली परिस्थिती खूप बरी आहे असं वाटायला लागलं. वडलांच्या मित्रमंडळींच्यात काही परदेशी लोक आमच्या घरी यायचे. ते याच्याविषयी मोकळेपणानी बोलायचे. त्याच्यातून कळलं की, पाश्चात्त्य जगात एवढं खाली वाकून नमस्कार हा प्रकारच नाही. हस्तांदोलन आणि सॅल्यूट हे दोनच प्रकार अस्तित्वात आहेत.

अभ्यास करत असताना गेली काही वर्षं मला असं दिसतं आहे की, कुठच्यातरी एका माणसाला असं वाटलं की, दुसऱ्या माणसाला नमस्कार करावा. अगदी वाकून, डोकं जमिनीला टेकवून, समोर पालथं झोपून, पायावर डोकं ठेवून, काय पाहिजे ते केलं तरी खरं म्हणजे मला आक्षेप घेण्याचं काही कारण नाही. ज्याला जे योग्य वाटतं ते त्यानं करावं असंच मानसशास्त्र शिकवतं आहे. त्याची जेव्हा अट बनते तेव्हा मात्र विवेकवाद त्याला आक्षेप घेतो. मी काही वयस्कर माणसांना असं बोलताना बघितलं आहे की, अमुक एका मुलावर किंवा मुलीवर चांगले संस्कार आहेत. प्रत्यक्षात माझ्यादेखत त्या मुलानी किंवा मुलीनी भेटल्याभेटल्या फक्त वाकून नमस्कार केला होता. त्यांची पूर्वी आणि त्यानंतर

गाठ पडलेली नव्हती किंवा त्या मुलांविषयी त्या व्यक्तीला इतर काहीही माहिती नव्हतं. फक्त वाकून नमस्कार करण्यावर समोरच्याचं संपूर्ण व्यक्तिमत्त्व जोखायचं हे विवेकवादाला अजिबात मान्य नाही.

खरं सांगायचं म्हणजे मला अशी कित्येक वयस्कर माणसं माहिती आहेत की, ज्यांना खूष करण्याचा साधा मार्ग म्हणजे त्यांना वाकून नमस्कार करणं. माझ्या दृष्टिकोनातून अनेक सरकारी ऑफिससेसमधल्या माणसांना लाचेचं पाकीट दिलं की सगळं छान छान तशी अशा लोकांना ही वागणुकीतली लाच देणं आहे. सगळ्या उलटसुलट निरनिराळ्या गोष्टींचा विचार करून म्हणजे वय, शिक्षण, अनुभव, लायकी, समाजाची अपेक्षा, विवेकनिष्ठ विचारांचं म्हणणं वगैरेंचा विचार करून माझ्यापुरता एक निर्णय पक्का झाला. मी कोणालाही वाकून नमस्कार करत नाही आणि कोणाकडून करवून घेणार नाही. या विचारांची ओळख नसल्यामुळे कोणी घाईघाईनी वाकून नमस्कार केलाच तर परिस्थितीप्रमाणे कधी मी नुसतं नको म्हणतो किंवा थोडक्यात भूमिका समजावून सांगतो. आपलं सगळं बोलणं ई.क्यू.विषयी चालू आहे याचा मला विसर पडलेला नाही. दुसऱ्याला बरं वाटेल असं वागणं हे स्वतःला तत्वतः मान्य असेल तरच करायचं हा ई.क्यू.चा मला कळलेला अर्थ स्पष्ट आहे. मगाशी मी म्हटलं तसं सरकारी ऑफिसेसमधे त्यांना बरं वाटतं म्हणून लाचेचं पाकीट द्यायचं हे या विचारत बसत नाही.

शोभाच्यात नि माझ्यात एक गोष्ट नेहमी घडते. व्यवस्थापनाच्या बाबतीत ती मला सल्ला विचारते. दुसऱ्याचा दृष्टिकोन काय असेल हे शोभाला तिच्या भावनांकामुळे चांगलं समजतं त्यामुळे मी तिचा सल्ला नेहमी घेतो. माझ्या हातून त्यामुळे कमी चुका होतात.



## 6) भावनांक आणि समाजकार्य यांचा संबंध

एका विषयाकडे जरा निराळ्या दृष्टिकोनातून बघणं आवश्यक आहे ते मी थोडं समजावून देतो. दुसऱ्याविषयी विचार करणं हा जो निराळा दृष्टिकोन म्हटलेला आहे, त्यामधे आपण स्वतः, आपलं कुटुंब याच्या किती पलीकडे बघायचं हा निर्णयाचा भाग आहे. कोणी म्हणेल की मी स्वतः, माझे जवळचे नातेवाईक, दूरचे नातेवाईक आणि मित्रमंडळी यांचा विचार करीन. दुसरा एखादा असं म्हणेल की माझ्या आसपासच्या विभागाचा विचार मी करीन. तेवढ्या भागाच्या जनतेच्या फायद्यासाठी काही काम करीन. कोणाची क्षमता आणि पोच सबंध शहराचा विचार करण्याएवढी असेल. काहींच्या डोळ्यासमोर संपूर्ण भारताची परिस्थिती येऊ शकेल. तर काही लोकं पृथ्वीचा विचार करण्याच्या टोकापर्यंत येऊ शकतील.

त्या माणसाला गोडी कुठच्या विषयाची, ज्ञान कुठच्या विषयाचं यावर प्रत्यक्ष कामाची दिशा अवलंबून असेलच पण ही सगळी ई.क्यू.ची रूपं आहेत. शोनील, आमचा मुलगा 'ग्लोबल इकॉलॉजी' याच्यामधे काम करतो. त्याचं पर्यावरणातलं शिक्षण आहे, तोच त्याचा चरितार्थाचा व्यवसाय पण आहे आणि त्याबद्दल त्याला मनापासून कळकळही आहे.

हे सगळं म्हणताना कुठचा माणूस कुठच्या स्तरावर काम करतो यावरून त्या माणसाच्या कामाचा दर्जा आपण ठरवू शकत नाही. मूळ गोष्ट एकच आहे, ज्याला इंग्लिशमधे 'अल्ट्रुइस्टिक ॲटिट्यूड्स्' म्हणतात. स्वतंत्रपणी याच पुस्तकात 'समाजकार्याच्या दिशा' असा लेख आहे त्याच्यात तुम्हाला अशा अनेक गोष्टी सापडतील. असं काम करणाऱ्या प्रत्येकाविषयी आपल्याला आदर आहे. ते छोटं का मोठं यावरून चांगलं किंवा वाईट ठरत नाही. असं काम करणाऱ्या सर्व लोकांचा ई.क्यू. वरच्या पातळीचा असतो म्हणून ते हे काम करतात. दुसऱ्यांविषयी विचार करणाऱ्या माणसाचं अनेक भौतिक फायद्यांच्या गोष्टींकडे दुर्लक्ष पण होऊ शकतं कारण तो कुठच्यातरी गोष्टींनी झपाटलेला असतो. महत्त्वाच्या कामाला बसलेला असताना दुपारच्या जेवणाच्या वेळेकडे दुर्लक्ष करून एकच्या ऐवजी चार वाजता जेवणारा माणूस काही लोकांना अगदी वेडा वाटू शकेल. पर्यावरण

या विषयाचं महत्त्व समजलं असलं तर तो माणूस पर्यावरण या क्षेत्रात शिकलेला नसला तरीही रोजच्या जीवनात नैसर्गिक संपत्तीच्या बचतीकडे लक्ष देतो हेही ई.क्यू.च्या पातळीचंच लक्षण आहे. कोणी पेट्रोल कमी वापरण्याचा प्रयत्न करतो, वीज, पाणी अशा जागतिक प्रश्नांकडे लक्ष देतो. हे करत असताना कदाचित इतर काही गोष्टींकडे त्याचं दुर्लक्ष पण होतं.

महाराष्ट्रातल्या चांगल्या सामाजिक कार्यकर्त्यांपैकी बऱ्याच लोकांशी शोभाची आणि माझी वैयक्तिक ओळख आहे. त्यांची कामं आम्ही जवळून बघितली आहेत. त्यांची कामं प्रसिद्धही आहेत. त्यांच्याकडे खूप लोक काम बघायला जातात. या कार्यकर्त्यांच्या उच्च भावनिक गुणांकामुळे ते आलेल्या सगळ्या पाहुण्यांचा पाहुणचार करतात आणि पाहुणे तो करवून घेतात. अशा पाहुण्यांची सरबराई करण्यात या लोकांचा खर्चही होतो आणि वेळही जातो. काही लोक चक्क त्यांचा गैरफायदा घेतात. माझ्या मते लोकांची मनं सांभाळून आणि तरी संस्थेच्या खर्च आणि वेळेची बचत करून व्यवस्थापनशास्त्राच्या मदतीनी हे प्रश्न सोडवता येतील.

माणसाच्या संपूर्ण दिनचर्येकडे नीट लक्ष दिलं तर ई.क्यू.च्या वरच्या पातळीची अनेक रूपं आपल्याला दिसतात आणि थेट उलटं वागणाऱ्यांचं चंगळवादी रूप हे कसलीच टेस्ट न घेता ईक्यूच्या खालच्या पातळीचं लक्षण आहे असं लक्षात येतं.



## 7) भावनांकावर वय, आरोग्य यांचा परिणाम

'आय.क्यू.' म्हणजे बुद्धिमत्ता अगदी लहान वयात जेवढी असते तेवढीच ती आयुष्यभर राहते असं म्हणतात. 'ई.क्यू.'बद्दल तसं म्हणता येत नाही कारण दुसऱ्याशी वागण्याचा तो प्रश्न असतो आणि ते वागणं दुसऱ्याला कळण्याचाही प्रश्न असतो.

पुढे प्रश्न असा येऊ शकतो, की वय आणि तब्येतीचे प्रश्न यांच्यामुळे इच्छा असते तेवढी दुसऱ्याची कदर करणं तब्येतीला परवडत नाही. मधुमेह आणि वय यांमुळे प्रत्यक्ष वागणुकीत निरनिराळ्या तपशीलांकडे दुर्लक्ष होऊ शकतं आणि त्या व्यक्तीचा मुळात ईक्यू वरच्या पातळीचा असला तरी सध्या दिसणारं रूप त्याच्याशी जुळत नाही हे ज्येष्ठ नागरिकांना समजावून सांगावं लागतं. शारीरिक चापल्य आणि बुद्धीचा तल्लखपणा कमी झाला की खरा माणूस निराळ्या प्रकारचा असून बघणाऱ्याच्या नजरेला तो निराळा वाटू शकतो. अशा माणसानी लक्षात ठेवून भाषेतले सर्व उपयोगी उपचार पाळून, समजावून सांगून, माफी मागून प्रसंग निभावून न्यावा लागतो.

थोडक्यात सांगायचं तर म्हातारपणी माणसाचा इमोशनल कोशंट चांगला असला तरी एनर्जी कोशंट खालच्या पातळीवरचा असतो.

मी आणि शोभा दोघंही आता ज्येष्ठच आहोत. 69 आणि 72 म्हणजे तब्येतीचे प्रश्न असणारच. शोभाला माझ्यापेक्षा तब्येतीचे प्रश्न जास्त आहेत. त्यामुळे काही निर्णय मी घेतले आहेत आणि ते कटाक्षानी पाळतो. मी घराबाहेर जाताना कायम किल्ली घेऊन जातो नि किल्लीनीच दार उघडून आत येतो. शोभादेखील स्वतःच्या किल्लीनी दार उघडून आत आली असती. मला कामातून उठून दार उघडावं लागतं याची तिला तिच्या मूळ भावनांकामुळे नक्की पर्वा आहे. पण शरीरानी साथ दिली नाही तर मूळच्या उच्च भावनांकाचा उपयोग होत नाही. मी तिला एकदा हे सांगितलं, पण नंतर सोडून दिलं. पर्समधून किल्ली शोधून उभ्या उभ्या दार उघडणं तिच्या दृष्टीनी फार त्रासाचं आहे हे मला कळतं.

माझ्या दृष्टीनी शोभा उच्च भावनांकामुळे झालेल्या अवस्थेची बळी आहे. तिला कशालाच फुरसत नसते. ती तिच्या तब्येतीचं नुकसान करून घेते. शोभाला

खरं म्हणजे माझी पंचाईत करायची नसते पण तिचा मूळ स्वभाव निराळा आणि माझा निराळा. तिला उलगडा करण्याचं महत्त्व उलगडलेलं नाही तर माझा उलगड्याचा आग्रह. एकदा माझ्या एका कामाचं मला खूप महत्त्व आहे हे शोभाला माहीत होतं, पण ते काम करणारी व्यक्ती शोभाच्या जास्त ओळखीची होती. त्यांना नुसता एक फोन करायचा होता. शोभानी साधारण 20-25 दिवस तो फोन करायचं टाळलं, कारणाचा उलगडा केला नाही. मला त्या उलगडा न होण्याचा अगदी वैताग आणला. हे तिनी मुद्दाम केलं असण्याची शक्यता नाहीच. वय, तब्येत यांच्यामुळे भावनांकावर परिणाम होतो असंच मला वाटतं.

रस्त्यावरून जाताना मी कायम वाहनांच्या बाजूला चालतो नि शोभा फूटपाथच्या बाजूला. 'ज्येष्ठ नागरिकांशी संवाद' हा स्वतंत्र लेख या पुस्तकात असल्यामुळे इथे याविषयी आणखी काही सांगणं योग्य ठरणार नाही. एक नक्की सांगतो, माझी अवस्था शोभासारखी नक्की होणार नाही. कारण मी स्वतःचा आणि इतरांचा एकाच वेळी विचार करून निर्णय घेणाऱ्यांपैकी आहे.



# ८

# पुरुष पालकांचं शिक्षण

## 1) माझं स्वतःचं बालपण

'आयुष्यात येणाऱ्या प्रत्येक प्रश्नाचं खरं मर्म एकच - नशिबानी चांगल्या-वाईट अनेक घटना तुमच्या वाट्याला आयुष्यभर येणार. त्यांची हाताळणी कशी करायची हे दुसरी कुठचीही शक्ती किंवा व्यक्ती ठरवणार नसते. ते तुम्ही स्वतः ठरवायचं असतं. त्यासाठी त्या घटनेच्या सर्व अंगांचा अभ्यास स्वतःला करावा लागतो. त्या अभ्यासासाठी जीवनभर स्पष्ट विचारांची साथ लागते. म्हणजेच जीवनसाथ.' हा जीवनसाथचा मतितार्थ लक्षात घेऊन मी पुरुष-पालकत्व या विषयाकडे जेव्हा बघतो तेव्हा मला माझं लहानपण आठवतं.

माझ्या लहानपणी मी पार बिघडलेला मुलगा होतो. मी शाळा बुडवायचो, शाळेच्या वेळेला घरातून बाहेर पडून सुटण्याच्या वेळेला बरोबर घरी यायचो. मधल्या काळामधे क्रिकेट खेळायचो, गोट्या खेळायचो आणि सिगरेट ओढायचो. आई-वडलांच्या दृष्टीनी दोन बहिणींच्या मधला एकटा मुलगा म्हणजे पार वाया गेलेला मुलगा. दिवसा मला आई मारायची आणि वडील आले की, संध्याकाळी उशिरा तीच कामगिरी वडील पुरी करायचे.

माझ्या आईला तर मला सुधारण्याच्या दोनच गोष्टी माहिती होत्या. एक मार आणि दुसरा उपाय म्हणजे देवासमोर मला उभं राहायला लावून पुन्हा असं वागणार नाही, असं म्हणायला लावणं.

माझ्या आई-वडलांना खरोखरच काळजी वाटत असणार कारण माझा एक सख्खा काका वाईट संगत लागून हद्दपार केल्यामुळे नाहीसा झाला होता. असं

आपल्या मुलाचं होऊ नये ही माझ्या आईवडलांची भीती खरी असणार यात काही शंका नाही. मुळात मला अभ्यासाची गोडी नव्हती. लहानपणी आम्ही अहमदाबादला होतो आणि चार वर्षांचा असताना मला गुजराती शाळेच्या पहिलीत घातलं होतं. शाळेच्या पहिलीत मी कसा पास झालो हे मला आठवतसुद्धा नाही. पुढे वडलांच्या नवीन नोकरीमुळे आम्ही नागपूरला गेलो. तिसरी आणि चौथी ही हिंदी भाषेत नागपूरला मी पुरी केली. त्यानंतर ठाण्याला जेव्हा आम्ही लोकं आलो, तेव्हा मी प्रथम पाचवीत मराठी मातृभाषेतून शिकायला लागलो.

अभ्यासाचा पायाच कच्चा राहिल्यामुळे शिक्षणाची पार वाट लागली होती. एवढ्या बिघडलेल्या अवस्थेवरून म्हणजे जवळजवळ कड्याच्या टोकावरून मी परत आलो याचं कारण माझे एक शिक्षक. ते इतर शिक्षकांबरोबर बोलत असताना असं म्हणाले की, हा खरा हुशार मुलगा आहे आणि हा मागे पडला ही आपली चूक आहे. कारण आपण याला शिक्षणाची गोडी लावू शकलो नाही. ह्या एका वाक्यानी मी 180 अंश उलटा फिरलो आणि अभ्यास करायला लागलो. त्यामुळे असेल किंवा आईवडलांना दुसरे व्याप असल्यामुळे असेल किंवा मला मारून मारून आईवडलांना कंटाळा आला असेल. यातल्या कुठल्यातरी कारणामुळे आईवडलांचा मार थांबला आणि मी चक्क सुधारलो. हे माझं उदाहरण सुरुवातीलाच तुम्हाला सांगण्याचा माझा उद्देश अगदी स्पष्ट आहे. एक म्हणजे विद्यार्थ्याला शिक्षणाची गोडी लागली नाही तर ती चूक शिक्षकाची आहे आणि दुसरं म्हणजे रागावून, मारून मूल कधीही सुधारत नाही. विशेषतः पुरुष-पालकांनी या दोन विधानांवरून काही बोध घेतला तर मला फार आवडेल.

मी वर्णन करतोय ते वातावरण साठ-पासष्ठ वर्षांपूर्वीचं आहे. आसपासच्या सगळ्या मोठ्या माणसांच्या तोंडातलं त्या काळातलं लोकप्रिय वाक्य म्हणजे, 'सांगितलंय तेवढं करं.' नशिबानी मी आणि शोभानीही ते फार मनावर घेतलं नाही. मी मनावर घेतलं नाही कारण मी कोणाचंच काही ऐकायचो नाही. शोभाला बहुधा असं कोणी म्हणालं नसावं. सांगितलं तेवढंच कर हे ज्यांनी खरोखर पाळलं ते स्वतः विचार करीनासे झाले. जीवनसाथच्या कामात आम्हाला सतत जाणवणारी गोष्ट म्हणजे लोकांचा विचार करायला नकार आहे. त्या लोकप्रिय वाक्याचाच हा परिणाम असेल.



## 2) पालक शिक्षणाची थिअरी आणि प्रॅक्टिस

प्रथम माझ्या अभ्यासाचा निष्कर्ष सांगतो. तत्त्वज्ञान, मानसशास्त्र आणि व्यवस्थापनशास्त्र अगदी स्पष्टपणी म्हणतं की, 'थिअरी आणि प्रॅक्टिस यात काही फरक नाही'. आपण तर सगळे लहानपणापासून ऐकत आलो आहोत की थिअरी फक्त कपाटातल्या पुस्तकात लिहिण्याची आणि कॉलेजमधे शिकवण्याची निरुपयोगी असते आणि प्रॅक्टिस निराळीच असते. माझी इच्छा अशी आहे की, आजच्या या कार्यशाळेत जरी मी काही थिअरी बोललो तरी ती निरुपयोगी आणि दुर्लक्ष करण्याची गोष्ट नाही.

प्रथम मानवानी कृती म्हणजे प्रॅक्टिस केली आणि दुसऱ्याला समजावून सांगण्यासाठी ती कृती शब्दात मांडली. काही गोष्टींमधे त्यावरून कृतीत सुधारणा केल्या आणि पुन्हा सुधारित थिअरी मांडली. थोडक्यात दोन्ही गोष्टी एकच आहेत, आपल्यासाठीच आहेत नि ते ज्ञान पुस्तकांच्या कपाटासाठी नाही तर आपण वापरण्यासाठी आहे. ते ज्ञान माझं नाही. मी फक्त ते सोप्या भाषेत मांडण्याचा प्रयत्न करणार आहे. आपण आज बोलू ती प्रत्येक गोष्ट प्रत्यक्ष करण्यासाठी आहे यावर आपलं एकमत आवश्यक आहे.

मुलाचं जसं वय वाढत जातं तसं पालक म्हणून आपलंही वय वाढायला हवं. म्हणजे नुसतं शारीरिक वय वाढून उपयोग नाही, तर पालकत्वामधल्या प्रगल्भतेचं वयही वाढायला हवं.

कुमारवयातल्या मुलांना सांभाळणं हे लहान बाळांना सांभाळण्यापेक्षा एका तऱ्हेनी सोपं पण दुसऱ्या तऱ्हेनी अवघड असतं. मुलं स्वतःच्या रोजच्या शारीरिक गरजा स्वतः पार पाडू शकतात या अर्थानी ते सोपं असतं. पण दुसऱ्या अर्थानी अवघड अशासाठी की त्यांना हे स्वतःचं, स्वतःच्या फायद्यासाठी, स्वतःच्या समाधानासाठी याची स्पष्ट आणि तीव्र जाणीव झालेली असते. ती आपले आग्रह मांडायला लागतात. ते पालकांना नाही समजलं तर घोटाळ्याला सुरुवात होते.

या प्रगल्भतेचा अर्थ जरा निराळ्या शब्दात सांगतो. मुलांना मोठ्या माणसांचा आदर करायला शिकवायचं, तर मोठ्यांनाही मुलांचा आदर करायला शिकवायला हवं आहे. या बाबतीतला एक गमतीचा विचार सांगतो. समजा,

मुलांनी आईवडिलांची परीक्षा घेऊन आपल्या पोटी जन्म घ्यायचा का नाही हे ठरवणं शक्य असतं तर अनेक आया कदाचित काठावर पास झाल्या असत्या, पण बाबा नक्की नापास झाले असते.

आणखी एक कोडं सगळ्यांना पडलेलं असतं. आपण नवराबायको दोघं असे आहोत, मग मुलात तो गुण नाही कसा? किंवा उलट आपल्या दोघांच्यात अमुक गुण नाही, मग तो अपत्यामधे आला कुठून? त्या कोड्याविषयी कधी तक्रार असते तर कधी खुषी असते. या दोन्ही विचारांच्या, भावनांच्या तीव्रतेला काबूत ठेवण्यासाठीचा पालकत्वातला एक गमतीचा 'एक्सरसाइझ' आहे.

याला गमतीचा म्हणण्याचं कारण असं की कुठल्याही जन्मलेल्या मुलामधे किती पिढ्यांमधले मागचे गुण येऊ शकतात याबद्दल अगदी निर्विवाद सिद्ध झालेली कुठलीच गोष्ट नाही. सात पिढ्या हा सर्वांत लोकप्रिय समज खरा मानून ही कल्पना काढलेली आहे. माझा जनुकशास्त्राचा अभ्यास नसल्यामुळे मी सात पिढ्या ही कल्पना या 'एक्सरसाइझ'पुरती मान्य केलेली आहे.

आजच्या पिढीतल्या आज जन्मलेल्या मुलापासून सुरुवात केली तर त्या मुलामधे एक पुरुष आणि एक स्त्री यांचे गुणधर्म आले असणार. आता इथून आपण सात पिढ्या मागे जाण्याच्या पाठाला सुरवात करू. त्याला 1, 2, 3, 4, 5, 6, 7 असे क्रमांक देऊ आणि किती लोकांचे गुण-अवगुण त्या मुलात आले असतील त्याचं गणित मांडू.

आज जन्मलेल्या मुलात 1 स्त्री आणि 1 पुरुष मिळून 2 व्यक्तींचे गुणधर्म येतील त्यामुळे 1 पिढी मागे गेलं तर त्यापुढे आकडा लिहू 2. या पद्धतीनी किती पिढ्या मागे गेलं तर किती लोकांचे गुणधर्म येणार तो आकडा लिहू. दर एका पिढीनी मागे गेलं की तो आकडा दुप्पट होणार कारण प्रत्येकाचा जन्म 1 स्त्री - 1 पुरुष यांच्या संबंधातूनच होणार.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| 1 पिढी मागे | - | 2 माणसं | - | 2 गुणधर्म |
| 2 पिढ्या मागे | - | 4 माणसं | - | 4 गुणधर्म |
| 3 पिढ्या मागे | - | 8 माणसं | - | 8 गुणधर्म |
| 4 पिढ्या मागे | - | 16 माणसं | - | 16 गुणधर्म |
| 5 पिढ्या मागे | - | 32 माणसं | - | 32 गुणधर्म |
| 6 पिढ्या मागे | - | 64 माणसं | - | 64 गुणधर्म |
| 7 पिढ्या मागे | - | 128 माणसं | - | 128 गुणधर्म |

यांची बेरीज = 254 माणसं - 254 गुणधर्म (सद्‌गुण किंवा दुर्गुण)

पालकत्वाची आणखी एक व्याख्या अशीही आहे. पालकत्व म्हणजे स्वनियंत्रणाचं शिक्षण. हे शिक्षण पालक आणि पाल्य दोघांनी एकाच वेळेला घ्यायचं असतं आणि द्यायचं असतं. पुढे मुद्दा असा की, आजच्या कार्यशाळेमधलं जे योग्य आणि शक्य वाटेल त्याची 'प्रॅक्टिस' आजच्या आज सुरू करा. थिअरी त्यातूनच जन्म घेईल.



## 3) शोभा आणि माझं पालक-शिक्षणातलं काम

शोभा आणि मी दोघंही समाज प्रबोधनाचंच काम करतो, पण शोभा मुलांबद्दलच्या कामात जास्त प्रवीण आहे. मी ॲडल्ट लोकांच्यात काम करतो. मुलांच्यात बदल घडवणं जास्त कठीण असतं कारण त्यांच्याबरोबर बोलताना शब्द कमी वापरायचे असतात आणि शारीरिक संवाद जास्त करावा लागतो. शोभाच्या भावनांकामुळे ते तिला चांगलं जमतं.

शोभा पालक-शिक्षण या विषयात बरंच काम करते. तिनी याच्यावर बरंच लिखाण पण केलं आहे. पालक विद्यापीठ नावाची स्वतंत्र संस्था आहे. त्यात मी मधूनमधून असतो कारण माझा उद्देश पुरुष पालकांची जागृती हा आहे. सर्वसाधारण पालक-सभांना स्त्रियाच मोठ्या संख्येनी हजर असतात कारण पुरुष पालकत्व या विषयाच्या बाबतीत उदासीन आहेत. मी काही काही वेळेला आधी जाहीर करून फक्त बाबांसाठी अशा पालक-शिक्षण कार्यशाळा पण घेतल्या आहेत.

अशा पुरुषांच्या पालक शाळेला एरवीच्या पालक-शिक्षण शाळांच्या तुलनेत हजर संख्या कमी होती पण 10-15 बाबा पुरुष पालकत्व कार्यशाळेला चक्क हजर होते. एकदा या विषयात गोडी निर्माण झाल्यानंतर चांगले अडीच-तीन तास थांबले होते. त्यांच्याशी बोलताना जे मी त्यांना प्रथम सांगितलं तेच आत्ता तुम्हाला सांगतो. साधारण 33-34 वर्षांपूर्वी डॉ. निर्मला सरदेसाई यांनी सहा आठवड्यांचा पालक शिक्षणाचा एक कोर्स डिझाईन केला होता. त्याला मी आणि शोभा सलग सहा आठवडे शनिवार-रविवार असं करत एकूण 12 दिवस हजर होतो. डॉ. निर्मला सरदेसाईंच्या त्या कोर्समधे प्रसिद्ध अमेरिकन 'सायकॉलॉजिस्ट' थॉमस गॉर्डन यांनी लिहिलेल्या 'पीईटी (पेरंटस् इफेक्टिव्ह ट्रेनिंग)' याच्यावर तो कोर्स बेतलेला होता. आमची मुलं त्यावेळेला लहान होती. मुलांशी वागताना आमच्या हातून काय काय चुका झाल्या होत्या हे आम्हाला कळलं आणि हेही मला कळलं की, बाबा म्हणून माझ्या हातून जास्त चुका झाल्या होत्या.

मी तसं स्पष्ट बोलूनही दाखवलं. मग पुढे प्रश्न असा निघाला की, मी जर या सध्याच्या गटासमोर चुका झाल्या हे कबूल करतोय् आणि काय चुका झाल्या हेही सांगतोय तर मी त्या मुलांसमोरही कबूल करू शकलो पाहिजे. मला

त्यात अडचण नव्हती, पण मी सांगितलेलं समजण्याएवढी मुलं मोठी नव्हती. मी माफी मागायलाही तयार होतो, पण मुलांना ते समजलं नसतं.

मला सर्वांत वाईट कशाचं वाटत असेल तर शोभाची आमच्या मुलांशी जास्त मैत्री होती आणि त्यामानानी माझी कमी होती. खरं सांगायचं तर एवढ्या वर्षांनंतरसुद्धा मला अजूनही वाईट वाटतं की शोभाची मुलांशी जेवढी मैत्री आहे तेवढी माझी नाही. मी 50 कारणं सांगू शकीन. माझा व्यवसाय, बिल्डर बिझनेस, पैशाच्या व्यवहारातली कॉम्प्लिकेशन्स, कामासाठी बाहेरगावी जावं लागणं अशी कितीतरी कारणं होती. पण शेवटी हे तर खरंचंय् की माझी मुलांशी जास्त मैत्री झाली असती तर मला जास्त समाधान वाटलं असतं.

आता या अवस्थेत मी पूर्वी झालेल्या त्या चुकीबद्दल काहीच करू शकत नाही. पण आता मी त्याबद्दल शोनील आणि आभाशी मोकळेपणानी बोलू तर शकतो. मी त्यांच्याशीच काय, इतरही अनेकांना हे सगळं सांगतो. शोभानी पालक-शिक्षणाचे आत्तापर्यंत हजारच्या वर कार्यक्रम घेतले आहेत. मी साधारण 300 वेळा शोभाबरोबर पालकांशी बोललो आहे. हे असं अखेरपर्यंत चालूच राहील कारण समाजाची पालक-शिक्षणाची गरज वाढतेच आहे. पालकांवर खूप म्हणजे खूपच ताण आहेत, कारण त्यांच्यासमोर प्रॉब्लेम्स खूप आहेत.

पण तरी एक महत्त्वाची गोष्ट सगळ्यांसाठी सांगतो, ‘देअर इज नो प्रॉब्लेम चाईल्ड, देअर आर प्रॉब्लेम पेरंट्स’.



## 4) मूल कशासाठी?

आम्हाला तुम्हाला एक महत्त्वाचा प्रश्न सगळ्यांना विचारायचाय्. मुलाला जन्म देणं म्हणजे खूप त्रास आहे, खूप आनंद आहे, ती सर्वांत मोठी गुंतवणूक आहे हे सगळं तुम्हाला-आम्हाला माहिती आहे. पण अगदी मूलभूत प्रश्न विचारतो, मूल जन्माला कशासाठी घालायचं? तात्पुरते सगळेजण स्तब्ध होतात. एकमेकांकडे बघतात, नवराबायको असले तर ते एकमेकांकडे बघतात. फारच कमी लोकांनी लग्न करताना आपल्याला मुलं हवीत का नको, याच्यावर चर्चा केलेली असते. बाकीच्यांनी थेट गृहीत धरलेलं असतं की लग्न केलं म्हणजे मूल होणारच. मुलाला जन्म कशासाठी द्यायचा हा काय प्रश्न झाला? मी आणि शोभा पुढे त्यांना सांगतो की, ठीक आहे, जी चर्चा तेव्हा झाली नाही ती नाही, पण आत्ता आपण करूया ना! मुलाचा जन्म कशासाठी एवढंच नव्हे तर किती मुलं, मुलगा का मुलगी, केव्हा, किती, मुलं कशी असावीत आणि मोठी होताना मुलं कशी व्हावीत या सगळ्याविषयीच आपण बोलूया.

काही लोक असा विषय काढतात की आम्हाला एकच मूल परवडतं. आम्ही म्हणतो, ठीक आहे. हा निर्णय तुमचा आहे पण एकटं मूल असेल तर आत्मकेंद्री होण्याचे धोके आहेत आणि त्यासाठी तुम्हाला काहीतरी करावं लागणार आहे. आयांनी आणि बाबांनी दोघांनीही अगदी पक्कं लक्षात घेतलं पाहिजे की मुलांना पालकांची खूप गरज असते. माणसाचं मूल शरीरानी फार सावकाश सावकाश वाढतं. मुलाची शारीरिक वाढ, मानसिक, भावनिक, सामाजिक, बौद्धिक आणि सांस्कृतिक वाढ एवढ्या सगळ्या बाबतींत तुमचं मूल तुमच्यावर अवलंबून असणार आहे.

मूल कशासाठी हा प्रश्न विचारल्यावर सुरुवातीला 'जरा वेळानी सांगतो' किंवा 'लग्न झालं की मुलं होणारच' पासून हळूहळू खरी उत्तरं यायला लागतात. कोणी सांगतं 'आई होण्याच्या आनंदासाठी'. कोणीतरी म्हणतं, 'बाप होणं हाही आनंदच असतो की!, एका कार्यशाळेत एकानी सांगितलं, 'मानववंश चालू राहावा यासाठी'. एक म्हणाला, 'निर्मितीच्या आनंदासाठी', 'आपण चांगला माणूस घडवू शकतो की नाही बघण्यासाठी'. काही अगदी व्यावहारिक पातळीवरची

उत्तरं असतात. म्हातारपणीच्या आधारासाठी, आपल्याला जे जमलं नाही ते घडवण्यासाठी, मालमत्ता, पैसे मिळवले ते वापरायला कोणीतरी हवं म्हणून. दुसऱ्या एका प्रकारचं उत्तरही मिळतं. आपलं शरीर म्हणजे जननेंद्रिय 'नॉर्मल' आहे हा मुद्दा समाजाला आणि स्वतःलाही सिद्ध होण्यासाठी, 'मुलाला वाढवताना त्याच्या सहवासाच्या आनंदासाठी', 'सत्ता गाजवायला कोणीतरी हवं म्हणून'.

ही सगळी उत्तरं त्यांच्या त्यांच्या दृष्टिकोनानी बरोबरच आहेत. तुमच्या मनात काय आहे ते तुम्ही ठरवा. याबद्दल आजपर्यंत विचार केला नसला तर करा. पण एक गोष्ट नक्की. मुलांचा जन्म ही इच्छा कोणाची होती? मुलाची नक्कीच नाही. जो हेतू होता तो आईवडलांची इच्छा पूर्ण करण्याचा होता. थोडक्यात, 'मुलाचा जन्म हा आईवडलांच्या स्वार्थामुळेच होतो' हे वाक्य बोचणारं वाटेल पण ते अशासाठी आहे की आईवडलांनी आपल्याला जन्म देऊन आणि पालनपोषण करून आपल्यावर उपकार केले आहेत या कृतज्ञतेच्या भावनेचा भव्यपणा जरा कमी व्हावा. 'मातृ देवो भव', 'पितृ देवो भव' ही वचनं आईवडलांशी वाईट वागणाऱ्यांना सुधारण्यासाठी आहेत. पण आईवडलांनी काहीही सांगितलं तरी ती आज्ञा मानणाऱ्यांना समतोल विचाराकडे खेचण्याकरिता हे सत्य गटचर्चेतून मंथन करून काढलेलं आहे.

केव्हा मूल व्हावं, याबाबतीत इतर कोणी त्या जोडप्याला काही सांगण्याची खरं म्हणजे काही गरज नाही असं मला वाटत होतं. मी आणि शोभानी तरी याबद्दल अगदी पद्धतशीर विचार केलेला होता. प्रत्यक्षात जेव्हा जीवनसाथच्या निमित्तानी अनेक तरुण जोडप्यांशी संबंध आला तेव्हा खरी परिस्थिती समोर आली. नवराबायकोंना इंटरनेटमुळे 'सगळं' माहिती असतं असं वाटत होतं, ते खोटं निघायला लागलं. नको असताना दिवस गेले, गर्भपात करावा लागला असे खूप उल्लेख ऐकायला मिळायला लागले. गर्भपाताच्या निर्णयाला उशीर झाल्यामुळे योजनेत नसताना मुलाचा जन्म झाला असंही खूप ठिकाणी आढळलं.

या जोडप्याला 'सगळं' म्हणजे काय माहिती असतं हा प्रश्नच पडतो बुवा! माझ्या मते कुठच्याही परिपक्व, माहितगार जोडप्याला असा स्वतःचा आणि मुलाचा घोटाळा करण्याचा नैतिक अधिकारच नाही.



## 5) मुलाची शारीरिक वाढ

मुलाच्या शारीरिक वाढीबद्दल एक गोष्ट स्पष्ट करतो. 15 वर्षांपर्यंतचं मूल जरा जास्त जाड, जास्त बारीक, वजन कमी किंवा जास्त याची काळजी करू नका. उंची वाढत असली तर काही प्रश्न नाही. याचे तक्ते बघायचे असले तर बघा, पण त्या कारणांवरून मुलाला त्रास देऊ नका. जास्त खाणाऱ्या मुलाला रागावू नका आणि कमी खाणाऱ्या मुलाला जबरदस्तीनी मागे लागून लागून खायला घालू नका. मुख्य म्हणजे आनुवंशिक अंगकाठी जशी असेल तशी असेल. त्यात तुम्ही फार बदल करूच शकणार नाही.

खरं म्हणजे आया त्यांना स्वतःला सोयीचं तेव्हा मुलांना खाऊ घालतात. त्यांना घाई असली तर त्याप्रमाणे सोयीचा पदार्थ करतात किंवा आणतात. त्यांच्या वेळेत मुलांचं जेवण बसवण्यासाठी कधीकधी घास मुलांच्या तोंडात कोंबतात. खाण्याचा आनंद वाटला पाहिजे हे मूलतत्त्व बाजूला पडलेलं असतं.

मूल खेळत असेल, हसत असेल, एकूण आनंदी असेल तर नियमित शारीरिक तपासणी करा, पण मुलाची रोज काळजी करत बसू नका. आईनीही ती काळजी करू नये आणि बाबांनी बायकोला मूल बारीक किंवा जाड असल्याबद्दल दोष देऊ नये. तुझ्यामुळे मूल असं झालं हे लोकप्रिय वाक्य कटाप करावं. मुलांना जेवू घालण्याची जबाबदारी बाबांकडे क्वचितच असते. सगळे नियम मात्र तेच.



## 6) सर्वसाधारण पुरुष पालकाची सध्याची वागणूक

पालक-शिक्षणाचं एक महत्त्वाचं सूत्र प्रथम सांगतो आणि मग इतर गोष्टी सांगायला सुरुवात करतो. सूत्र अगदी साधं आहे. मुलांना शिस्त लावायचीच आहे, पण कशी ते शिकायचं आहे. स्वातंत्र्य द्यायचंच आहे पण किती आणि केव्हा ते आपल्याला शिकायचं आहे. जबाबदारीची जाणीव करून द्यायचीच आहे, त्याचे टप्पे आपल्याला शिकायचे आहेत. ह्या गोष्टी ज्यांना जमत असतील त्यांनी त्या कशा जमवल्या ते इतरांना सांगायला सुरुवात करावी. त्यांना मी सांगण्याजोगं खरं म्हणजे काहीही नाही. कार्यशाळेमधे जमलेली 20-25 लोकं, त्यांना मी आणि शोभा सुरुवातीलाच हा प्रश्न विचारतो आणि एवढं सगळं तुम्हाला जमत असेल तर कसं ते तुम्हीच आम्हाला समजावून सांगा, असं म्हणतो. जमलेल्या लोकांमधे असं कोणीही नसतं. तेव्हा मग आम्ही त्यांना म्हणतो की काही बिघडत नाही. जेव्हा उत्तर माहीत नसतं तेव्हा नेमका प्रश्न काय आहे हे मांडायला सुरुवात करावी. तेव्हा तुमचे प्रश्न सांगा, तरी चालेल. मग एकेक प्रश्न येतात, त्यांची यादी मात्र भलीमोठी असते.

त्या प्रश्नांपैकी काही आधी सांगतो. तुमची मुलं समजावून सांगितलं तरी ऐकत नाहीत, खोटं बोलतात, नुसती रडतात; कशासाठी ते तुम्हाला समजतच नाही, आईवडलांपासून काही काही गोष्टी लपवतात, स्वतःचंच दुसऱ्यांनी ऐकलं पाहिजे असा हट्ट धरतात, पालकांनी नाही म्हटलं की तो हट्ट आजी-आजोबांकडून पुरवून घेतात, आळशासारखी नुसती बसतात, त्यांना काहीच आवडत नाही, काय आवडतं ते ओळखायचं कसं, सारखा टी.व्ही. बघतात, सारखं क्रिकेट एके क्रिकेट.

मोठ्या मुलाचा प्रश्न एक पालक सांगत होते की, त्याला मिशा येत नाहीत म्हणून त्याला न्यूनगंड निर्माण होतोय. जवळ चांगली शाळाच सापडत नाही. आणि एक शेवटचा प्रश्न निम्म्यापेक्षा जास्त लोक विचारतात, तो म्हणजे आमचं मूल पुरेसा अभ्यास करत नाही, कितीही मागे लागलं तरी अभ्यासालाच बसत नाही, त्याचे शाळेतले मार्क कमी होतायत. ह्या प्रत्येक प्रश्नाचं एकच एक उत्तर असं नसतं पण करून बघण्याजोग्या गोष्टी बऱ्याच असतात.

आता खरी गंमत सांगतो, यातला एकही प्रश्न बाबांकडून येत नाही. मला तर शाळेतल्या वर्गाची आठवण येते. मुलांनो, काही शंका आहे का, असं शिक्षक विचारतात आणि एकही शंका नसेल, विचारण्याजोगा एकही प्रश्न नसेल तर त्याचा अर्थ मास्तर काय बोलत होते त्याच्याकडे कोणाचंही लक्ष नव्हतं. हीच तर पुरुष पालकांची मुख्य अडचण आहे. आपल्या मुलांविषयी त्यांना पुरेशी माहितीसुद्धा नसते. आधीच्या पिढीमधे बाई घरात असायची, पुरुष कायम मधूनमधून घराबाहेर असायचा आणि मुलांची संख्या पण जास्त असायची. त्या काळात तर वडलांना सगळ्या मुलांची नावं माहिती असली तरी खूप झालं अशी परिस्थिती होती. शाळा कुठची, इयत्ता कितवी यासुद्धा फार दूरच्या गोष्टी होत्या. आमच्या पालक-शिक्षण वर्गाला सध्याच्या काळात येणारे जे काय थोडे बाबा असतात, त्यांना आपल्या मुलांची नावं, शाळा, इयत्ता इथपर्यंत माहिती असतं पण आणखीन खोलात शिरलं की मुलाची जवळची मित्रमंडळी कोण, कुठच्या विषयांची त्याला गोडी आहे? याचं उत्तर जवळजवळ सगळे बाबा माहीत नाही असं सांगतात.

कुठचेच वडील सरळपणे या शब्दात कबूल करत नाहीत पण त्यांच्या बोलण्या-वागण्याचा मतितार्थ स्पष्ट असतो. ते घर आणि मुलं स्वतःचं मानत नाहीत त्यामुळे त्याची जबाबदारी बायकोची असं ठरवून मोकळे होतात. ज्या ज्या घरात वडलांना मुलं घाबरतात असं दिसेल तिथे कोणीही बोललं नाही तरी हाच मतितार्थ समजावा.

आपल्या मुलाला कुणाची संगत आहे हे खरं म्हणजे खूप महत्त्वाचं असतं, पण आपल्या फारसं हातात नसतं. आपण ज्या शाळेत मुलाला घालू त्यावर, शाळेतलं वातावरण, स्कूलबसमधे मूल कोणाबरोबर प्रवास करतं अशा अनेक गोष्टींवर संगत अवलंबून असते. आपण पालक म्हणून एवढंच करायचं की, लक्ष ठेवायचं, पण पहारा नाही. मित्राच्या घरच्यांशी ओळख वाढवायची. एवढं केलं की बहुतेक वेळा 'व्यसनांची भीती' हा प्रश्न आपोआप कमी होतो. जेवढी बंधनं जास्त तेवढं मूल चोरून एखादी गोष्ट करून बघण्याची शक्यता जास्त हे कायमच लक्षात ठेवायला लागतं. सिगरेट, पान-तंबाखू, हुक्का, अमली पदार्थ अशी व्यसनं काय किंवा व्हिडिओ गेम्स, त्यातली जुगार खेळणारी मशीन्स काय, मूळ तत्त्व एकच– बंधनं नकोत, पहारा नको, लक्ष पाहिजे.

मुलांशी संवाद, सुसंवाद याविषयी आपण आधी बोललो आहोत. पण एक

गोष्ट त्यात वाढवूया. नेहमी स्वतःला काय अडचण वाटते तेवढं सांगायचं म्हणजे तू अमूक केलंस हे अगदी चुकीचं केलंस, त्याचं मला फार वाईट वाटलं, एवढं बोलून थांबायचं. मूल स्वतः विचार करतं आणि काही निष्कर्ष काढतं आणि खात्रीनी सांगतो, मूल हळूहळू बदलतं.

आमच्या नातवाला विचारलं, कोणाला बघून तुला सर्वांत जास्त आनंद होतो, तर म्हणतो आईला. कारण विचारलं तर म्हणतो, 'ती ओरडते पण माझं वागणं चुकीचं असतं तेव्हाच फक्त ओरडते.' मी स्वतः विचार करून बघतो त्याप्रमाणे मला माझे वडील आईपेक्षा जास्त आवडायचे. प्रत्यक्षात दोघंही रागवायचे, मारायचे पण वडलांशी माझा संवाद जास्त चांगला होता. एक गोष्ट आमच्या आई-वडलांच्या बाबतीत मला नेहमी जाणवते. मुलांचं बोलणं, करून बघणं, वाढणं याच्या निरीक्षणात खूप मजा असते. माझ्या आईवडलांना ती मजा समजली नाही. शोभा आणि मी यांनी मात्र शोनील, आभाला वाढवण्याचा आनंद घेतला.

काही पालकत्वातले खास प्रश्न आहेत, ते सांगतो. पुरुष पालक म्हणून आपल्या मुलावर लादलेल्या खूप अटी असतात. स्वतःचा अहंकार, खानदान, परंपरा, संकोच, भीती अशा चिंतांमुळे 'एवढं सोडून काय ते बोल'ची आपली यादीच खूप मोठी असते. त्याचा अर्थ बोलू नकोस हा मुलांना कळतो आणि शेवटी बाप-मुलगा, बाप-मुलगी संवाद तुटतो. 'नो बार' म्हणजेच कुठचाही विचार वर्ज्य नाही अशा भूमिकेशिवाय 'जनरेशन गॅप' भरून काढणं शक्य नाही.

'लग्न पहावं करून' पुस्तकानंतर माझ्याशी वाद घालायला येणाऱ्यांपैकी जास्तीतजास्त पुरुष होते. 'मी माझी विचारधारा मांडलीय् त्यात खरं म्हणजे' तुम्ही असं करा असं माझं म्हणणं नाहीय्, असं मी म्हणत होतो. त्यांना तसं वाटलं कारण स्वतःचा विचार इतका प्रकटपणी मांडलेला पाहाण्याची सवय नव्हती. स्त्रियांच्या प्रतिक्रिया निराळ्या होत्या. एवढं वास्तवात प्रत्यक्ष उतरणं फार कठीण आहे अशी त्यांना मुख्य काळजी असायची. तेही खरं होतं.

आई आणि वडील हे दोन पालक असले तरी त्यांना आपण 'पालक' हे एक 'व्यक्तिमत्त्व' समजूया आणि मुलं एक, दोन, चार कितीही असली तरी त्यांना आपण 'मुलं' असं दुसरं 'व्यक्तिमत्त्व' समजूया.

या दोन व्यक्तिमत्त्वांच्यात असायला हवा तो संवाद नाही ही खरी मुख्य अडचण आहे. खऱ्या संवादासाठी तीन गोष्टी लागतात.

1) निःस्वार्थी प्रेम
2) दुसऱ्याचं ऐकण्याची कला. त्यात एकाग्रतेचं कसब आणि वेळ असणं आलंच.
3) व्यक्त करण्याची कला. व्यक्त करताना, बोलताना, खरं, स्पष्ट, गोड, थोडक्यात आणि वेळेवर ते सांगता आलं पाहिजे.

दुर्दैवाची गोष्ट अशी की, या तीनही बाबतींत सर्वसाधारण पुरुष पालक चुकीचं वागतात. ती चूक सुधारण्यातला पहिला टप्पा म्हणजे या प्रश्नाबद्दल पुरुषांनी बायकोशी, मुलांशी, घरातल्या इतर कुटुंबियांशी आणि आमच्याशी संवाद साधायला सुरुवात करायची.



## 7) पालकत्वाचे नवे प्रश्न / उपायांचा शोध

एवढे सगळे प्रश्न विचारल्यानंतर एकेक जण काही काही सांगायला लागतो. एकावरून दुसरा मुद्दा निघतो, दुसऱ्यातून तिसरा असे मुद्दे निघत जातात. मी आणि शोभा सांगतो, की आत्तातरी आमचं काम प्रश्न निर्माण करणं आहे. हे भाषण असतं तर आम्ही थेट एकामागून एक उत्तरं सांगत सुटलो असतो पण कार्यशाळेमधे तुम्ही उत्तरं शोधलीत तर तुमचा सर्वांत जास्त फायदा आहे. आपण अशी सुरुवात करूया की, तुम्ही मुलांसंबंधी ज्या दोन चांगल्या गोष्टी करता असं तुम्हाला वाटतं त्या सांगा. त्यानंतर तुमच्याच दृष्टिकोनातून मगासपासून आपण जे जे बोलतो आहोत ते सगळं लक्षात घेऊन तुम्ही चुकीच्या कुठच्या दोन गोष्टी करता तेही सांगा.

बऱ्याच पालकांना आपण काय चुकीचं करतो आणि काय बरोबर करतो हे साधारण साधारण माहिती असतं. कुठून कुठून वाचलेलं असतं, शोभाताईंची पुस्तकं वाचलेली असतात. बहुतेकजण सांगतात, की त्यांना आम्ही पैसे कमी पडू देत नाही आणि चांगल्या शाळेत घालतो. एवढ्या दोन चांगल्या गोष्टी करतो. चुकीच्या गोष्टींबद्दल बहुतेक पालक मान्य करतात की आम्हाला राग आवरता येत नाही आणि घरातल्या ज्येष्ठ मंडळींशी कसं वागावं हे आम्हालाच खुद्द समजत नाही त्यामुळे बहुतेक आम्ही मुलांचे प्रश्न टाळतो किंवा त्यांना गप्प बसवतो.

पालक म्हणून तुम्ही आत्ता जसे वागत आहात ते तुम्ही कुठून शिकला असाल तर स्वतःच्या बालपणातून. तुमच्या पालकांनी तुम्हाला जसं वागवलं तसंच तुम्ही तुमच्या मुलांना वागवायला जाता. पण मधल्या काळामधे साधारण 20-25 वर्षं गेल्यामुळे फार झपाट्यानी सगळे संदर्भ बदललेले आहेत त्यामुळे तुमचे लहानपणचे संदर्भ म्हणजेच तुम्हाला असलेलं पालकत्वाचं ज्ञान आता उपयोगी पडत नाहीय ही तुमची मुख्य अडचण आहे.

ही अडचण सोडवण्यासाठी आपण थोडासा थिअरीचा आधार घेऊ. तुमच्या मुलांनी आयुष्यात यश मिळवावं म्हणून तर सगळी धडपड चालू आहे. यश म्हणजे तीन घटकांवर अवलंबून असलेली गोष्ट असते. एक म्हणजे उपजत गुण. तुमच्या पूर्वजांच्या काही पिढ्यांपासून चांगले-वाईट सगळे गुण तुमच्या

मुलांपर्यंत पोहोचू शकतात. दुसरी गोष्ट म्हणजे मेहनत. मेहनत मुलानी घेतलेली आणि योग्य वाढीसाठी तुम्ही केलेली. आणि तिसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे त्या मुलाचं नशीब. ते तुमच्या मुलाच्या हातात नाही आणि तुमच्याही हातात नाही.

थोडक्यात ज्या मेहनतीबद्दल आपण बोलतो आहोत ती एकच गोष्ट खरं म्हणजे आपल्या हातात आहे. त्याचे दोन भाग आहेत. एक म्हणजे आपण केलेले संस्कार. म्हणजे त्यासंबंधीचे विचार आणि दुसरा भाग म्हणजे तंत्र. याच्यावर सतत लक्ष असायला पाहिजे. त्याशिवाय मुलावर शाळा, मित्रमंडळी असे इतरांचेही संस्कार होणार आहेतच. त्याच्याकडेही आपलं सतत लक्ष असलं पाहिजे. वाईट संस्कारांपासून मुलाला वाचवणं आणि चांगल्या संस्काराला उत्तेजन देणं एवढं आपण करू शकतो.

तुम्ही पालक म्हणून 'परफेक्ट' असणं शक्य नाही, पण 'परफेक्शनिस्ट' असायला हरकत नाही. कित्येकांना या दोन शब्दातला फरक माहीत नसतो. मुद्दाम सांगतो, 'परफेक्शनिस्ट' या अर्थ परफेक्शनसाठी प्रयत्नाची पराकाष्ठा करणारा. मुलांशी वागताना एवढे प्रयत्न केले की अेफिशियन्सी म्हणजे कार्यक्षमता वाढेल. स्वतःच्या वागणुकीतली सुधारणा बायकोमुलांना दिसेल आणि मग 'सुष्टचक्र' सुरू होईल. नवराबायकोचे संबंध सुधारतील आणि मुलांनाही फायदा होईल.

माझ्याबद्दल दोन-तीन गोष्टी सांगतो. माझ्या मते लहानपणी झालेल्या माझ्या आईवडलांच्या पालकत्वाच्या चुका आत्ता माझ्यात दिसताहेत. पहिली एक गोष्ट म्हणजे मला स्वतःला स्वयंपाक येत नाही. दोन बहिणी आणि मी एकटा मुलगा असं असल्यामुळे मला मुलगा म्हणून वाढवलं ही माझ्या आईवडलांची पालकत्वातली चूक मला जाणवते. शोभा गरवारे बालभवन चालवते आणि बाजारातल्या आर्थिक, भावनिक, वैचारिक भ्रष्टाचारापासून बालभवनला दूर ठेवू शकते. हे शोभामधे कसं आलं याचं कारण तिच्या आईवडलांच्या पालकत्वात असलं पाहिजे. माझ्या धंद्यातला एकजण लोकांसाठी काही करायचं याच्या संपूर्ण विरुद्ध कायम वागायचा. त्याचं मूळही मला माहिती होतं कारण त्याच्या आईवडलांना पण मी चांगलं ओळखायचो. वडलांनी केलेल्या लहानपणापासूनच्या सामाजिक कामाचा अतिरेक आणि सबंध कुटुंबानी भोगलेला त्रास यात मला त्याच्या वागणुकीचं मूळ दिसत होतं.

माझं स्पष्ट मत झालेलं आहे की, पालक शिक्षण हा विषय नवराबायको दोघांनी शिकण्याचाच आहे. अंदाजे गेल्या 20 वर्षांत यातला किंचित बदल

शोभाला आणि मला दिसतो आहे. पालक शिक्षणाचा वर्ग जाहीर केला की अगदी 50-50 टक्के नाही, पण 30-40 टक्के पुरुष त्यात नाव घालतात हा मला खूप मोठा बदल वाटतो. 35 वर्षांपूर्वी मी आणि शोभा जेव्हा पालक-शाळेला गेलो होतो तिथे 20-22 लोकांच्यात मी आणि आणखी एक जण असे फक्त दोघं पुरुष होतो. त्या काळापासून मी एक वाक्य नेहमी ऐकलेलं आहे, 'तुम्ही म्हणता ते सगळं बरोबर आहे, पण आमच्या 'ह्यांना' कोण सांगणार?' पुरुष पालकाच्या बाजूनी मांडण्याजोगा एकच मुद्दा मला तेव्हापासून दिसतो आहे. पैसे मिळवण्याच्या दुष्टचक्रात पुरुष जास्त जास्त अडकत चालला आहे. त्या व्यवसायातल्या कामाच्या वेळा असोत नाहीतर जबाबदारीच्या पदावरच्या नोकऱ्या असोत, हळूहळू कामाचे तास वाढतच जातायत.

सबंध घरावर कुठेही पाटी लावलेली नसते, घरात नसते, बाहेर नसते पण वागणुकीमधे घरावरचा लोकशाहीचा संस्कार मात्र थोडसं वागल्यानंतर कळायला लागतो. त्या विशिष्ट घरात लोकशाहीचा संस्कार आहे की नाही, स्त्री-पुरुष समानतेचा संस्कार आहे की नाही हे कुटुंबाला न भेटता सुद्धा गरवारे बालभवनमधे मुलं खेळायला येतात; त्यांच्या बोलण्यातून कळतं. त्यांनी स्वतंत्रपणे केलेले आईचे उल्लेख, स्वतंत्रपणे केलेले बाबांचे उल्लेख ह्याच्या प्रमाणातला फरक आणि दोघांचा एकत्र उल्लेख याचं प्रमाण यावरून हे वातावरण लक्षात येतं. बरेच वेळेला एखाद्या मुलाची आई बालभवनमधे बऱ्याच वेळेला भेटल्यामुळे शोभालाच काय, मलासुद्धा माहिती असते. वडील कधीही बघितलेले नसतात आणि मुलं आईवडलांचा उल्लेख अशा शब्दांत करतात, - 'आमची आई बुद्दू आहे आणि वडील म्हणजे हिटलर आहेत.'

अशा कुटुंबातलं नेमकं घरातलं वातावरण आपल्याला कळू शकत नाही, पण आईवडलांचं फार बिनसलं तर मुलांवर झालेले परिणाम मात्र बालभवनच्या ताईला, मग शोभाला आणि शोभा माझ्याशी चर्चा करते त्यामुळे मला असे कळतात. शोभा पालकत्वाविषयी बोलते त्याच्यामधे मुलांवर झालेल्या दुष्परिणामांचे अनेक प्रकार ती सांगू शकते आणि मी सांगू शकत नाही याचा अर्थ तुम्हाला कळलाच असेल. पुरुष-पालक म्हणून याविषयी लिहिताना आधीच मान्य केलं आहे की, माझी स्वतःची आमच्या मुलांबरोबर शोभाच्या तुलनेत कमी मैत्री आहे आणि आमची मुलं आता इतकी मोठी आहेत की यापुढे ही चूक सुधारण्याजोगी सुद्धा नाही.

मुलांना किती कळतं याबद्दल पुरुषांच्या फार गैरसमजुती असतात. याबद्दल समजावून सांगितल्यावर जरा बदल होतो. तीन नि चार वर्षं वयाच्या मुलांशी बोलतानाही हळूहळू पालक मान्य करतात की, आपण समजतो त्यापेक्षा लहान मुलांना खूप काही कळत असतं. लहान मुलं म्हणजे अखंड चालू असलेला व्हिडिओ कॅमेरा असतो. मुलं काही बोलत नाहीत, पण आपले सगळे संवाद, चांगलं-वाईट वागणं त्यांनी पद्धतशीरपणे 'रेकॉर्ड' केलेलं असतं. त्या रेकॉर्डिंगचा वापर मात्र ती मुलं नंतर आयुष्यात केव्हाही करतात. केव्हातरी मुलाकडून काहीतरी अनपेक्षित आपण ऐकतो आणि लक्षात येतं की, अनेक वर्षांपूर्वी तयार झालेली ती व्हिडिओ कॅसेट आता लागलीय.

आपलं पालक म्हणून मुलांबद्दल निरीक्षण जास्त का मुलांनी पालकांचं केलेलं निरीक्षण जास्त याबद्दल नेहमीच चर्चा निघते. या स्पर्धेत सरशी होणार याची पालकांना खात्री असते. पालकशाळेत मुलं हजरच नसतात. त्यामुळे 'हा सूर्य आणि हा जयद्रथ' होऊ शकत नाही. पालक-शाळेत त्यातल्या त्यात 'रोल-प्ले' होऊ शकतो. अगदी थोड्या कार्यशाळा पालक-मुलं एकत्र अशा असतात. त्यामधे बऱ्यापैकी मोठ्या मुलांना पालकांची भूमिका करायला आम्ही सांगतो आणि पालकांना मुलांची भूमिका. अगदी स्पष्टपणी कळतं की मुलांना पालकांच्या सवयी, लकबी, बोलण्याची पद्धत, शब्दांची निवड जास्त माहिती असते. त्या तुलनेत पालकांना मुलांबद्दल बेताचीच माहिती असते. बाबांना तर जवळ- जवळ नसतेच.

खरा नीट विचार केला तर कुठल्याही दोन माणसांच्या, दोन समूहांच्या नात्यामधे ज्याच्याकडे जास्त सामाजिक अधिकार त्याच्यावर योग्य वागण्याची जबाबदारी जास्त असते. आपला समाज पुरुषप्रधान आहे म्हटल्यासरशी लहान मुलांशी योग्य वागण्याची जास्त जबाबदारी पुरुषावर आहे.

थोडक्यात आई-बाबा पालकांना एक महत्त्वाची गोष्ट कळायला हवी आहे की 25-30 वर्षांपूर्वी आपण लहान असताना आपल्या आईवडलांसमोर जे प्रश्न आणि जी उत्तरं असणार त्यांत खूप बदल झालेले आहेत. त्या वेळचं गृहीत होतं की मुलांना काही कळत नाही. आता आपण सगळ्यांनी मान्य करायला हवं की त्यांना बरंच कळतं. जगाचा अनुभव आपल्या तुलनेत मुलांना कमी असतो त्यामुळे माहिती आणि ज्ञानात मुलं आपली बरोबरी करू शकत नाहीत. भावना समजण्यात आणि व्यक्त करण्यात ती आपल्यापेक्षा तयार असतात. त्या भावना

शब्दात व्यक्त करण्याइतकं भाषाज्ञान त्यांना नसतं. त्यामुळे व्यक्त करताना मुलं देहबोलीचा वापर आपल्यापेक्षा जास्त चांगला करतात.

आठवून बघा. 25-30 वर्षांपूर्वी आपण कसे होतो? अगदी खरं सांगायचं तर सध्याच्या मुलांच्या तुलनेत बावळट होतो. 'टेलिव्हिजन'मुळे, शाळांतल्या बदललेल्या वातावरणामुळे, शिक्षकांच्या बदललेल्या वृत्तीमुळे, मित्रमंडळींच्या बदललेल्या वृत्तीमुळे पालकत्वाचे नवे प्रश्न समोर आहेत. त्याच्या उपायांबद्दल आपल्याला शोध घ्यायचाय.

उदाहरण म्हणून एक नवा प्रश्न सांगतो. माझ्या लहानपणी म्हणजे 60-65 वर्षांपूर्वी एखादं मूल खूप गोंडस, सुंदर असलं तर आईवडलांना निखळ आनंद वाटायचा. आमची मुलं जन्मली-वाढली त्या काळातदेखील आपली मुलं दिसायला चांगली आहेत याचा खरोखर निर्भेळ आनंद आम्हाला व्हायचा. मधल्या काळात समाजावरचे ताण आणि त्यामुळे निर्माण झालेल्या विकृती बघितल्या की मला याबद्दलदेखील प्रश्न पडतो. मुलगा सुंदर असला तरी समाजातला द्वेष वाढल्यामुळे लहानपणी त्याचं रक्षण करण्यामधे अडचणी येऊ शकतील. तरुणपणी इतर तरुण पुरुष त्याचा मत्सर करतील, तरुणी त्याला प्रेमाच्या जाळ्यात ओढायला बघतील. मुलगी सुंदर असली तर मैत्रिणी द्वेष करतील त्याचबरोबर विकृत पुरुषांपासून तिला तुलनेनी जास्त धोका असेल. थोडक्यात पालकांना सुंदर अपत्याबद्दल आनंद आणि चिंता दोन्ही गोष्टींना तोंड द्यावं लागेल. ही झाली समस्या. याच्या उपायाचा शोध घ्यावा लागेल.



## 8) मुलांना अपमानास्पद वागणूक

सर्वसाधारण पालकांचा असा विश्वास असतो की, मुलांशी कसंही बोललं तरी चालतं. पाहुण्यांच्या देखत, मित्रांच्या देखत मुलांचा अगदी सहजपणी अपमान केला जातो.

त्याबद्दलचं एक महत्त्वाचं मूलतत्त्व सांगतो. 'कोणाचाही अपमान करण्याचा कोणालाही अधिकार नाही.' मला कल्पना आहे की, हे वाक्य या पुस्तकसंचात 15-20 वेळेला तरी आलेलं आहे कारण ते प्रत्येकानी सबंध आयुष्यभर लक्षात ठेवण्याचं वाक्य आहे. पुस्तकातल्या प्रत्येक विषयात जिथे जिथे याचा संबंध येईल तिथे हे तुम्हाला सापडेल. आता मूळ मुद्दा. मुलं आपल्यापेक्षा वयानी लहान असली, आकारानी, अधिकारानी लहान असली तरी प्रत्येक वडलांनी लक्षात ठेवण्याचं हे वाक्य आहे. मागे मी म्हणालो की निव्वळ बाबांच्या काही कार्यशाळा घेतल्या होत्या, त्यांमधे मी त्यांना विचारलं की तुम्ही तुमच्या मुलांशी कसे वागला हे आठवून मला सांगा. काही बाबा मुलांना न मारणारे निघाले होते पण मुलांचा अपमान केल्याचं मात्र त्यांनी कबूल केलं.

मुद्दा असा आहे की, कुठच्याही वयात आपण काहीतरी चांगलं करतो आहोत, असं स्वतःला वाटणं हे आयुष्याचं मुख्य इंधन आहे. याचाच अर्थ प्रत्येकाचा सन्मान जपायलाच हवा. अगदी सहा महिन्यांच्या बाळापासून. जन्मल्यापासून असंही म्हणता येईल, पण पहिले सहा महिने सर्वसाधारणपणी सबंध कुटुंब तान्ह्या बाळाशी खास काळजी घेऊन चांगलंच वागतं. त्यानंतर वागणुकीत बदल व्हायला सुरुवात होते. साधारण 1 वर्षाचं मूल बोलायला लागतं. मग आणखी बदल होतो. 2-3 वर्षांनंतर मात्र मुलांबरोबरच्या पालकांच्या वागण्यात खूप बदल होतात. मुलं बोलायला लागलेली असतात, पसंत, नापसंत सांगायला लागलेली असतात. थोडक्यात संघर्षाची सुरुवात होते नि पुढे कोण कोणाचा अपमान करणार हे उघडच आहे.

प्रत्यक्षात मोठ्या माणसांच्या आणि लहान मुलांच्या बाबतीत मानसशास्त्रानी एक महत्त्वाची गोष्ट आपल्या सगळ्यांना सांगितलीय्. साध्या थोडक्या शब्दांत ती अशी आहे, 'कौतुक करायचं असलं तर लगेच जाहीरपणी करा आणि टीका

करायची असली तर काही वेळानी खाजगीत करा.' काही वेळानी म्हणजे तासाभरानी का दुसऱ्या दिवशी ते त्या व्यक्तीवर आणि प्रसंगावर ठरतं. ही एवढी गोष्ट जरी पालक करू शकले तरी खूप फरक पडेल. एकूण वातावरणच बदलेल.

एक पालक शोभाला आणि मला मुलाच्या देखत सांगत होते की, तो पार बिघडलेला आहे. हे जर असं तो मुलगा सारखं सारखं ऐकत असला तर बिघडेल नाहीतर काय! ते वडील या बोलण्याला पारदर्शकता समजत होते. प्रत्यक्षात ही अपमानास्पद वागणूक आहे. त्या पालकांना समुपदेशनाची फार गरज आहे. मुलांशी बोलताना पालकांनी वापरण्याची बरीचशी वाक्यं अपमान करणारीच असतात असं माझं निरीक्षण आहे. काही वाक्यं सांगतो, तुम्ही ती किती वेळा तुमच्या आईवडलांकडून ऐकलेली असतील ते आठवून बघा आणि तुम्ही किती वेळा तुमच्या मुलांना बोलता तेही आठवून बघा.

1) एकदा सांगून कळत नाही का?
2) डोळे फुटले का?
3) बहिरा झालास का?
4) आत्ताच तू काय कबूल केलंस? मग हे काय चाललंय?
5) तिथे ठोंब्यासारखा नुसता बसू नकोस.
6) धावत जाऊन पळत ये.
7) मला चार घासही सुखानी खाऊ देत नाहीत कारटी.
8) तू वेड्यासारखी वागतेस. आता काही जेवायबिवायला मिळणार नाही.
9) हातातून एखादी वस्तू पडली की 'जेवलास का नाही?'

आमच्या ओळखीची एक बाई आहे. मुलगा साधारण 5 वर्षांचा आणि आई साधारण 30 वर्षांची. एकदा आम्ही काही निमित्तानी साधारणपणे दिवसभर बरोबर होतो. काहीही बारीक गोष्ट मुलानी केली की, ती लगेच 'मारू का?' म्हणायची. प्रत्यक्षात ती हातही उगारत नव्हती, मुलाकडे रागावून पाहात नव्हती, जागेवरून उठत नव्हती, कित्येक वेळा मुलाकडे न बघता सुद्धा मारू का, म्हणत होती. दिवसभरात आमच्यादेखत साधारण 50 वेळा म्हणाली तर एरवी किती

वेळा असेल! मारणं हा शब्दच तिच्या आणि तिच्या मुलाच्या दृष्टीनी निरर्थक बनला होता.

मुलांच्या बाबतीतलं एक उपयोगी निरीक्षण सांगतो. लहान मुलं कधी कधी इतरांचं लक्ष त्यांच्याकडे जावं म्हणून वेडेवाकडे चाळे करतात. ''तसं करू नकोस'', असं सांगितलं की, जास्त चेकाळल्यासारखं करतात कारण रागावून का होईना, मोठ्या माणसांनी आपल्याकडे पाहावं, ही इच्छा असते, ती पूर्ण होते. अशा वेळी दुर्लक्ष केलं, तरच ती शांत बसतात, वेडे चाळे थांबवतात.

माझं आणि शोभाचं मत अगदी पक्कं आहे. मुलांना त्यांची चूक जरूर समजावून सांगावी, पण कधीही त्यांचा अपमान करू नये. मुलांचा आत्मविश्वास आपण जपू शकलो तरच पुढे सगळं ठीक होईल. मुलांना जिन्यात ठेवण्याची धमकी, वॉचमनला बोलावण्याचा धाक, सहलीला न पाठवण्याची तंबी, 5 आकडे म्हणायच्या आत आलंच पाहिजे, जेवलंच पाहिजे या सगळ्या संभाषणांचा अर्थ अपमान असाच होतो. पालकांना विनंती अशी आहे की, त्यांनी या गोष्टी कटाप करून न खेकसता शांतपणी समजावून सांगण्याचा प्रयोग किमान एक महिना तरी करून त्याचे परिणाम बघावेत.



# 9) मुलं बिघडण्याची कारणं

मगाशी आपण बोललो होतो ती गोष्ट पुन्हा सांगतो. मोठी माणसं आणि मुलं यांच्या शरीरात बराच फरक असला तरी भावनांच्यात आपल्याला वाटतं त्यापेक्षा फार कमी फरक असतो. आनंद, दुःख, राग, निराशा, मत्सर, वैताग अशा तऱ्हेतऱ्हेच्या भावना आपल्याला जशा असतात तशाच मुलांनाही असतात. खरी गोष्ट अशी आहे की, आपल्याला त्या भावना व्यक्त करण्याचे शब्द जास्त माहिती असतात पण आपल्या खऱ्या भावना मुलांच्या तुलनेत बऱ्यापैकी बोथट झालेल्या असतात. मुलांच्या भावनांची तीव्रता जास्त असते, पण शब्दसामर्थ्य कमी असतं म्हणून ते आदळ-आपट, रडणं, हातपाय आपटणं, विध्वंस करणं, मारणं वगैरे पद्धतींनी भावना व्यक्त करतात.

आपल्यापेक्षा मुलं जास्त अविकृत म्हणजे नॉर्मल असतात पण त्यांच्या शरीराची आणि अनुभवाची परिपक्वता कमी असते. मुलात आणि मोठ्या माणसात जो फरक आत्ता वर्णन केला आहे तो फरक हळूहळू कमी होत जातो. वय तर दोघांचंही वाढतंच पण आपला अनुभव आणि परिपक्वता मुलांच्या वेगानी नक्कीच वाढत नाही. तो कमी होत जाणारा फरक कळणं म्हणजे पालकत्वाचं शिक्षण आहे.

एक उदाहरण देतो. एखादी गोष्ट तुम्हाला पटली असं तुम्ही म्हणालात, मनाशी पक्कं ठरवलं, बायकोशी बोललात तरी बदलायला लागणारा वेळ चार-सहा महिनेच काय कधीकधी काही वर्षं एवढासुद्धा लागतो. याच बाबतीत मुलांशी तुलना केली तर मुलांना पटलेली गोष्ट ती 15-20 दिवसांत सुद्धा बदलतात. आपण सर्व बाबा लोकांनी ही महत्त्वाची गोष्ट लक्षात घेतली तर आयुष्य खूप सोपं होईल. प्रत्यक्षात मात्र परिस्थिती अगदी उलट असते. आपल्या तोंडात बसलेली दोन वाक्यं म्हणजे 'एकदा सांगून कळत नाही का?' आणि दुसरं, 'तरी मी तेव्हा सांगत होतो.'

एक इंग्लिशमधलं गमतीशीर वाक्य सांगतो, 'इफ यू लिसन टू देअर नॉनसेन्स, दे विल लिसन टू युवर सेन्स.' एखादं मूल जेव्हा बिघडतं तेव्हा ते आईवडलांच्या दृष्टीनी बिघडलेलं असतं, कारण आईवडलांनी बिघडणं म्हणजे

काय याची लक्षणं ठरवलेली असतात.

पहिलं महत्त्वाचं लक्षण म्हणजे मूल प्रत्येक बाबतीत खोटं बोलायला लागतं. एक शक्यता अशी आहे की, तुम्हाला मुलाच्या देखत खोटं बोलण्याचा प्रसंग येत असेल, तेवढं टाळा. दुसरं म्हणजे मुद्दाम काही गोष्टी मुलाच्याजवळ कबूल करा. मुलाची मूळ इच्छा खरं सांगण्याचीच असते, पण काहीतरी कारणामुळे ते खोटं बोलायला सुरुवात करतं. कारणाच्या शक्यता तुम्ही सांगा, कशाला तरी ते हो म्हणेल. या खेपेला नाही तरी पुढच्या खेपेला ते नक्की खरं बोलायला सुरुवात करेल. तेव्हा मात्र त्याला रागावू नका. तरच त्याला खरं बोलण्यासाठी प्रोत्साहन मिळेल. घरात शक्य असलं तर एखादी निराळी खोली अशासाठी ठेवा, केबिन ठेवा, बाहेर दोघंच हिंडायला जा, गच्चीवर जा, मुलाची 'प्रायव्हसी' जपा. त्याचा सन्मान सांभाळत सांभाळत ते हळूहळू सुधारणार हे नक्की ध्यानात ठेवा.

हट्टीपणा करणारं, किंचाळणारं, हातपाय आपटणारं, रागीटपणे वस्तू फेकणारं किंवा कुणाचंतरी बघून स्वतःचं डोकं आपटून घेणारं असं मूल म्हणजे बिघडलेलं. खरं म्हणजे प्रत्यक्षात तुम्हाला या वर्णनाचे य प्रकार आढळतील. पण हे लक्षात यायला सुरुवात साधारण दुसऱ्या वर्षापासून होते. कोणाकडून तरी ते मूल शिकतं, निरीक्षण करतं आणि ते करून बघतं. पण खरं म्हणजे ते मूल कुठच्यातरी कारणामुळे वैतागलेलं असतं. हे लिखाण मी पुरुष पालक म्हणून करतो आहे आणि मला कल्पना आहे की, आमची मुलं या वयाची होती त्या वेळेला मुलं कशामुळे वैतागायची हे शोभाकडूनच मला कळायचं. मी व्यवसायामुळे 'आठवड्यातून दहा दिवस' बाहेर असायचो. कित्येक वेळेला मी नाही यामुळे शोभा वैतागलेली आणि तो वैताग तिनी मुलांपर्यंत पोहोचू नये अशी कितीही धडपड केली तरी तो मुलांपर्यंत पोचायचा. आमची मुलं त्यामानानी शहाणी होती त्यामुळे असे प्रकार बेतात होते.



## 10) आईवडलांचं एकमेकांशी नातं

बालमानसशास्त्रज्ञ कदाचित याच्यावर आणखीन प्रकाश टाकू शकतील पण आत्तापुरतं आपण मानूया की सहा महिन्यांपासून तुम्ही कसे वागता आहात हे मुलाला कळायला लागतं आणि किंचित का होईना मूल स्वतःच्या भावना व्यक्त करायला लागतं. मुलाचं मानसिक स्वास्थ्य एका महत्त्वाच्या गोष्टीवर अवलंबून असतं ते म्हणजे मुलाच्या आईवडलांचे संबंध एकमेकांशी कसे आहेत.

माझ्या ओळखीचं एक कुटुंब आहे. आईवडलांचे संबंध ताणलेले. बायको कायम वैतागलेली. मुलांना ओरडते. नवराबायको मुलांच्या देखत भांडतात, मुलांना दोघंही खूप ओरडतात. आई ओरडल्यामुळे तो ताण मोठ्या भावंडावर येतो नि धाकटं भावंड लहान असल्यामुळे मोठ्याचं अनुकरण करतं.

कधीकधी आया फार हिंसक बोलतात. मुलानी एखादा वेडेपणा केल्यावर त्याला इजा झाली तर, 'तुला आणखी लागायला पाहिजे होतं', असं चक्क त्याला म्हणतात. मुलांना कधी मारू नये म्हणणारा बापदेखील एकदा खूप चिडला आणि त्यानी मुलाला मारलं, कारण बघितलं तर मुलगा आधी कशामुळे तरी दुखावला होता. त्याला शांत करताना पुरेवाट झाली. काहीही झालं तरी आपण स्वतःचा तोल जाऊ न देणं हेच खरं.

मानसशास्त्रामधली एक थिअरी स्पष्ट करून सांगतो, आपल्या स्वतःच्या आयुष्यातली सर्वांत महत्त्वाची व्यक्ती आपण स्वतः असतो हे मान्यच करून टाकूया. जोडीदार म्हणजे आपल्या आजच्या विषयाच्या संदर्भात बायको ही स्वतःच्या खालोखाल महत्त्वाची व्यक्ती असावी अशी अपेक्षा आहे. पण तसं खात्रीनी सांगता येत नाही. मुलाच्या देखत किंवा अपरोक्ष पुरुष पालक त्याच्या बायकोशी कसा वागतो हे मुलांना जणू काही अंतर्ज्ञानानी कळतं. नवराबायकोच्या वागण्यामधे जर काही ताण असेल तर तो मुलांपासून लपवणं अशक्य आहे. कारण आईवडलांचे एकमेकांशी असलेले संबंध याबाबतीतली मुलांची संवेदना आपल्यापेक्षा खूप तीव्र असते. त्याखेरीज ती सूक्ष्म पण असते. तुम्हाला खूप आश्चर्य वाटेल पण पाच-सात वर्षांच्या मुलाला व्यक्त करता येत नसलं तरीही आईवडलांचे लैंगिक शारीरिक संबंध समाधानकारक आणि प्रेमाचे आहेत की

नाही हे देखील कळतं.

मगाच्या थिअरीकडे पुन्हा जरा वळू. नंबर एकवर आणि दोनवर आईबाबा याबद्दल कोणाचं काही म्हणणं नसतं. ही थिअरी शोधून काढायला मानसशास्त्राला अनेक वर्षं लागली असली तरी अनेक वर्षांपासून मुलांना हे कळतंच की, आपले आईवडील हे एकमेकांच्या सर्वांत जवळचे आहेत. आपण नंबर तीनवरही नसलो तर मात्र मुलांना त्रास होतो. आता त्या पुढचा नंबर कोणाचा हा भारतीय कुटुंबात गुंतागुंतीचा प्रश्न होऊ शकतो. नंबर चारवर आईचे आईवडील किंवा वडलांचे आईवडील असं असलं तर ठीक आहे पण त्या नंबर चारच्या स्पर्धेमधे भारतीय एकत्र कुटुंबांच्यात फार स्पर्धक असतात. मुलांचा या नात्याबद्दल खूप गोंधळ होऊ शकतो. इतर फायदे आपल्याला अमान्य नाहीत. आत्ता इथे स्वतंत्र किंवा एकत्र कुटुंबाच्या बाजूनी काही सिद्ध करणं हा उद्देश नाहीय्.

मूळ मुद्दा जो पुरुष पालकांच्या वागण्याचा आहे तो आपल्याला स्पष्ट करायचा आहे. असं एक वाक्य तुम्ही ऐकलेलंही असेल, ‘बाबांनी मुलांसाठी काही करायचं असेल तर एकच महत्त्वाची गोष्ट करा; मुलांच्या आईवर प्रेम करा.’ प्रेम करणं आणि नातेसंबंध जवळचे असणं याबाबतीमधे महत्त्वाचा उल्लेख करतो आणि पुढच्या मुद्द्याकडे वळतो. सर्व बाबांनी लक्षात ठेवायला पाहिजे की, मुलं तुमच्या दोघांवर खूप अवलंबून असतात आणि लहान मुलं तुमच्यावर जेवढं प्रेम करतात तेवढं इतर कोणीही करत नाही. हे सगळं केवळ लहान मुलांचं वर्णन झालं. मोठेपणी हे चित्र पूर्ण उलटं होतं. मुलांचं आपल्या आईवडलांवर जेवढं प्रेम असतं त्यापेक्षा आईवडलांचं मुलांवर जास्त असतं. ह्याचाच पुढचा अर्थ तुमच्या मुलांना जेव्हा मुलं होतील तेव्हा त्यांचं तुमच्यापेक्षा तुमच्या नातवंडांवर जास्त प्रेम असेल.

शोभा समजूतदार पालकांपैकी असल्यामुळे आमच्या संसारात हा त्रास फार झाला नाही. पण मूळ मुद्दा असा आहे की, साधारण दुसऱ्या वर्षापासून मूल स्पष्ट प्रतिक्रिया व्यक्त करायला लागतं. त्याचा पुरुष पालकांशी काही संबंध नाही असं तर अजिबात म्हणता येत नाही. म्हणजे फार तर असं म्हणता येईल की, नवऱ्यानी बायकोला ताण दिला आणि त्यामुळे बायकोनी मुलांना. पण सारांशात हा विषय असा आहे; लहान मुलाला नेमकं काही कळत नसलं तरी आपल्या आईवडलांचं जे काही चालू आहे ते बरोबर नाही एवढं त्यांना कळतं आणि मूल बिघडायला तिथेच सुरुवात होते. दोनच वाक्यं आत्ता लक्षात ठेवण्याजोगी आहेत.

1) तुमच्या मुलासाठी तुम्हाला खरोखरच काही करायचं असेल तर मुलाच्या आईवर मनापासून प्रेम करा.
2) सुसंस्कृत घर जैसी कोई पाठशाला नही और इमानदार तथा सदाचारी मातापिता जैसे कोई शिक्षक नही.

मूल बिघडायला नको असेल तर रोजचं साधं, घरातलं स्वस्थ आणि समाधानी वातावरण हे अगदी पुरेसं असतं. ते शाळेत जायला लागलं की बिघडवणारा आणखी एक घटक वाढतो. आपल्या शिक्षण व्यवस्थेत घराचा सहवास जास्त आणि शाळेचा कमी असं असतं त्यामुळे त्याची फार काळजी करण्याची गरज नाही. मूल आणखी थोडं मोठं झालं की मुलाचे शाळेचे तास वाढतात, साहजिकच घरचे कमी होतात. थोडक्यात बिघडण्याची शक्यता निर्माण होते. शाळेमधे आपल्या मुलाचे जवळचे मित्र कोण, मैत्रिणी कुठल्या, व्हॅनमधे जाणारी-येणारी मुलं कोण या सगळ्या गोष्टी बहुतेक घरांत थेट आईवर सोपवलेल्या असतात.

कधीकधी पालकशाळेत असा विषय निघतो की, 'फॅमिली बजेट'मधे मुलावरचा खर्च आणि मोठ्यांवरचा खर्च हा व्यवस्थित लिहून काढून तपासावा. अगदी थोड्या प्रमाणात का होईना पण ही सूचना लोकं मान्य करायला तयार असतात. त्याच्यापुढचा विषय पालकशाळेत जेव्हा निघतो की आता तुमचं टाईम बजेट पण मांडा तिथे सगळेच्या सगळे पुरुष गप्प होतात. प्रत्यक्षात मूल हे प्रॉजेक्ट नवराबायको दोघांनी आखलेलं आहे त्यामुळे पैसे, वेळ, श्रम, बुद्धी या सगळ्याच्या बजेटमधे नवऱ्याचा सहभाग पाहिजेच.

एखादं जोडपं म्हणतं की हा मुद्दा मान्य आहे पण या कारणामुळे आमच्या बजेटमधे एकच मूल बसतं तर त्याला आपली काही हरकत नाही. आपली हरकत कशाला आहे तर दोन मुलं पाहिजेत, मुलगा-मुलगी हवी हे सगळं म्हणायचं, काही लोक तीनचा सुद्धा विचार करतील, पण बजेटमधले पैसे, वेळ, श्रम आणि बुद्धी हे चारही घटक फक्त बायकोनी सांभाळायचे. हे आपल्याला अमान्य आहे. केवळ बायकोनी चारही गोष्टी सांभाळल्यामुळे मुलं पुढे बिघडली नाहीत अशी उदाहरणं नक्की सापडतील पण नवरे बायकोला हे श्रेयसुद्धा द्यायला तयार नसतात याचं मात्र फार वाईट वाटतं.

या बाबतीतला वैवाहिक जीवनातला एक महत्त्वाचा मंत्र सांगतो. नवरा-बायकोच्या वैचारिक-भावनिक आयुष्याचे साधारण 3 सारखे भाग असले तर

वैवाहिक आयुष्य समाधानी राहतं.

1) नवऱ्याचं विचार-भावना विश्व. ते त्याचं स्वतःचं स्वतंत्र असतं. ते बायकोपेक्षा निराळं असतं. त्यात बायकोचा सहभाग नसतो. त्या एक तृतियांश मधे त्याला संपूर्ण स्वातंत्र्य असतं. त्यात त्याचा व्यवसाय, छंद, करमणूक, वाचन, मनन असेल.
2) बायकोचं याच प्रकारे बनलेलं स्वतंत्र विचार, भावना विश्व, तिची करिअर असो, घरकाम असो, कला असो, वाचन, नातेवाईक, पण स्वतंत्र असणारं विश्व,
3) ज्यात दोघांची भावनिक गुंतवणूक, स्वप्नं, ध्येयं यात सहभाग असेल. सर्व गोष्टी समाईक असतील. अशा गोष्टी म्हणजे घर, मालमत्ता, नातेवाईक, करमणूक, कला, छंद असू शकतात. पण दोघांनी मिळून खूप लक्ष देऊन करण्याची सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे मुलं.

'माझं, तुझं आणि आपलं' या तीनही गोष्टींची प्रत्येक समाधानी जोडप्याला आवश्यकता असते हे मी पुन्हा सांगतो आहे. हा महत्त्वाचा भाग म्हणजे 'मुलं' ज्यांना नसतील त्यांचा 'आपलं' चा 'कोटा' कमी पडतो त्यामुळे असमाधानाची सावली पडते.

नवरा-बायकोच्या गरजांचं पारंपरिक त्रिसूत्र 'अन्न, वस्त्र, निवारा' असं होतं. प्रत्यक्षात आधुनिक त्रिसूत्र बदललेलं आहे. 1) अन्न, वस्त्र, निवारा मिळून त्याचं एकत्रित वर्णन म्हणजे चरितार्थ. 2) नवरा आणि बायको यांचे स्वस्थ-समाधानी लैंगिक संबंध 3) नवराबायको यांनी एकमेकांचा जपलेला सन्मान. इथे मी या आधुनिक त्रिसूत्राचा नुसता उल्लेख करतोय. त्याचे तपशील पुस्तकसंचात स्वतंत्रपणी दिलेले आहेत.



# 11) आजोबांची भूमिका

किती काळ माणसावर पालकत्वाची जबाबदारी असते याचा विचार केला तर मला वाटतं, आपल्या पहिल्या मुलाचा जन्म झाला की जी जबाबदारी सुरू होते ती अखेरपर्यंत संपतच नाही. लहान असताना मुलं आपल्यावर पूर्ण अवलंबून असतात. त्यामुळे त्या काळात सर्वांत जास्त जबाबदारी असते हे मान्यच आहे. त्यानंतर ती थोडी कमी झाल्यासारखी वाटते. मूल शाळेत जायला लागलं की त्याचं स्वरूप बदलतं. मुलाची अभ्यासातली प्रगती, खेळातलं प्रावीण्य, स्वभावातले कंगोरे या गोष्टी जास्त महत्त्वाच्या बनतात.

पुढे मुलांची कॉलेज-नोकरी, करिअर याप्रमाणे तपशील बदलतात पण पालकत्वाची जबाबदारी संपत नाही. त्यापुढच्या टप्प्यात मुलगा असो, मुलगी असो, त्यांची योग्य-अयोग्य मित्रमंडळी, प्रेमप्रकरणं, लग्न या सगळ्याची काळजी आणि जबाबदारी असते. मुलं हुशार, परिपक्व असली तर त्यांच्या आयुष्याची ते स्वतः जबाबदारी घेतात त्यामुळे आपली जबाबदारी कमी होते, पण संपत नाही. जरा वेळानी तरुणांचं पालकत्व या विषयावर आपण स्वतंत्रपणी बोलणार आहोत.

मुलांची लग्नं होतात, आपल्याला नातवंडं होतात आणि पालकत्वाच्या जबाबदारीचा प्रकार आणखी बदलतो आणि तरी सांगतो, नातवंडं आणि स्वतःची मोठी मुलं यांच्याशी कसं वागावं याचं शिक्षण जरुरीचंच ठरतं. आत्ता मी मुलांशी आणि नातवंडांशी वागण्याविषयी दोन-चार गोष्टी सांगणार आहे. आपण आजोबांची वागणूक यावर जरी भर दिला तरी आजीदेखील त्यातच आली असं समजा.

आता माझ्या आजोबाच्या भूमिकेबद्दल सांगतो. खरं सांगायचं म्हणजे मला नातवंडांचा अजिबात रागच येत नाही. त्यात गेल्या काही वर्षांत नातेसंबंधांच्या अभ्यासामुळे एक महत्त्वाची गोष्ट लक्षात आली की, लहान मुलं सतत करून बघत असतात, बोलून बघत असतात, वागून बघत असतात. त्याच्या परिणामांची त्यांना कल्पना नसते. त्यांना नुसता प्रयोग करायचा असतो. माझा मोठा नातू 'तू मला आवडत नाहीस', असं म्हणायचा. मला वाईट वाटायचं पण हेही कळायचं की, आमची खूप दिवसांत भेट नाही झाली की तो त्यांच्या घरात माझी सारखी

आठवण काढायचा, त्यांना बोलव म्हणायचा, आपण त्यांच्याकडे जाऊ म्हणायचा.

यावरून एक गोष्ट मला कळली ती अशी की, तो कोणीतरी त्याला म्हटलेलं वाक्य मला म्हणून बघत होता. त्याला खरं तसं अजिबात म्हणायचं नव्हतं. मग मी त्याला उत्तर द्यायचो, 'मी तुला आवडत नाही हे मान्य, पण तू मला आवडतोस त्याचं काय?' हळूहळू मोठा नातू हा प्रयोग करेनासा झाला आणि आता धाकट्या नातवानी सुरुवात केली. खरं सांगायचं म्हणजे सगळं कळत असूनसुद्धा मला वाईट वाटतंच. हे जसं मी बोलून बघण्याचं सांगितलं तसं मुलं करून पण बघतात. आजोबा हा प्राणी मारून बघायला एकदम सोयीचा असतो. त्यामुळे ते मारून बघतात, चिमटा काढतात, ओचकारतात.

त्यांना पक्कं माहितीय की, माझा चष्म्याचा नंबर जास्त असल्यामुळे मी सारखा चष्मा सांभाळण्याच्या मनस्थितीत असतो. त्यामुळे ते असंही म्हणतात, 'तुझा चष्मा फोडून टाकीन.' मी उपाय म्हणून काय करतो की, त्यांच्याकडे गेल्यागेल्या चष्मा उंच जागी काढून ठेवतो. त्यांना सांगतो की, माझा नंबर जास्त असल्यामुळे चष्म्याशिवाय मला खूप कमी दिसतं. मग कुतूहलामुळे त्याविषयीच्या प्रश्नोत्तरांकडे सगळं संभाषण वळतं. मुलांना प्रत्येकच गोष्टीत खेळ दिसतो त्यामुळे मुलांच्या दृष्टीनी त्यांना हा नवीन खेळ सापडतो. मग मला नेमकं किती दिसत नाही याची गमतीगमतीची वर्णनं चालू होतात. तो खेळच चालू झाल्यामुळे चष्मा फोडून टाकीन वगैरे सगळं विसरतात. मुळात त्यांना तसं करायचं असा उद्देश नसतोच; ते नुसतं हे बोलून बघत असतात.

हे जर सगळ्या पुरुषांना म्हणजे बाबा, आजोबा – सगळ्यांना कळायला लागलं तर बरीचशी रागवारागवी कटाप होईल. सांगायचं राहिलं असं नंतर वाटू नये त्यामुळे चष्म्याशिवाय माझं काय होईल याची दोन-तीन गमतीची वर्णनं सांगतो. त्यांचा कल्पनाविस्तार इतका भारी असतो की ते विचारतात, 'मग तू चहा तोंडानी पिण्याच्याऐवजी डोक्यावरच ओततोस का?', 'आमच्याऐवजी चुकून शेजारच्या घरी जातोस का? दारातून बाहेर जाण्याऐवजी खिडकीतून जातोस का?' अशी बोलून बघण्याची मजा 15-20 मिनिटं सहज चालते.

राग आवरणं हा अनेक लोकांचा प्रश्न असतो, त्यात सर्व बाबा, आजोबा म्हणजे पुरुष-पालक यांची अपमानाची संवेदना खूप प्रखर असते. त्यामुळे मुलांवर रागावणं हे त्यांना अगदी सहज जमतं. सर्वच बाबांना मला एक गोष्ट सांगायची आहे की, जरूर पडली तर राग आल्याचं नाटक करायलाही हरकत

नाही, पण खरं मनापासून रागवायचं नाही. मी मुलांवर म्हणजे नातवंडांवर रागवूच शकत नाही ही त्यांची एकदा खात्री पटली की त्यांच्या मागण्या वाढत जातात. खालच्या उंचीवरच्या घरातल्या अनेक वस्तूंची नासधूस हा तर सर्वांत आवडता खेळ असतो. मला आमच्या मुलीची सुद्धा याबाबतीत आडून आडून बोलणी खावी लागतात. मुलं खूप मागतील पण तू त्यांना ते दिलंसच कसं अशा अर्थाचा जाब मला मुलगी विचारते.

एवढ्या वर्षांच्या अभ्यासानंतर, अनुभवानंतर एका गोष्टीचं गणित मी अगदी झटपट मांडून मुलांच्या बाजूनी निर्णय घेतलेला असतो. त्या वस्तूची किंमत किती आणि मुलांना मिळणाऱ्या आनंदाची किंमत किती? हा विचार झटपट करणं जमलं तरी रागवारागवी बंद व्हायला लागते आणि अर्थातच फार मौल्यवान अशी वस्तू असली तर ती मुलांच्या हातात न देण्याचं भान मला कायम असतं. दुसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे जी गोष्ट करण्यानी मुलाला इजा होऊ शकेल अशी गोष्ट मी त्यांना करू देत नाही. एवढ्या दोन गोष्टी सांभाळल्या की खरं म्हणजे मुलांवर रागावण्याचे प्रसंगच फार कमी असतात. आमच्या घरी नातवंडं आली की त्यांचा पहिला कार्यक्रम असतो, तो म्हणजे सोफ्यावरची सगळी कव्हर्स, सगळ्या गाद्या, उशा खाली काढून ठेवायच्या आणि फरशीवर त्याचा ढीग रचायचा. त्या अवस्थेत बाहेरचं कुणी आलं तर काय याची भीती पूर्वीसुद्धा मला कधी वाटली नव्हती आणि आता तर अजिबात वाटत नाही. हा मुलांचा नेहमीचा खेळ आहे हे मी पाहुण्यांना सरळपणी सांगतो.

सर्व आयांना मी आणि शोभा सांगतोच पण आत्ता मी इथे बाबा आणि आजोबांना मुद्दामहून सांगतोय की, वागण्यातल्या या खुब्या कळल्या तर लहान मुलांचा सहवास म्हणजे सगळा आनंदच असतो. त्रास वाटण्याला त्यात जागाच नाही. याच पुस्तकात 'ज्येष्ठ नागरिकांशी संवाद' असा लेख पण आहे. त्यातूनदेखील आजोबा मंडळींना शिकण्यासारखं बरंच सापडेल.



# 12) शिक्षण-शाळा-अभ्यास-समुपदेशन

घराघरातला एक विषय असतोच तो म्हणजे मुलाच्या शाळेचं माध्यम कुठचं? माझ्याकडे समुपदेशनाला येणाऱ्यांच्यापैकी मुळात नवरा-बायको दोघं हजर आहेत याचं प्रमाण कमीच असतं आणि त्यातली निम्मी जोडपी मुलाच्या शाळेचं माध्यम हा विषय घेऊन माझ्याकडे आलेली असतात. त्यातले बहुतेक पुरुष असं म्हणत असतात, 'बायकोनी हा निर्णय घ्यावा कारण अभ्यास तिला घ्यायचाय, पण माझ्या बायकोला तेवढं इंग्लिश येत नाही आणि मला वाटतं की मुलांनी इंग्लिश मीडियममधे जावं.'

पहिली गोष्ट करावी लागते ती म्हणजे त्या जोडप्याला पटवणं की अभ्यास घेण्याची कल्पना डोक्यातून काढून टाकायची. आईनी का वडलांनी हा प्रश्नच नाही, पण अभ्यास हा घ्यायचा नसतो. फार फार तर गोडी लावण्यापुरतं आपण दोघं मिळून अभ्यास करू असं म्हणणं ही त्याची मर्यादा झाली. उदाहरण म्हणून सांगतो, पहिलीचं गणित सोडवायचं असलं तर ठीक आहे; एका कागदावर तू सोडव, एका कागदावर मी सोडवतो, असं आईनी किंवा वडलांनी म्हटलं तर चालेल. समजा, कविता पाठ करायची आहे तर ठीक आहे; ही कविता तू पण पाठ कर, मी पण पाठ करतो अशी सुरुवात करायला हरकत नाही. पण लवकरात लवकर त्याच्यातून बाहेर पडायचं आहे.

त्याच्या पुढची पायरी म्हणजे आपण शेजारी बसू, तू तुझा अभ्यास कर, मी माझा अभ्यास करतो. त्याच्या पुढची पायरी, तू तुझा अभ्यास कर, पण मला मधूनमधून पलीकडच्या खोलीत जाऊन यावं लागणार आहे. एवढं तपशीलवार सांगण्याचा उद्देश, आई आणि बाबा यांच्या डोक्यातून अभ्यास घेणं नावाचं पिशाच्च पूर्णपणे काढून टाकणं आणि त्याच्या पायऱ्या समजावून सांगणं एवढाच आहे. काही मुलांच्या बाबतीत हे पहिल्या इयत्तेच्या पहिल्या काही महिन्यांत होईल, काहींच्या बाबतीत सबंध पहिलीचं वर्ष जाईल. पण एक गोष्ट अगदी नक्की की, एका वर्षाच्या अवधीत हे भूत मानगुटीवरून उतरवायचं आहे. मुलाच्या आणि आईवडलांच्या.

पुढचा गमतीचा भाग असा की, आईला हे समजतं पण घरात मधूनमधून

असणाऱ्या वडलांना हे पटत नाही आणि त्यांना पटवण्यासाठी समुपदेशनाच्या दोन-तीन बैठका तरी होतात. एकदा अभ्यास घ्यायचा नाही हे ठरलं की शिक्षणातली पुढची वाटचाल फार सोपी आहे. पण हे सगळं आईनी करायचं आहे त्यामुळे बाबांना त्याची फिकीर नसते. त्यामुळे पुरेसा स्पष्ट विचार होत नाही.

या टप्प्यानंतर माध्यमाविषयी चर्चा चालू होते. खरी गोष्ट अशी आहे की, समजा, आईला तितपत इंग्लिश येत असलं म्हणजे शिक्षण झालेलं असलं पण बोलण्याचा सराव नसला आणि त्यामुळे आत्मविश्वास कमी पडत असला तर हा प्रश्न सोडवायला सहा महिन्यांपेक्षा जास्त वेळ लागत नाही. आणि तरी मूळ मुद्दा शिल्लक राहतोच; त्याचं पंधरा वर्षांपूर्वी शोभानी आणि मी दिलेलं उत्तर आणि आज दिलेलं उत्तर यांत फार तफावत आहे.

प्रत्येक गावी मुलाला शाळेत घालण्याच्या लायकीच्या पाच-दहा मराठी माध्यमाच्या शाळा पंधरा वर्षांपूर्वी होत्या. पण आज आत्ता पुण्याला आम्हाला विचारलं की, चांगली मराठी शाळा कुठची तर उत्तर देण्याची अडचणच आहे. समजा, एखाददुसरी शाळा असली पण ती घरापासून फार लांब असली तर त्याचा काही उपयोग नाही. कारण ते बिचारं मूल सकाळी-संध्याकाळी मिळून तीनएक तास रिक्षात किंवा व्हॅनमधे घालवणार. त्यामुळे सध्याच्या परिस्थितीला शोभाच्या आणि माझ्या मतानी उत्तर असं आहे की, इंग्लिश माध्यमाची असो नाहीतर मराठी माध्यमाची असो, फार लांबच्या शाळेत मुलाला घालू नका.

तुमच्या आणि मुलाच्या नशिबात इंग्लिश शाळा असेल तर आवर्जून त्याचं मराठी तयार करून घ्या आणि मराठी शाळा असेल तर अगदी लहानपणापासून इंग्लिश तयार करून घ्या. शाळा निवडताना अभ्यासाच्या नावाखाली शाळा जो मुलांना त्रास देते तो त्रास कमीतकमी असेल अशी शाळा निवडा कारण शिक्षण हे आनंदातच झालं पाहिजे. पहिली ते दहावी किंवा बारावी जे काही असेल त्यामधे मुलाला शाळेत मजा आली पाहिजे. मी पूर्वी याच पुस्तकसंचात उल्लेख केला आहे पण तरी पुन्हा सांगतो, ज्याच्यात मजा येत नाही ते शिक्षण, तो विषय व्यर्थ आहे. एखादा विषय मुलाला आवडत नाही याचाच अर्थ तो शिकताना त्याला मजा आली नाही.

आणखी एक शक्यता आहे, मुलावर फार ताण पडत असेल. शरीराला काय किंवा बुद्धीला काय मधे थोडा बदल, मोकळा वेळ याची गरजच असते. शाळेपाठोपाठ पहिला क्लास, मग दुसरा क्लास, मग आणखी काहीतरी असं

मुलाचं यंत्र बनू देऊ नका. मधे काहीही अपेक्षा, व्याख्या नसलेला मोकळा वेळ प्रत्येकाला जरुरीचा आहे.

पुरुष पालकांपैकी खूप मोठं प्रमाण असं आहे की, ज्यांच्या शिक्षणात पूर्वी काहीतरी घोटाळा झाला होता. व्यवसायातल्या, कामातल्या व्यग्रतेमुळे ते वेळ पुरेसा देऊ शकत नाहीत ही गोष्ट समजण्याजोगी आहे, पण मगाशी ज्या बजेटचा उल्लेख केला त्यातलं वेळ आणि बुद्धी याच्या बजेटमधला सुटीमधला भाग तरी निदान पुरुष पालकांनी मुलांबरोबर बसून पुरा केला पाहिजे.

हा जो प्रतिवाद असतो की मला सुटीचा एकच किंवा दोनच दिवस मिळतात, त्यात मी मुलाबरोबर कसा वेळ घालवू, हे सगळे वाद चुकीचे आहेत. मगाशी ज्या पद्धतीनी मी सांगितलं त्या पद्धतीनी मुलाला पहिलीमधे स्वतंत्र करायचं असं एक वर्षाचं प्रॉजेक्ट आईवडलांनी मान्य केलं असलं तरच सगळा प्रश्न फक्त एक वर्षाचा आहे हे मी खात्रीनी सांगू शकतो. आपल्या मुलासाठी किंवा मुलांसाठी एक वर्ष एवढी जबाबदारी मुलांचे वडील घेऊ शकत नाहीत हे मला काही केल्या पटणार नाही.

आमच्या ओळखीच्या एका घरात वडील लक्ष द्यायचे नाहीत त्यामुळे आईवर खूप जबाबदारी येऊन पडलेली होती. मुलगा अभ्यास करायचा नाही. भलभलत्या वेळांना खाली मुलांच्यात खेळायला जायचा. एकदा आई खूप वैतागली. नको सांगूनही मुलगा अभ्यास टाळून खाली खेळायला जायला लागला तेव्हा ती त्याला म्हणाली, 'तू आत्ता जा आणि घरी येऊच नकोस.' तरी तो आईची पर्वा न करता गेला. मग आई स्वतःच रडायला लागली. मला तिनी हे सांगितलं तेव्हा माझा मुख्य सल्ला होता की, संध्याकाळी तो नक्की घरी येईल. आल्यानंतर तू काहीच बोलू नकोस. त्याला स्वतःला विचार करू दे. आज नाही केला तरी नंतर केव्हातरी तो आपणहून विचार करेल. ते महत्त्वाचं आहे. 'आई काही बोलली नाही' याबद्दल तो नक्की विचार करेल. नंतर ती भेटली तेव्हा मी तिला समजावून सांगितलं की, मुलांशी कधी न बोलण्याच्या वाक्यांपैकी 'घरी येऊ नकोस', हे वाक्य आहे.

बाबा घरात मुलांचा अभ्यास घेतायत असं उदाहरण कमी प्रमाणात सापडतं हे मान्य आहे, पण तरी बाबा मंडळींनी हा विषय समजावून घ्यायला हवा. आई आणि बाबा या दोघांनीही 'मुलांचा अभ्यास' या विषयाकडे एकत्र लक्ष द्यायला हवं. प्रत्यक्ष अभ्यासामधले तपशील जरी आईला माहिती असले तरी त्याविषयी

आई-बाबा दोघांना काळजी हवी. त्याविषयी आई-वडलांची दोघांची नेहमी त्याविषयी चर्चा व्हायला हवी. मूल हे त्याच्या शाळा-अभ्यास या सगळ्या प्रश्नांसकट नवराबायको दोघांचं 'प्रोजेक्ट' आहे ना! जर वडील असं करत नसतील तर मी अगदी स्पष्टपणी याला वडलांची बेपर्वाई असंच नाव देईन. ही बेपर्वाई मुलांबद्दलही आहे आणि बायकोबद्दल पण आहे.

संपूर्ण शिक्षण या गोष्टीविषयी खास पुरुष पालकांसाठी दोन गोष्टी सांगतो आणि पुढच्या मुद्द्याला सुरवात करतो. शिकणं हा मुलाचा नैसर्गिक गुणधर्म आहे. मूल शिकणारच; तुम्ही त्याला थांबवूच शकत नाही. ते अनेक प्रश्न विचारणार, अनेक गोष्टी समजून घेणार. तुम्ही आणि शिक्षकांनी त्याच्या शिक्षणातला अडथळा बनायचा नाही एवढी एकच गोष्ट करायची आहे. बहुतेक पुरुषांना असं वाटतं की, आपल्या मुलाचे दहावी आणि बारावीचे मार्क हे खूप महत्त्वाचे आहेत. तो ताण नवरा बायकोवर टाकतो आणि बायको मुलावर टाकते. प्रत्यक्षात मी सर्व पुरुषांना आवाहन करतो की, त्यांनी ओळखीच्या शंभर लोकांशी बोलावं आणि शोधून काढावं की ज्यांना आयुष्यात यश मिळालं अशांपैकी किती मुलं दहावी-बारावीत भरपूर मार्क मिळवणारी होती.

त्यामुळे पुढे मी म्हणतो की आत्ता आपण इथे बसलेली 15-20 लोकं जी आहेत त्यांना तरी विचारू, त्यांचं काय झालं ते. शंभरच्या शंभर टक्के वेळेला या चर्चेतून एकच निष्कर्ष निघतो की, 'मार्क्सवाद' म्हणजे मार्कांसाठी मुलाचा केलेला छळ हा अर्थशून्य आहे. अभ्यास चांगला व्हावा म्हणून खेळ, छंद सगळं बंद करणारे अनेक आईवडीलही आम्हाला माहिती आहेत. मला आणि शोभाला तर वाटतं की तो खेळ बंद करणं वगैरे तर दूरच राहिलं, दहावी-बारावीच्या परीक्षेच्या दिवशीसुद्धा सकाळी खेळ खेळून परीक्षेला जाऊन बसावं.

सध्या घरोघरी बघावं तर मुलाची परीक्षा म्हणजे आईची परीक्षाच असते जणू काही. मुलाला गेल्या वेळच्या परीक्षेपेक्षा कमी मार्क पडल्यामुळे एकदा एक आई ओक्साबोक्शी रडत होती. काही वेळानी मुलगा कितवीत आहे चौकशी केली तर कळलं की दुसरीत आहे. कमी मार्क म्हणजे नेमके किती चौकशी केली तेव्हा कळलं की, गेल्या वेळी 86% होते ते 82% झाले होते. मुलगा हे आम्ही बोलत असताना बाहेर मस्त खेळत होता. "तो किती निर्लज्ज आहे", असं म्हणून आई पुन्हा रडायला लागली.

शिक्षणाच्या बाबतीत अनेक आई-वडील एक फार मोठी चूक करताना

आम्ही बघतो. ती चूक म्हणजे मुलांना शिक्षणासाठी परगावच्या निवासी शाळेत ठेवणं आणि अशा निर्णयामधे बहुतेक वेळेला वडलांचा पुढाकार असतो. समुपदेशक असल्यामुळे अनेक निरनिराळ्या गोष्टींचे निर्णय घराघरांतून नेमके कसे होतात हे समजतं हा फार फायदा आहे. मुलांना त्यांच्या लहानपणी शिक्षणासाठी दूर ठेवावं का नाही याबद्दल स्वतंत्रपणी स्त्रियांच्या गटाशी बोललं आणि तोच मुद्दा घेऊन स्वतंत्रपणी पुरुषांच्या गटाशी बोललं तर काही गोष्टी फार लख्खपणे कळतात.

स्त्रियांना मुलांबरोबरच्या रोजच्या सहवासामधली गंमत, नुसतं बरोबर असण्याचा आनंद, त्यांचे निरागस प्रश्न या सगळ्यातली गंमत जी कळते तशी पुरुषांच्या गटाला अजिबात कळत नाही. जे काही निरनिराळे पुरुष बोलतात त्या सगळ्याचा अर्थ भयानक आहे. त्यांना वाढलेला, मोठा होऊन कॉलेजला जायला लागलेला, कोणीतरी दुसऱ्यानी तयार केलेला मुलगा 'रेडिमेड' पाहिजे. याचा पुढचा अर्थ स्पष्टच आहे की, पहिली ते बारावी हा सगळा जो शिकण्याचा काळ आहे त्या काळात पुरुष-पालकाला स्वतःच्याच मुलात पुरेसा रस नाही. तोंडानी ते लोक काय वाटेल ते कारण सांगोत, पण त्यांची खरी इच्छा आयुष्यातला तो काळ 'डिंक' बनण्याचा असतो. 'डिंक'चा अर्थ अनेकांना माहिती असेल, पण तरी इथे सांगायला हवा. 'डबल इन्कम नो किड्स्'. मुलं नकोत असं ठरवणारी आमच्या ओळखीत बरीच जोडपी आहेत. शोभा आणि मी दोघंही आधीच्या पिढीचे असल्यामुळे आमच्यावर टीका झाली तरी आम्हाला चालेल पण 'डिंक'ही कल्पना आम्हाला भयंकर वाटते. हे जे पुरुष असतात त्यांचा आणखीन एक असाच भयानक शब्द म्हणजे 'आऊटसोर्सिंग'. मुलांच्या शिक्षणाचं आऊटसोर्सिंग याचा अर्थ त्यांच्या सहवासाचा आनंद दुसऱ्याला दान करून टाकणं असा आहे हे आम्हाला वाटतं.

एक निराळी गोष्ट सांगतो. माझ्या लहानपणापासून मी स्वतः तसा असल्यामुळे 'जॅक ऑफ ऑल' हा वाक्प्रचार शिवीसारखा वापरलेला मी ऐकलेला आहे. कारण त्याचं पुढचं वाक्य 'अँड मास्टर ऑफ नन' असं असतं आणि याबाबतीत सुद्धा पुरुष पालकांचा जास्त पुढाकार असतो. मुलगा कुठचा कोर्स घ्यायचा हे ठरवू शकत नाही याबद्दल भडकून बोलणारे अनेक पुरुष पालक मी बघितले आहेत. प्रत्यक्षात जसं खेळ आणि छंदांविषयी म्हणतात की, अनेक गोष्टी करून बघितल्याशिवाय कुठचा छंद, कुठचा खेळ हे ठरतच नाही तसंच

खरं म्हणजे शिक्षणातल्या अभ्यासाच्या विषय निवडण्याचं आहे. माझ्या काळामधे पर्याय कमी होते त्यामुळे चुकण्याची संधी पण कमी होती आणि तरीही मी 'मल्टिपल स्किल, मल्टिपल टॅलेंट, मल्टिपल लाइकिंग' अशा प्रकारचा मुलगा असल्यामुळे प्रश्न आलाच होता.

माझं आणि माझ्या वडलांचं याबाबतीत काही भांडण मात्र झालं नाही. चित्रकला हा विषय माझा खूप आवडीचा आणि चांगल्या तयारीचा असल्यामुळे साधारण त्याच्या जवळपास आणि पैशात बसणारा असा कोर्स वडलांनी निवडला आणि मीही तो खुषीनी मान्य केला. पण सध्याच्या काळात समुपदेशनासाठी येणारे आईवडील कुठचा कोर्स घ्यावा यासाठी भरपूर प्रमाणात येतात. 'व्होकेशनल गायडन्स' हा माझा विषय नसल्यामुळे मी त्यांना दोन-तीन नावं सांगतो आणि एवढंच मुख्य सांगतो की, खरोखर काय आवडतं ते त्या मुलाला किंवा मुलीला करू द्या. आपण सगळे सुदैवी आहोत कारण आपण शहरात राहतो आणि शहरात राहण्याचे जे काही थोडेसे फायदे आहेत, त्यांपैकी हा एक महत्त्वाचा फायदा आहे की, तुमच्या आवडीचं तुम्ही काहीही करा, त्याचं शहरामधे पैशात रूपांतर नक्की करता येतं.

मगाशी आपण म्हणालो त्यात थोडी सुधारणा करून असं म्हणूया– 'जॅक ऑफ ऑल अँड मास्टर ऑफ वन'. अगदी खरं आहे. कुठच्यातरी एका गोष्टीत तुमच्या मुलाला प्रावीण्य मिळवू दे. त्यासाठी प्रोत्साहन देणं महत्त्वाचं आहे. पालकांनी फक्त तेवढं करायचं आहे.

ही गोष्ट खेड्यात शक्य नाही. साधारण निम्म्या वेळेला या आलेल्या जोडप्यांना माझं म्हणणं पटतं आणि ते त्याला आवडीचं काय ते शोध असं सांगतात. त्यातला वाईट भाग असा आहे की, पर्याय खूप आहेत आणि प्रत्येक गोष्ट साधारण महिनाभर करून बघितल्याशिवाय ती स्वतःला आवडते की नाही आवडत हे ठरवणंच कठीण असतं. त्यामुळे माझं स्वतःचं असं मत बनलं आहे की, दहावीच्या किंवा बारावीच्या टप्प्यानंतर पुढच्या शिक्षणाला प्रवेश घेण्यापूर्वी मुलांना एक वर्ष करिअरचा शोध नावाच्या इंटर्नशिपसाठी राज्यभर किंवा भारतभर हिंडणं सक्तीचं करावं. त्या वर्षानंतर आपल्याला काय करायचं आहे हे जे मूल ठरवू शकणार नाही ते मूल मी नॉर्मल मानायला तयार नाही.

शोभा गरवारे बालभवनची डायरेक्टर आहे हे मी तुम्हाला पूर्वी सांगितलंच आहे. साधारण वीस वर्षांपूर्वी गरवारे बालभवनमधे साधारण याच प्रकारचा

कार्यक्रम माझ्या पुढाकारानी चालायचा. तो मुलांच्या मोठ्या गटासाठी असायचा आणि त्याचं नाव होतं, 'मोठ्यांना भेटा'. त्याच्यामधे निरनिराळ्या क्षेत्रांतल्या लोकांशी आधी वेळ ठरवून त्यांना याचा उद्देश समजावून सांगून एक 15-20 मुलांचा गट घेऊन त्यांच्या कामाच्या ठिकाणी जाऊन त्यांच्याबरोबर कामाचा अनुभव घेण्याचा उद्योग चालायचा.

मला कबूल आहे की, दोन तासांपेक्षा जास्त वेळ मिळायचा नाही आणि त्या ओळखीच्या लोकांना सांगून ठेवलेलं असायचं की, मुलं आली म्हणून तुमच्या नेहमीच्या कामाच्या रचनेत काही बदल करू नका. हा मुलांची करमणूक करण्याचा कार्यक्रम नाही. त्यामुळे त्यांना चॉकलेट, आईस्क्रीम काय द्यायचं असेल ते आम्ही देऊ. पण तुमचं दोन तास कामच त्यांना बघू दे. त्यात कुठचाही देखावा नको.

दुसरी एक गोष्ट आई आणि वडील दोघांना वाटते पण समजावून सांगितल्यानंतर आईला जास्त पटते आणि वडलांना कमी पटते. ती गोष्ट म्हणजे साधारण पहिलीच्या आसपास सर्व पालकांना आपलं मूल 'गिफ्टेड' आहे अशी खात्री वाटत असते. सर्वसाधारणपणी चांगल्या म्हणजे सुशिक्षित घरातून आलेली मुलं आणि विशेषतः भाषेचे चांगले संस्कार झालेली मुलं यांच्याबद्दल असं वाटतं की ती गिफ्टेड आहेत. प्रत्यक्षात इतरांच्या तुलनेत त्यांचं भाषेचं आकलन जास्त आणि व्यक्त करण्याची क्षमता जास्त एवढंच म्हणता येतं. गिफ्टेड म्हणजेच 'सुपीरियर ब्रेन कॅपॅसिटी'. हे ठरवण्यासाठीच मुळात मूल पहिली-दुसरीत जावं लागतं. साधारण सातव्या-आठव्या वर्षी ते कदाचित गिफ्टेड असेल किंवा नसेल याबद्दल थोडासा अंदाज येतो आणि दहा-बारा वर्षांच्या आसपास म्हणजे चौथी-पाचवीत या विषयातले तज्ज्ञ लोक हे निश्चित सांगू शकतात. त्याचा पुढचा भाग थोडक्यात सांगतो कारण मला तेवढंच माहिती आहे.

खरोखर गिफ्टेड मुलं लाखात एक एवढ्याच प्रमाणात असतात. सर्व अर्थानी शहाणी मुलंदेखील लाखात एकच्या वर नसतातच. त्यामधे नेमकं आपलं मूल योगायोगानी किंवा नशिबानी असण्याची शक्यता आहे, पण तीदेखील लाखात एक एवढीच असते.

ज्या तज्ज्ञाविषयी मगाशी उल्लेख केला ते म्हणजे शोभा आणि मी नाही. शाळेमधे जे विषय असतात त्याच विषयांत योगायोगानी ही मुलं गिफ्टेड असली तर ती चमकतात पण दुसऱ्याच कुठच्या गोष्टीत ती गिफ्टेड असली आणि

शाळेतल्या विषयांत नसली तर ती शाळेत चक्क मागे पडतात. शोभा गरवारे बालभवनमधे अनेकशे मुलांशी गेली अनेक वर्षं संपर्कात असल्यामुळे ती अशी बरीच उदाहरणं सांगत असते.

माझा मूळ मुद्दा या सगळ्या प्रकरणांतल्या पालकांच्या आणि त्यातसुद्धा पुरुष पालकांच्या वागणुकीबद्दल आहे. मगाशी म्हटल्याप्रमाणे शाळेच्या विषयांशी आवडींचा योगायोग जमला तर ते आपल्या मुलाकडून अवास्तव अपेक्षा करायला सुरुवात करतात आणि पुढचे परिणाम तुम्ही वर्तमानपत्रांत वाचता, ऐकता तसले काहीतरी होतात. वडिलांची अपेक्षा ९५ टक्क्यांची होती आणि प्रत्यक्षात ९० किंवा ९२ टक्केच मिळाले म्हणून घर सोडून जाणारी, आत्महत्या करणारी ही सगळी मुलं चुकीच्या पालकत्वाचे बळी आहेत. अशी मुलंही कमनशिबी आणि पालकही दुर्दैवी.

प्रत्यक्षात असं आहे की, खरी स्पर्धा म्हणजे जीवघेणी स्पर्धा आपल्या सर्वसामान्य मध्यमवर्गीय माणसांच्या आयुष्यात कधीही येत नाही. दोन माणसांचं तलवार युद्ध चालू असलं तर जी परिस्थिती असते म्हणजे दुसऱ्याला तरी मारायला पाहिजे किंवा स्वतः तरी मरायला पाहिजे ही खरी स्पर्धा. आपल्या आयुष्यात एखादं काम मिळालं की नाही मिळालं, एखादी नोकरी मिळाली किंवा सुटली ही खरी स्पर्धाच नाही आणि शाळेतले मार्कंबिर्क तर अजिबात म्हणजे अजिबात महत्त्वाचे नाहीत.

मी जवळजवळ 50 वर्षं नोकरी-धंद्यात-व्यवसायात काम करतो आहे. काही उलथापालथींसकट पण इथपर्यंत यशस्वीपणी पोहोचलो आहे, पण मला कधीही कोणी विचारलं नाही की, मला दहावीत किती टक्के मार्क मिळाले होते. सगळं जे अवलंबून असतं ते मी आसपासच्या लोकांशी वागतो कसा, माझं प्रत्यक्ष ज्ञान म्हणजेच फील्डवर्क किती अर्थपूर्ण होतं याच्यावर.

आता पुन्हा मुलाच्या अगदी शाळेत प्रवेश करण्याच्या वयाच्या आसपास काय होतंय ते जरा बघूया. तुम्ही कुठचीही शाळा निवडा, वर्गातली सगळी मुलं चांगली, सुसंस्कृत, सर्व शिक्षक चांगले आणि चांगलं वागणारे असं असणं शक्य नाही. ती शाळा मराठी मीडियम असो, इंग्लिश मीडियम असो नाहीतर इंटरनॅशनल स्कूल असो, इतर मुलांचा आणि चुकीचं वागणाऱ्या शिक्षकांचा मुलांवर वाईट परिणाम होणारच आहे.

नुसत्या तात्विक वादासाठी असा प्रश्न उपस्थित केला की घरी मुलाला

शिकवू, नकोच ती शाळेची भानगड, आपल्याकडे तेवढे पैसे आहेत त्यामुळे घरीच सगळ्या शिकवण्या लावू; तर त्यात इतर भानगडी आहेत. शब्दशः जसा 'परफेक्ट' लग्नाचा जोडीदार या जगात नसतोच तशी 'परफेक्ट' शाळाही नसते आणि 'परफेक्ट' अभ्यासाची पद्धतही नसते. आत्तापर्यंत जगभरामधे शिक्षणामधे काय कमी प्रयोग झाले आहेत का? यु.एस.ए.मधे 'होमस्कूलिंग'चे प्रयोग अगदी आत्ताही चालू आहेत आणि तेही अगदी आमच्या ओळखीच्या लोकांच्यात. त्याच्यातही खूप अडचणी आहेत.

भारतापुरतं सांगायचं तर होमस्कूलिंग भारतासारख्या देशाला पचणारं नाही. होमस्कूलिंग ही जॉन होल्ट या शिक्षणतज्ज्ञाची कल्पना आहे. साधारण 10-12 जवळ राहाणाऱ्या समविचारी लोकांनीच स्वतःच्या मुलांसाठी शाळा चालवावी अशी ती कल्पना आहे. भारतात अशा लोकांचा गट जमण्याचीच पहिली मोठी अडचण आहे. शिवाय त्यात पुढे पालकांना खूप अभ्यास, खूप कष्ट असतात.

याचा अपवाद एवढाच असू शकतो की, अतिश्रीमंत लोकांच्याकडे जशी घरात पन्नास नोकरमंडळी असतात तशी घरात मुलांची जबाबदारी घेणारी फौजच्या फौज तयार असते. ते शिक्षकांना आपल्या सोयीच्या वेळेनुसार, गरजेनुसार भरपूर पैसे देऊन गाडी आणि ड्रायव्हर पाठवून सगळी व्यवस्था करतात. पहिली गोष्ट म्हणजे त्याच्यातसुद्धा एक मेख आहेच की, मुलाचं 'सोशलायझेशन' होत नाही आणि दुसरी साधी गोष्ट म्हणजे तसं करण्यासाठी जेवढे पैसे लागतात, तेवढे आपण मध्यमवर्गीय स्वप्नातही बघू शकत नाही.

पुण्याल्या अक्षरनंदन या शाळेचं उदाहरण सांगतो. हा विषय खूप सविस्तर चर्चेचा आहे हे मला मान्य आहे, पण इथे आत्ता तरी त्याचा नुसता उल्लेख करून पुढे जाणार आहे. या प्रकारच्या शाळांना विरोध असणारेही भरपूर लोक आहेत. पण मी आणि शोभा या शाळांच्या जवळचे संबंधित लोक आहोत आणि त्यांच्या मूलभूत कल्पना अशा आहेत– पहिलीच्या पूर्वी सर्व संबंधित विषयांची फक्त गोडी लावायची. पहिली-दुसरीमधे मुलांच्या आवडीचे विषय कुठचे आणि आवड नसल्यामुळे कच्चे राहणारे कुठचे विषय हे शोधून काढायचे. त्याच्यापुढे कुठच्या मुलाला कशासाठी जास्त उत्तेजन दिलं पाहिजे हे कळलं की त्या दिशेनी प्रयत्न करायचे. या पद्धतीनी नववीपर्यंतचा प्रवास चालतो.

दहावीच्या एस.एस.सी. परीक्षेचं थोडक्यात वर्णन मी तुम्हाला सांगतो, म्हणजे सूज्ञांना सगळं समजेल. अक्षरनंदनमधलं एकही मूल दहावीच्या एस.एस.सी.

बोर्डाच्या परीक्षेत नापास होत नाही. त्याचबरोबर 'मार्क्सवादा'नी न वागल्यामुळे एस.एस.सी.ला येणाऱ्या पहिल्या 20-25 मुलांत अक्षरनंदनचं एकही मूल नसतं.

त्याच्यापुढे अकरावी-बारावीची अक्षरनंदनमधे सोयच नाही. तेही कित्येक लोकांना आवडत नाही, पण त्याच्यापुढे निवडलेल्या शिक्षणामधे ही मुलं चांगली प्रगती करतात एवढं नक्की माहिती आहे. त्यातली काही अगदी सुरुवातीची मुलं स्वतःच्या जबाबदारीवर स्वतः ठरवून लग्न करण्यापर्यंत पोहोचली आहेत. त्यांना पुढे मुलं होऊन ती मुलं पुढे अशाच प्रकारच्या शाळेत जाणं ही गोष्ट अजून घडलेली नाही कारण शाळा चालू होऊन तेवढी वर्षंच झालेली नाहीत. पण एक गोष्ट नक्की की, ही सगळी मुलं स्वावलंबी आहेत, पालकांच्या कुबड्या त्यांनी नाकारलेल्या आहेत आणि मगाशी म्हटल्याप्रमाणे संपूर्ण पालकत्वाचा तोच तर उद्देश आहे.

लहान मुलांचं समुपदेशन मी करत नाही पण त्यांच्याबद्दल पालकांना काही गोष्टी सांगण्यासाठी समुपदेशन करण्याचे प्रसंग मात्र खूप येतात. त्यातल्या काही मोजक्या गोष्टी इथे सांगतो.

सर्वसाधारण प्राथमिक शाळेमधे मुलांना शाळेत जाण्याचा सराव झाल्यानंतर ती आनंदानी शाळेत जातात आणि तिथल्या वातावरणात रमतात. त्यांना शाळेविषयी, शिक्षणाविषयी आवड वाटते. परंतु शिक्षकांची शिस्त, विषय शिकण्यातल्या अडचणी, समवयस्क मित्रांबरोबर होणारी भांडणं वगैरे कारणांमुळे त्यांच्यात समस्या निर्माण होतात. शाळेचे समुपदेशक शाळेतल्या विद्यार्थ्यांचे अभ्यास आणि सामाजिक-भावनिक प्रश्न सोडवायला मदत करतात. त्यांचे शाळेविषयीचे अनुभव अधिक आनंददायी कसे होतील या दृष्टीनी मदत करतात. आनंददायी अनुभवानीच शाळेची गोडी वाटते.

मुलं जरा मोठी झाली की प्रश्नांचं स्वरूप बदलतं. बारा-तेरा वर्षं वयानंतर किशोरावस्थेला सुरुवात होते. त्यामुळे त्यांच्यात भावनिक ताण वाढतो. त्यांना स्वतःच्या व्यक्तिगत कल्पना, आकांक्षा, अभिरुची असतात आणि इतरांनी त्यांना मान्यता द्यावी यासाठी त्यांची धडपड सुरू असते. या अवस्थेत समुपदेशकाचं काम महत्त्वाचं असतं. मुला-मुलींच्या समस्यांचं मर्म समजावून घेऊन त्यांच्यात आत्मविश्वास निर्माण करणं, त्यांना त्यांच्या समस्या सोडवायला प्रवृत्त करणं यासाठी समुपदेशक असतात. अभ्यासक्रमाबरोबर इतर विशेष आवडीचा किंवा क्षमतांचा विकास करणं, मित्रांशी, शिक्षकांशी, स्वतःच्या पालकांशी चांगले

संबंध निर्माण करणं, तसंच शाळेतला काळ अधिकाधिक चांगला करणं यासाठी समुपदेशक सतत मदत करतो.

पुढे मुलं आणखी मोठी झाली की त्यात आणखी बदल होतात. कॉलेजमधला विद्यार्थी हा प्राथमिक आणि माध्यमिक शाळेतल्या विद्यार्थ्यांपेक्षा वेगळा असतो. या विद्यार्थ्यांना अगोदरच्या शिक्षणाप्रमाणे सगळे विषय सक्तीचे नसतात. स्वतःच्या आवडीप्रमाणे विषयांची निवड करायची असते. ते शिक्षकांवर जास्त अवलंबून नसतात. स्वतः अभ्यास करणं, स्वतःचे निर्णय स्वतः घेणं, स्वतःच्या आवडीनिवडी निश्चित करणं, मित्रांची निवड करणं वगैरे निर्णय त्यांना इतरांवर अवलंबून न राहता स्वतः घ्यायचे असतात. त्यांना शैक्षणिक, आर्थिक, सामाजिक, व्यावसायिक व मनोरंजनाविषयी प्रश्न असतात. त्यांच्यात अंतर्दृष्टी निर्माण करून त्यांनी स्वतःचा विकास स्वतःच कसा साधावा याविषयी समुपदेशन करायचं असतं.

बुद्धिमत्ता चाचण्यांबद्दल दोन परस्परविरोधी मतं निश्चित मिळतील. बुद्धिमत्ता चाचणी बिने नावाच्या शास्त्रज्ञानी तयार केली. अशी चाचणी दोन ते पंचाऐंशी वर्षं वयातल्या माणसांना देता येते.

मुलांच्या लहानपणी ज्यांना शक्य असेल त्या पालकांनी मुलांची आय.क्यू. टेस्ट जरूर करून घ्यावी. बुद्धिमत्तेबद्दल काही अंदाज येतो एवढाच त्याचा उपयोग असतो हे मात्र कायम लक्षात ठेवावं.

निरीक्षणांच्यात असंही आढळलंय् की मुलांशी प्रेमानी वागण्यामुळे त्यांची आत्मप्रतिष्ठा वाढते आणि मुलांचा सर्वांगीण विकास होतो. शाळांना हे समजलं पाहिजे आणि पालकांनी याचा शाळेपाशी आग्रह धरायला पाहिजे.



# 13) मुलांचा भाषाविकास

मी जे हे सगळं बोलतोय् ते 'नॉर्मल' मुलांसंबंधी. इतर काही ऐकण्याचे, बोलण्याचे, आकलनाचे प्रश्न असतील तर संवादाचं माध्यम पूर्ण निराळं असू शकतं. पण त्याबद्दल काही प्रश्न नसलेल्या घरांसंबंधी पुरुष पालकाची भूमिका काय असावी याबद्दल मात्र मी काही गोष्टी सांगणार आहे.

दोन-तीन वर्षांच्या मुलाला व्यवस्थित बोलता येतं हे नक्की. पण आपण बोललेलं सगळं कळतं का नाही हे आपल्याला कळण्यासाठी त्यांनी जो प्रतिसाद द्यायला हवा, त्यात मुलं एकसारखी नसतात. त्याबद्दल काळजी करायची गरज नसते. मधून मधून होणाऱ्या शारीरिक तपासणीत कानाची तपासणी असतेच. दोन्ही कानांनी ऐकू येतं, व्यवस्थित येतं एवढं कळलं की बास! कान, तोंड, आकलन, सगळं व्यवस्थित आहे असं डॉक्टरांनी ठरवलं तरी त्या त्या मुलाचा स्वभाव नावाची गोष्ट असतेच ना!

आत्तापर्यंतच्या संशोधनात हे सिद्ध झालेलं आहे की, लहान मुलाची नवीन भाषा शिकण्याची क्षमता मोठ्या माणसांपेक्षा खूप जास्त असते. काही कुटुंबांच्यात घरातच 3-4 निरनिराळ्या भाषा येणाऱ्या व्यक्ती असतात. तिथे असं आढळतं की, लहान मूल त्या सगळ्या भाषा अगदी सहज शिकतं.

तरीही मला आणि शोभाला वाटतं की, कुटुंबातल्या सगळ्यांना नीट येणारी, आसपासच्या लोकांना येणारी एक भाषा निवडून त्या कुटुंबभाषेची तयारी मुलाची चांगली होणं याला जास्त महत्त्व द्यावं. मातृभाषा शब्दाचा अर्थ शब्दशः आईची भाषा असा घेतला तर घोटाळा होऊ शकतो, म्हणून मी कुटुंबभाषा शब्द वापरतोय. या सगळ्या प्रश्नात मुलाचे आई-वडील दोघांनी लक्ष घालायला हवं हे मात्र नक्की.

मुलांची भाषा, विशेषतः कुटुंबभाषा तयार करून घेणं हेही काम आई-बाबा दोघांचं आहे. मुलांशी गप्पा जरूर मारायच्या, पण सलग आपण बोलत सुटायचं नाही. मधे मधे मूल बोलेल असे प्रश्न विचारणं खूप जरूर आहे. आपला जो आवडीचा, कामाचा विषय असेल तो कुठचाही विषय चालतो. राजा-राणी, परी, राक्षस अशाच गोष्टी पाहिजेत याची जरूर नसते. मी तर बांधकामाच्या साइटवरच्या

गमतीजमती मुलांना सांगायचो. मुलं बोबडी बोलली तर बोलू देत, आपण बोबडं बोलू नये असं माझं मत झालंय. यामुळे मुलं भाषेच्या बाबतीत लवकर तयार होतात.

मुलांशी बाबांची मैत्री या मुख्य उद्देशात भाषा चांगली असण्यानी खूप फरक पडतो. पालकांच्या मित्रमंडळींचं घरी येणं जाणं तर असणार आहे. मुलांनी त्यांना काय हाक मारावी हे आईवडलांनी पुढाकार घेऊन ठरवून द्यावं. 'हाक काय मारावी' हे न कळल्यामुळे मुलं मागे राहतात. शिवाय मोठ्यांच्या तुलनेत त्यांची भाषा तेवढी तयार नसते. एकदा हाक मारण्याचा अडसर दूर झाला की अनेक काका-मावश्यांशी मुलांची चांगली ओळख होते. अगदी भरपूर गप्पाही होतात. जेवढं अशा गप्पांचं प्रमाण जास्त तेवढी भाषा लवकर तयार होते.

पुढच्या कुठच्यातरी अवस्थेत मुलं वाचायला लागतात. याबाबतीत शाळांना नव्याण्णव टक्के वेळा माहिती असतं की कुठचीही भाषा शिकण्याचा क्रम– बोलणं, वाचणं, लिहिणं असाच असतो. माझ्या लहानपणी लहान मुलाला बोलण्यानंतर आधी लिहायला शिकवायचे. ती पद्धत अगदी चुकीची होती. मुलं वाचायला लागली आणि पालकांनी त्याबद्दल रागवारागवी, मारपीट, शिक्षा असला काही उद्योग केला नाही की मुलांना त्याची आपोआप गोडी लागते. हळूहळू ती आपसूक लिहायलाही लागतात.

त्यानंतर शाळा ही गोष्ट मुलांना घडवते किंवा बिघडवते. शाळेनी भाषेची गोडी लावण्याचं मुख्य काम जर केलं तर सगळे प्रश्न आपोआप सुटत जातात. मी पूर्वी मुलांना इंग्लिश बोलायला शिकवायचो. मराठी माध्यमाच्या शाळेतली मुलं साधारण सहा महिन्यांत आत्मविश्वास येण्याइतकं इंग्लिश बोलायला लागतात. एकदा भीड चेपली म्हणजेच आत्मविश्वास आला की पुढचं सगळं आपोआप होतं. आता मी मुलांना शिकवत नाही, मोठ्यांना इंग्लिश बोलायला शिकवतो. स्वभावाचेही नमुने दिसतात. भाषेचं सुद्धा कमी-जास्त अंग असतं. मेहनतीची तयारी कमी-जास्त असते, पण पुन्हा पुन्हा एकच गोष्ट समोर येते. खरं मुख्य काम म्हणजे गोडी लावणं असतं आणि ते सर्वांत कठीण आहे.



## 14) मुलांना केलेल्या शिक्षा

सगळ्याच्या सगळ्या मध्यमवर्गीय पालकांच्यात एक गोष्ट आढळते. पुरुष पालक मुलांना जास्त प्रमाणात आणि जास्त जोरानी मारतात. आयाही मारतात पण त्यामागे फार ताकद लावत नाहीत. शिक्षेचे इतर क्रिएटिव्ह प्रकार वापरण्यात आया जास्त पुढे असतात. दुसऱ्यांच्या देखत बोलून आई आणि वडील दोघंही अपमान करतात. ‘जेवायला मिळणार नाही’, ‘जिन्यात जाऊन उभा राहा’, घराबाहेर उभं करून दार बंद करून घेणं, मोरीत कोंडणं हे आया जास्त करतात. ‘तू वेडेपणा केलास म्हणून मी जेवणार नाही’, हे अस्त्र पुरुष अजिबात वापरत नाहीत. अबोलासुद्धा आयांचीच मक्तेदारी आहे. पुरुष ‘गिफ्ट नाही, नवीन कपडे नाहीत’, असा पैशाच्या हत्याराचा उपयोग करतात.

काहीही केलं तरी मुलांना वाईट वाटतंच. मुलं रडतात, खूप वेळ रडतात. काही आणखीन आक्रस्ताळेपणा करतात. मग आईवडलांचं, ‘आधी रडणं बंद कर’, ‘तू काय म्हणतोस ते कळणार कसं?’ वगैरे चालू होतं. खरं सांगायचं तर रडणाऱ्या मुलाला एक-दोन मिनिटं रडू द्यावं, मग जवळ जावं, जवळ घ्यावं. नव्याण्णव टक्के मुलं पाच मिनिटांत रडणं थांबवून त्यांची अडचण सांगतात आणि बोलण्या-ऐकण्याच्या मनस्थितीत पोचतात. एक टक्का हट्टी मुलं असतात त्यांना माझ्या मते शारीरिक व्याधी असते त्यामुळे त्यांना बालरोगतज्ज्ञाला दाखवायला हवं. हे 1% प्रमाण 2% पर्यंत वाढल्याची शंका यायला लागली आहे, पण त्याचं सर्वेक्षण झालं की ते कळेल.

या सगळ्या मुलांना केलेल्या शिक्षांचा मूळ उद्देश अनेक वेळा विसरला जातो. मुलानी योग्य वागावं म्हणून शिक्षा, रागवारागवी, रडारड सगळं चालू आहे हे बाजूला पडतं. खरं म्हणजे जे सर्वांत परिणामकारक असेल ते करू इतका सरळ निर्णय हवा, पण तसं होत नाही. पालक आपला तोल घालवून बसलेले असतात. अगदी सुरुवातीला आपण म्हणालो की, मोठी माणसं आणि मुलं यांच्या आकारात, वयात, अनुभवात फरक असला तरी भावनेच्या तीव्रतेत फरक नसतो. मूल वाईट वाटल्यामुळे, वैतागल्यामुळे रडतं, शब्दात सांगता येत नाही म्हणून इतर मार्गांनी म्हणजे हातपाय आपटून ते व्यक्त करतं. आपण त्याला रडायला बंदी केल्यामुळे ते आणखी वैतागतं. जिद्द विरुद्ध जिद्द सुरू होतं. आता

मुख्य मुद्दा सर्वांत परिणामकारक काय, हे शोधण्याचा मानून पहिली गोष्ट म्हणजे रडायची परवानगी द्यायची, थोडा वेळ शांत राहायचं नि जेव्हा त्या मुलाची समजून घेण्याची मनस्थिती तयार झाली असं वाटेल तेव्हा स्पष्ट शब्दात शांतपणी मुद्दा समजावून सांगायचा. जी गोष्ट आपण मोठ्या किंवा बरोबरीच्या लोकांबरोबर करतो तसं वागायचं. एखाद्या घरातले मोठे लोकही 'आरडाओरडे, तमाशे' या प्रकारचे असले तर मात्र कशाचाच काही उपयोग होणार नाही, कारण मुलं अनुकरणच करणार.

खरी गोष्ट अशी आहे की, मोठं माणूस काय किंवा लहान मूल काय, चूक असताना कोणी बोललं तर चालतं, पण आपली चूक नसताना कोणी रागावलं, मारलं तर ते जिव्हारी लागतं.

समोर बसलेल्यांपैकी काही मुलांना मारणारे पालकही असतील. त्यांनी मारणं पूर्णपणे थांबवावं अशी त्यांना विनंती आहे. तरीदेखील एखादा फटका मारण्याचा प्रसंग आलाच तर त्यावेळेला लक्षात ठेवण्याचं पथ्य सांगतो. डोक्यावर, गालावर थोबाडीत, मानेवर, गळ्यावर कधीही मारायचं नाही. छातीवर, पाठीवर, पोटातही कधी मारायचं नाही. समोरच्या लैंगिक अवयवांवर कधीही नाही. कुल्ल्यावर आणि पोटरीवर मारणं त्यातल्या त्यात बरं. गुडघ्यावर, मांडीवर, नडगीवर, पावलांवरसुद्धा नाही. एवढ्या एका गोष्टीनी सुरुवात झाली तरी मुलाच्या वागणुकीत थोड्याच दिवसांत फरक होईल.

आणखीही वाईटवाईट शिक्षा पालक करतात. चिमटे काढतात, चटके देतात. या शिक्षा तर कधीही करायच्या नाहीत. त्याखेरीज शाळेतल्या शिक्षाही असतात. आमच्या ओळखीच्या एका मुलाला शाळेतल्या बाईंनी नागडं होऊन पायात फूटबॉल धरून वर्गात चालायला लावलं होतं. दुसऱ्या एका मुलाला दारात उभा करून वर्गातल्या प्रत्येक मुलाला त्याच्या थोबाडीत मारायला सांगितलं होतं. ही मुलं सबंध आयुष्यभर या अशा शिक्षा विसरणं शक्य आहे का? शाळा, शिक्षण याविषयी ते मूल काय विचार करेल? त्याच्या संपूर्ण व्यक्तिमत्त्वावर त्याचा कायमचा परिणाम राहील त्याचं काय?

लहान मुलांशी हिंसक वागण्याचे सगळे प्रकार तर टाळायला हवेतच, पण वागणुकीतल्या गमतीतल्या काही अपायकारक गोष्टीदेखील टाळायला हव्यात. माझ्या लहानपणी मोठी माणसं लहान मुलांना 'तुला सूर्याची पिल्लं दाखवू का?' म्हणून दोन्ही कानांपाशी धरून उचलायची. निरनिराळ्या मोठ्या माणसांनी माझ्या लहानपणी मला स्वतःला 15-20 वेळा अशी सूर्याची पिल्लं दाखवल्याचं मला

आठवतंय्. मी बघत असताना इतरांनी किती वेळा केलं त्याला गणतीच नाही. महाधोकादायक प्रकार आहे तो. मुलाच्या जिवावरही बेतू शकतो. अगदी पूर्ण म्हणजे पूर्ण टाळण्याची ती गोष्ट आहे.

या गोष्टीबद्दल किंवा मुलांना मारण्याविषयी एखाद्या आईला किंवा वडलांना सांगायला गेलं की, ते आपल्याला गप्प बसवतात. काही वडील असंही म्हणायला मागेपुढे बघत नाहीत, 'मी त्यांना मारीन नाहीतर काहीही करीन, माझी मुलं आहेत ती.' सगळ्यांना माहिती म्हणून सांगतो, मुलांना मारणं ही गोष्ट कायद्यात बसत नाही. मुलाला मारण्याबद्दल पोलीस चौकीत नवरा किंवा बायको जोडीदाराबद्दलची जरी तक्रार घेऊन गेले तर पोलिसांना ती लिहून घ्यावी लागेल. प्रत्यक्षात या एका कायद्याची अंमलबजावणी कोणीच करत नाही. या बाबतीत विलायतेतली परिस्थिती निराळी आहे. पोलीस आणि न्यायालयं मुलांबद्दल भारतापेक्षा खूप संवेदनाशील असतात.

भारतातल्या सरासरी पालकांना दोन टोकं समजतात. एक टोक म्हणजे खूप, अवास्तव लाड, कौतुक आणि दुसरं टोक म्हणजे अपमान, राग, मारपीट. या दोन्ही गोष्टी टाळण्याची समज म्हणजेच पालकत्वाचं शिक्षण असंही म्हणता येईल. भारतातली बरीचशी मुलं पालकांकडून झालेले अत्याचार सहन करायला शिकतात. मोठी झाल्यावर ते अत्याचार करायला शिकतात. दुष्टचक्र सुरू राहातं. एखादंच मूल या दुष्टचक्रातून बाहेर पडू शकतं.

मी स्वतः माझ्या मुलाला म्हणजे शोनीलला एकूण दोनदा मारलं होतं. पहिल्यांदा त्यानी माझ्या चष्म्याला हात लावला म्हणून. चष्मेवाला माणूस चष्मा या गोष्टीबद्दल जरा जास्त हळवा असतो. मी फटका मारण्याचं कारण नक्की सांगू शकतो, पण त्याला काही अर्थ नाही. मी चुकीचंच वागलो. त्यातल्या त्यात चांगली गोष्ट म्हणजे मी पायावर फटका मारला होता. दुसऱ्या वेळेला मी त्याला पाठीत धपाटा मारला. पुण्याच्या गणपती उत्सवाला मी आधीच वैतागलेलो होतो. माझ्याखेरीज इतर सगळ्यांना गणपती बघायला जायचं होतं म्हणून त्यांच्याबरोबर चाललो होतो. त्या आवाजात, गर्दीत शोनील एकटा पुढे पळत होता म्हणून मी त्याला मारलं. त्याचंही मी समर्थन करू शकीन, पण त्याला काहीही अर्थ नाही. अजिबात मारायचं नाही हेच खरं. शोनीलला हे दोन्ही प्रसंग आठवत देखील नाहीत, पण एवढी वर्षं मधे गेली तरी माझी बोटं मात्र अजून दुखतात.



# 15) मुलांना स्वच्छतेचं शिक्षण

एका गोष्टीबद्दल पालकांच्यामधे अज्ञान आढळतं. मूल रांगण्याच्या वयात असताना जमिनीवरच्या कितीतरी गोष्टी चाटत असतं, खात असतं त्यामुळे त्याची प्रतिकारशक्ती तयार होते. तरी त्या प्रतिकारशक्तीच्या काही मर्यादा असतात. कसंही अस्वच्छपणी वागून चालत नाही. दात घासणं, आंघोळीचा कंटाळा करणं यावरून वाद असतो. संडासातून बाहेर आल्यावर, घराबाहेरून आल्यावर साबणानी हात स्वच्छ करणं हे मूल ऐकत नाही. याउलट उदाहरणंही आहेत. साबण, शांपू यांचा वेड लागल्यासारखा वापर करणारी मोठी माणसं आणि त्यांचं अनुकरण करणारी त्यांची मुलंही आहेत. एवढी रसायनं वापरून त्वचेला खूप नुकसान पोचतं. या सगळ्याचा समतोल पालकांना स्वतःला पाळावा लागतो आणि मुलांना शिकवावा लागतो.

याबद्दलची माहिती आई-बाबा दोघांनाही असायला हवी. ज्या घरात आई-बाबा दोघं मुलांकडे लक्ष देतात, त्या घरात या गोष्टी सोप्या होतात. मुलं कशामुळे स्फूर्ती घेऊन ह्या स्वच्छतेबद्दलच्या गोष्टी आचरणात आणतील याला काही नियम नाही. वेडंवाकडं न बोलता, आवाज न चढवता आई-बाबा दोघांनी हे मुलांना सांगितलं तर हळूहळू बदल नक्की होईल.

आपण मोठी माणसं रोज एकदा किंवा दोनदा दात घासतो. आपल्याला दात किडले तर काय होतं याचा अनुभव असतो. दुसऱ्यांच्या तोंडाला वास येताना जाणवतं, की असाच वास स्वतःच्याही तोंडाला येऊ शकतो. दात पिवळे, काळसर दिसायला लागू शकतात. एवढ्या गोष्टींच्या भीतीमुळे आपण अगदी इमानानी रोज दात घासतो, आपल्याला तशी सवय लागते. इतकी पक्की सवय लागते की, प्रवासात, क्वचित प्रसंगी ठरलेल्या वेळेला दात घासता आले नाहीत तर आपण अस्वस्थ होतो. या सगळ्या जाणीवांमुळे आपला मुलांनी दात घासण्याच्या बाबतीतदेखील खूप आग्रह असतो.

मुलाला मात्र आपल्यासारख्या जाणीवा नसतात. भीती वाटत नाही. त्यामुळे मूल दात घासायचा कंटाळा करतं. यावरून घरात आईवडील आणि मुलांची रोज भांडणं होतात. प्रत्यक्षात अशा भांडाभांडीची काही जरूर नसते. त्याला साधी,

सोपी युक्ती असते. मुलांना पेस्ट, ब्रश, दात घासणं यासाठी छळण्याची तर अजिबात जरूर नसते. घरामधे तुरटीमिश्रित टूथ पावडर ठेवावी. या उपयोगासाठी वस्त्रगाळ गोड पावडर चालत नाही. ती पावडर खरखरीत, गोडसर पण तुरटीमिश्रित पाहिजे. त्यानी बोटांनी दात घासले, ती पावडर नुसती तोंडात ठेवून चुळा भरल्या तरी पुरतात. शिवाय सफरचंदाच्या फोडी, काकडी, टोमॅटोच्या फोडी खायला द्याव्यात. यांपैकी कशाचाही वापर मुलानी केला तरी चालतं. हे आईला माहिती झालं तरी ते पुरेसं नाही, कारण नवरे केवळ या अज्ञानापोटी मुलांच्या दात घासण्यावरून बायकांना छळत बसतात.

माणसाच्या प्रतिकारशक्तीचा शास्त्रशुद्ध अभ्यास करून त्यात पीएच.डी. मिळवलेल्या आमच्या एका मैत्रिणीनी सोप्या शब्दात सांगितलेली थिअरी इथे मुद्दामून सांगतो. ज्या ज्या निसर्गातल्या जीव असलेल्या गोष्टी आहेत त्या सगळ्या गोष्टींपासून स्वतःला अपाय होऊ नये म्हणून प्रतिकारशक्ती आपल्या प्रत्येकात हळूहळू वाढत जाते. अस्वच्छता वाईटच पण अतिस्वच्छतेचा आग्रह तेवढाच अपायकारक असतो, कारण त्यानी मनं दुखावतात.

माणसाला सर्वांत जास्त त्रास निसर्गात नसलेल्या रसायनांचा होतो. स्प्रे, साबण, औषधं, कीटकनाशकं हे प्रतिकारशक्तीचे खरे शत्रू. हा मूळ मुद्दा न समजल्यामुळे अनेक माणसं स्वतःच्या आणि मुलांच्या प्रतिकारशक्तीचा कायमचा घोटाळा करून ठेवतात.

त्यांतल्या काही लोकांना योग्य म्हणजे काय हे समजण्याचा प्रश्न असू शकतो. लहान बाळाला मोठ्या माणसांचा साबण वापरायचा नसतो, नवे बाजारचे कपडे आणून घालायचे नसतात. सैल, स्वच्छ, जुने, मोठ्या भावंडांचे कपडेच वापरायचे असतात हे त्यांना माहितीच नसतं. त्यामुळे बाळाच्या भावनिक हाताळणीचा प्रश्न उद्‌भवत नाही, पण बाकीचे प्रश्न मात्र येऊ शकतात. बाळाला डायपरनी पुरळ उठल्याची तर कितीतरी उदाहरणं सापडतात. डायपरनी पालकांची तात्पुरती सुटका होते पण बाळावर अन्याय होतो. बाळासाठी सुती कापडाचा लंगोट सर्वांत चांगला.

मुलं जरा मोठी झाल्यावर एकेकटी घराबाहेर जाऊन त्यांच्या सवंगड्यांबरोबर खेळतात. त्यात त्यांना थोडंफार खरचटतं. चिखलात खेळतात त्यामुळे जखमेवरही कित्येकदा माती लागते. बहुतेक वेळा हवेत धूळ असते. कधीकधी हातपाय मुरगळतात. या सगळ्या गोष्टी चांगल्या आहेत का वाईट याबद्दल मात्र समजुतीचे

खूप घोटाळे आहेत.

खरी गोष्ट अशी आहे की, या सगळ्या गोष्टी मुलाची प्रतिकारशक्ती सतत वाढवत असतात, त्यामुळे त्या चांगल्या असतात. खास लहान मुलांनाच होणारे काही विकारही असतात. गोवर, कांजिण्या, गालगुंड वगैरे आजार काहींना होतात. पण त्यांची त्या बाबतीतली प्रतिकारशक्ती वाढल्यामुळे नव्याण्णव टक्के वेळा आयुष्यात पुन्हा होत नाहीत. मुलांना लहानपणी निरनिराळ्या लशी टोचतात त्यांचा उद्देश तरी दुसरा काय असतो? प्रतिकारशक्ती वाढवणं.

पिण्याच्या पाण्याचं तसंच. अतिशुद्ध केलेलं सीलबंद बाटलीतलं पाणी कायम पिणाऱ्यांचा तोटा फार होतो. पाणी स्वच्छ असावं यात शंका नाही, पण त्यातले काही क्षार, उपयोगी 'बॅक्टेरियाज' यांचं काय? सारांशात सांगायचं तर, तान्ह्या बाळाला जन्मल्याबरोबर खात्रीशीरपणी जंतुविरहित म्हणजे आईचं दूध. तिथपासून हळूहळू मुलाची प्रतिकारशक्ती वाढवत नेण्याची जबाबदारी सबंध कुटुंबाची आहे. स्वच्छतेचं या पद्धतीचं शिक्षण आई-बाबा आणि संपूर्ण कुटुंबाला फार जरुरीचं आहे.

हे स्वच्छतेचं शिक्षण घरातली मोठी माणसं घेत असताना आसपास निरनिराळ्या वयाची छोटी मुलं असली तर सर्वांत चांगलं.



# 16) मुलांसाठी लैंगिक शिक्षण

लैंगिक शिक्षण द्यावं का देऊ नये याबद्दल दोन टोकाची मतं आपल्या समाजात आहेत. मी आणि शोभा असं मानतो की, लैंगिक शिक्षण द्यावं हा विचार आधुनिक आहे आणि ते अत्यावश्यक आहे याबद्दल आम्ही ठाम आहोत. या पुस्तकसंचात स्वतंत्र लेखात लैंगिक शिक्षणाची गरज आणि त्याचे टप्पे याबद्दल बरंच सविस्तर मी लिहिलेलं आहे. त्यातला अगदी निवडक थोडा भाग इथे सांगतो.

मुलांच्या दृष्टीनी दहाव्या वर्षापर्यंत म्हणजे साधारण चौथी-पाचवी इथपर्यंत स्त्री-पुरुष आकर्षण या विषयाला डोक्यात सुरुवात झालेली असते. पण तरीही त्याबद्दलच्या शंका, उत्सुकता ही सगळी बेतात असते. तिथपासून पुढची सात-आठ वर्षं मुलाचं किंवा मुलीचं लैंगिक व्यक्तिमत्त्व घडवणारी असतात. अलीकडे हे वय मुलींचं तेराच्या आसपास आणि मुलग्यांचं पंधराच्या आसपास असं जाणकार म्हणतायत. या काळात तर आई-वडील दोघांनीही मुलांकडे विशेष लक्ष दिलं पाहिजे. शक्यतोवर आईनी मुलीशी बोलावं आणि वडलांनी मुलग्याशी बोलावं. केवळ सोयीसाठी. कारण निदान लिंगसंदर्भ एकच असतो. जर कुटुंब जास्त आधुनिक विचारापर्यंत पोहोचलं असेल तर खरं सांगायचं म्हणजे घरातल्या सगळ्यांनीही एकत्र बोलायला हरकत नाही. पण 'इन्हिबिशन' याची इतकी निरनिराळी रूपं आणि प्रकार असतात की त्या त्या कुटुंबाला हा निर्णय घ्यायला पाहिजे.

आत्ता आपण घटकाभर धरू की, आधुनिकतेच्या प्रवासात मध्यापर्यंत पोहोचलेलं ते कुटुंब आहे. अशा कुटुंबातल्या काही स्त्रियांशी आणि काही पुरुषांशी बोलल्यानंतर असं लक्षात येतं की, आईला मुलीशी बोलण्याबाबत हा मुद्दा पटवण्याची फारशी गरज पडत नाही. पण विचार पटून देखील म्हणजे तोंडावर तरी हो असं म्हणून प्रत्यक्षात मात्र नव्वद टक्के पुरुष-पालक आपल्या मुलग्यांशी ही गोष्ट प्रत्यक्षात बोलत नाहीत. मुळात आपला पुरुषप्रधान समाज, विकृतींनी भरलेलं वातावरण, त्यात वडलांचं मुलाकडे झालेलं दुर्लक्ष या सगळ्याचा परिणाम आपल्याला माहितीच आहे. सध्याच्या भारतातले जवळजवळ

सगळे पुरुष निरनिराळ्या अवस्थांच्या मानसिक लैंगिक विकृतींनी पछाडलेले आहेत.

आपल्या मुलाचा किंवा मुलीचा काहीही प्रश्न वाटला तर नवरा-बायकोनी एकमेकांत जरूर आधी बोलावं. पण त्यानंतर आधी मुलाशी बोला. तुमची आणि मुलाची तेवढी मैत्री असली तर तो तुमच्याशी नक्की बोलेल. सासू-सासरे, आई-वडील, इतर नातेवाईक यांच्याशी आधी बोलू नका.

पुरुष मंडळींच्या चुकीच्या वागण्याचा लहान मुलांवर परिणाम होणारच. लहान मुलाच्या दृष्टिकोनातून विचार केला तर समोरून येणारी अनोळखी व्यक्ती स्त्री असली तर मुलांना, मुलींना सुरक्षित वाटतं. तो कुठल्याही वयाचा पुरुष असला तर तेवढं सुरक्षित वाटत नाही. दहा ते पंधरा वर्षांच्या किशोरवयाच्या मुलींच्या नजरेतून अनोळखीच काय, ओळखीचेही पुरुष, मग ते तरुण, मध्यमवयीन, म्हातारे कसेही असोत, रागीट, उद्दाम, तुच्छतेनी वागणारे किंवा विकृत असण्याची शक्यता सर्वांत अधिक. अशा वयाच्या मुली मग समोरून येणाऱ्या पुरुषाकडे दुर्लक्ष करतात. माझ्या मते हा पालक शिक्षणातला एक मोठा गंभीर प्रश्न आहे आणि याबद्दलची योग्य, रास्त, वास्तववादी शिकवण पालकांनी मुलगा-मुलगी दोघांनाही देणं फार जरुरीचं आहे.

गरवारे बालभवनमधला एक चमत्कारिक प्रसंग शोभानी मला सांगितला आणि पुढे म्हणाली की, भारतातल्या कुठच्याही वयाच्या कुठच्याही पुरुषावर मुलींशी वाईट वागण्याबद्दल विश्वास ठेवता येणार नाही. हे संभाषण चालू असताना 70 वर्षांचा मी प्रत्यक्ष समोरच बसलेलो होतो. आत्तापर्यंत या विषयात भरपूर माहिती, वाचन, अनुभव सगळं असूनही या प्रश्नाचं इतकं भयानक स्वरूप मला खरं म्हणजे स्पष्ट कळलेलं नव्हतं. चाळिशीच्या वयाच्या मुलांचा बाप असलो तरी मी एक पुरुष पालक आहे. पुरुष आहे हे लक्षात घेऊन आणि शोभा म्हणते ते खरं आहे हे कळल्यामुळे इतर सर्व स्त्रिया याच नजरेनी माझ्याकडेही बघत असतील हा विचार प्रथम मनात आला. पण सगळ्या पुरुष पालकांना मला हे नक्की सांगायचंय की, ज्या वाक्यानी मला साक्षात्कार झाला ते वाक्य आपल्या सगळ्यांसाठी आहे.

आता पुढचा तपशीलाचा भाग सांगतो. वडलांनी स्वतःच्या मुलीला जवळ घ्यायचं का नाही याचं उत्तर काही वयापर्यंत 'हो' असं आहे. पण एका टप्प्यानंतर याच प्रश्नाचं उत्तर 'नाही' असं आहे. पुरुषापेक्षा याबाबतीत स्त्रीला जास्त अक्कल असल्यामुळे तुमची मुलगी स्वतःहून ठरवून तुमच्या जवळ येणं कमी करेल.

त्याची फार काळजी करू नका. मुलीच्याच वयाच्या तिच्या मैत्रिणी, आपल्या नात्यातल्या छोट्या मुली यांच्याशी कसं वागायचं याचं सोपं सूत्र सांगतो. सर्व मुलींना ही नैसर्गिक समज असते. पुरुष पालकांनी आपणहून अशा वयाच्या मुलींना स्पर्श करणं सोडून द्यावं.

हा विषय खूप गुंतागुंतीचा आहे याची मला कल्पना आहे. काही घरांच्यात अगदी रस्त्यावर लोकांच्यात देखील मिठ्या मारण्याची पद्धत असते. तर काही घरांच्यात स्पर्श ही गोष्ट अजिबात नसते. या सगळ्या टोकाच्या गोष्टींच्यात आपण बहुतेक मध्यमवर्गीय कुठेतरी मधे असतो. त्यामुळे त्याचं नेमकं सूत्र वगैरे मी काही सांगू शकणार नाही. पण एक नक्की सांगतो की, आपण पुरुष आहोत म्हणजे विकृत आहोत असा संशय किंचित का होईना सर्व स्त्रियांच्या मनात असतोच आणि हे आपल्याला शोभत नाही याची जाणीव ठेवावी. पुरुष पालक म्हणजेच या समाजातल्या विकृत गटाचा सदस्य असल्यामुळे स्त्रियांच्या तुलनेत पुरुष पालकावर फार जबाबदारी आहे.



## 17) मुलांसाठी वेळ काढणं

एक मोठ्या अक्षरात घरात पाटी लावून ठेवण्याचं वाक्य सांगतो, 'मुलांना क्वालिटी टाईमबरोबर क्वांटिटीही द्यावीच लागते.' 'क्वालिटी लाईफ' नावाची कल्पना बहुतेक सगळ्यांना समजत नाही पण हा शब्द वापरणारे खूप आहेत आणि त्यामुळे मुलांना आम्ही 'क्वालिटी टाइम' देतो आणि आमच्या 'क्वांटिटी'कडे बघू नका असा प्रतिवाद करणारे बरेच पालक मला माहिती आहेत. हे लोक ज्याला क्वालिटी समजतात ते म्हणजे महागाची खेळणी, झगमगीत कपडे आणणं, रविवारच्या पिकनिक्स, वॉटरस्पोर्टस वगैरे वगैरे. पण 'क्वालिटी'चा अगदी साधा आणि खरा अर्थ सांगतो. जे दुसऱ्याला खरोखर पाहिजे असेल ते देणं म्हणजे 'क्वालिटी'. ते देण्यात घालवलेला वेळ म्हणजे 'क्वालिटी टाईम'. आपल्या मुलाला आणि आपल्या मुलीला खरोखर पाहिजे काय आणि आवडतं काय हे शोधून काढण्यासाठी आई-वडलांना भरपूर मेहनत आहे. आपली स्वतःची मुलं या विषयावर आईवडील बोलण्यात किती वेळ घालवतात हे मोजायला लागलं तर लक्षात येतं की, मुलांच्या अभ्यासावर बरंचसं बोलणं होतं, तब्येतीचे काही प्रश्न असतील तर त्याविषयी बोलणं होतं, पण आपल्या मुलाला खरोखर काय पाहिजे आहे याकडे सगळं लक्ष आईनी द्यायचं असतं, आणि वडील त्यासाठी फक्त पैशाची व्यवस्था करतात.

सर्व वडलांना मला असं सांगायचं आहे की सर्वांत धाकटं मूल साधारण 15 वर्षांचं होईपर्यंत त्यांनी त्यांचं सगळं आयुष्यचक्र मुलं या महत्त्वाच्या प्रॉजेक्टवर बेतलेलं पाहिजे. एक महत्त्वाची गोष्ट आपल्याला मान्य आहे की, दिवसाच्या चोवीस तासांपैकी आठ तास झोपेत, आठ तास चरितार्थाच्या धडपडीत आणि बाकी बायको, मुलं, नातेवाईक, मित्र यांच्या सहवासात अशी मूळची निसर्गाची विभागणी आहे. झोपेचे तास एखाद्या दिवशी कमी झाल्यासारखे वाटले तरी त्यात खरा म्हणजे काही बदल करता येत नाही. कामाचे तास आठच्या ऐवजी हळूहळू 10 आणि 12 सुद्धा व्हायला लागले आहेत. म्हणजे सगळी वेळेची चोरी करायची कशातून तर ती कुटुंबासाठी नेमलेल्या वेळेतून. त्या चार-सहा तासांमधे मुलांसाठी वेळच उरत नाही अशी परिस्थिती असल्यामुळे

‘टाईम क्वांटिटी’ सोडाच पण ‘टाईम’च उपलब्ध नसतो.

या प्रश्नाला साधारण मुलाच्या 15 वर्षापर्यंत उपाय शोधायचा असेल तर त्याला एकच इलाज आहे, तो म्हणजे सामाजिक सांसारिक काल्पनिक रुढींची बंधनं यातून मुक्त होणं. लग्नसमारंभ, व्रतवैकल्यं, पार्ट्या, जेवणावळी वगैरेवगैरेंमधे जाणारा वेळ काय वाट्टेल ते करून मुलांसाठी कसा देता येईल या योजनेच्या मागे लागलं पाहिजे. सुरुवात रोज 10 मिनिटांनी झाली तरी चालेल पण 10 ची 15, 15 ची 30 असं करत महिन्याभरामधे खूप कामात असलेल्या वडलांनीसुद्धा मुलांसाठी रोज एक तास इथपर्यंत लवकरात लवकर पोहोचलं पाहिजे. मग हेच तास वाढवत वाढवत रोज दोन-तीन तास मुलांसाठी याला खरा म्हणजे काही पर्याय नाही. बहुतेक पुरुष पालकांची अडचण अशी असते की, मुलांशी संवाद आधीच तुटलेला असतो, तो जोडायचा कसा इथपासूनच सगळी पंचाईत असते. त्याबद्दलच्या काही युक्त्या मी तुम्हाला सांगतो.

अगदी लहान मुलांना आपले स्वतःचे लहानपणचे वेडेपणे सांगणं ही सर्वांत चांगली युक्ती असते. आपलं मूल आपल्या दृष्टीनी जे वेडेपणे करतं ते सगळे आपण केलेले असतातच. एक काळजी घ्यायला लागते की त्या मुलाला तो ‘लेफ्टहँडेड स्लॅप’ म्हणजेच तिरकसपणे केलेला उपदेश वाटता कामा नये. जरा मोठ्या वयात मुलांना विनोद कळायला लागतात. मुलांना सांगता येतील असे विनोद अगदी साधे असले तरी जमवून जमवून रोज एकेक असं करून मुलांना सांगायचे. काही दिवसांनी मुलंही आपल्याला विनोद सांगायला लागतात. असे विनोदी चुटके कधीकधी अगदी फालतू असतात. कधीकधी आपणच त्यांना आठ दिवसांपूर्वी सांगितलेले असतात. या लहानपणच्या वेडेपणाची किंवा विनोदांची ‘लेव्हल’ तुम्हाला समजावी म्हणून माझ्या लहानपणी केलेला एक वेडेपणा आणि एक अगदी फालतू विनोद इथे मी तुम्हाला सांगतो. उद्देश एवढाच की, डोक्यावरून जाणारे, न कळणारे असले विनोद मुलांना सांगायचे नाहीत.

लहानपणी मी कप भरून दूध पिण्याचा हट्ट करायचो. कप भरून म्हणजे किती तर ते बशीत सांडलं पाहिजे. प्रत्यक्षात जास्त दूध प्यायलं की मला त्रास व्हायचा. पुढे मी जेवायचो नाही हे सगळं माझ्या आईला माहिती असायचं. त्यामुळे माझ्या आईनी एक छोटा कप आणला आणि कप भरून, बशीत सांडून मला दूध द्यायला सुरुवात केली. कपाचा आकार वगैरे मला काही कळत नव्हतं. एकदा मी बागेत हिंडणाऱ्या एका छोट्या बेडकाच्या मागे लागलो. बेडूक जाईल

त्याच्या मागे जायचं असं करत करत तो एका काटेरी तारेच्या कुंपणाकडे गेला तरी मी त्याची पाठ सोडली नाही. मी त्या तारेच्या कुंपणाच्या फटीतून वाट काढून पलीकडे जाऊन बेडूक शोधेपर्यंत तो गवतात नाहीसा झाला होता. माझी मात्र पँट फाटली, शर्ट फाटला, मांडीला सुद्धा खूप मोठा रक्तबंबाळ होईपर्यंत ओरखडा उठला, असं सगळं नाटक झालं. एरवी मी इतर वेडेपणांबद्दल मार खायचो. त्या दिवशी मी लागवून घेतल्याबद्दल मार खाल्ला.

आता एक-दोन विनोद सांगतो. एकदा एका डॉक्टरांनी मुलाला सांगितलं की, औषधाची पुडी दुधातून घ्या. त्यामुळे तो मुलगा मोठ्या कढईत दूध घालून त्यात बसला आणि त्यातून औषध प्याला. इतक्या फालतू विनोदाला मुलं हसतात याचीच आपल्याला गंमत वाटते आणि मग दोन-तीन दिवसांनी त्याचे अनेक प्रकार करून करून तोच विनोद मुलं आपल्याला सांगतात. या सगळ्या टप्प्यांच्यात केव्हातरी आपल्याला कळतं की, आता आपला मुलगा विनोद कळण्याच्या बाबतीत मोठा झाला.

त्या अवस्थेनंतर सांगण्याचा एक विनोद सांगतो. एकदा एक सरदारजी दुकानात गेला आणि म्हणाला 'या वॉशिंग मशिनची किंमत काय?' दुकानदारानी उत्तर दिलं की, हे सरदारजींसाठी नाहीय. तो घरी गेला आणि आपल्या बायकोला तक्रार करून हे सगळं सांगितलं. बायको खूप रागावल्यामुळे तो फेटा काढून, दाढी करून पुन्हा दुकानात गेला, पुन्हा त्याच दुकानदाराशी बोलला. दुकानदारानी पुन्हा तेच उत्तर दिलं की, हे सरदारजींसाठी नाहीय. भयंकर भडकून तो घरी गेला आणि सबंध कुटुंब घेऊन पुन्हा दुकानात आला. नवरा, बायको, आई, बहीण सगळे भांडायला लागले की, तुम्ही असं का वागवलं आणि असं का उत्तर दिलं? आम्हाला हे वॉशिंग मशीन पाहिजे म्हणजे पाहिजेच. दुकानदार म्हणाला, 'माफ करा मॅडम, याचं एकच कारण असं आहे की हे वॉशिंग मशीन नाहीय, हा रेफ्रिजरेटर आहे.'

मुलांच्या मित्रमैत्रिणींशी मैत्री हा एक आणखीन खात्रीशीर उपाय आहे. जो कोण जवळचा मित्र किंवा मैत्रीण असेल, त्यांना मुद्दामहून घरी बोलावणं, त्यांच्या आईवडलांशी ठरवून मुद्दामहून मैत्री करणं, हे फार परिणामकारक असतं. त्याच्यात थोडासा वेळ जातो कबूल आहे. तशाच मुलांबरोबरच्या सहली. त्यांचं वर्णन मी काय तुम्हाला सांगायला नको. ठिकाणाला काही महत्त्व नाही, खूप लांब, खर्चिक सहलींना महत्त्व नाही. मुलांबरोबरचा सहवास ही एकच गोष्ट

महत्त्वाची आहे. हा उद्देश जिथे साध्य होईल, अशा ठिकाणी ती सहल पाहिजे. गावातल्या गावात चालेल, बागेत चालेल, प्राणीसंग्रहालयात चालेल.

या सगळ्या निरनिराळ्या गोष्टींना जो थोडासा वेळ लागतो, तेवढाही काढता न आल्याच्या गिल्ट कॉम्प्लेक्समुळे अनेक आईवडील मुलांचा वाढदिवस प्रचंड प्रमाणात साजरा करतात. कधीकधी आईवडील दोघांनाही वेळ नसतो. अशा परिस्थितीचा फायदा घ्यायला अनेक प्रकारच्या 'फूड चेन्स' टपलेल्याच असतात. संपूर्ण इव्हेंट ॲरेंज करतात. गिफ्ट, रिटर्न गिफ्ट्स सगळ्यासकट तयारी करतात. त्या सगळ्याची मजबूत पैशाची मागणी असते ती आईवडलांना सगळ्यात सोपी वाटते आणि त्यातही वडलांचा तर आग्रहच असतो की, आपण वाढदिवस 'आऊटसोर्स' करूया.

अक्षरनंदन ही एक शाळा मला माहिती आहे की, जिथे मुलाच्या बाबांनी पण त्यांच्या निरनिराळ्या कार्यक्रमात भाग घेतला पाहिजे, असा त्यांचा आग्रह असतो आणि या फूडचेन संस्कृतीला विरोध करण्याचा त्यांच्या परीनी ते प्रयत्न करत असतात. संपूर्ण पालकत्वाचं मर्म आपल्या मुलाला शेवटी मोठं झाल्यावर स्वतंत्र करणं हे जर मान्य असलं तर मधल्या सगळ्या पायऱ्या पालकांना कळल्या पाहिजेत आणि पूर्ण मान्य पाहिजेत.

आमच्या ओळखीच्या दोन कुटुंबांच्या दोन टोकाच्या तऱ्हा मी तुम्हाला सांगतो. एका कुटुंबात आईनी मुलांना कायमच कामाच्या बाईकडे ठेवलं आणि स्वतः सांभाळण्याच्या भानगडीतच ती पडली नाही. दुसऱ्या उदाहरणात, आई मुलांना कोणावरही सोपवायला तयार नाही, त्यांना सांभाळायला कोणीही ठेवायला तयार नाही. मला आणि शोभाला ही दोन्ही टोकं चुकीची वाटतात. पहिल्या उदाहरणात आवश्यक तेवढी जवळीक निर्माण न होण्याची शक्यता आहे आणि दुसऱ्या उदाहरणातली मुलं स्वतंत्र कशी होणार हा प्रश्न आहे.

खुद्द आमच्या मुलांना मी वेळ देऊ शकलो नाही हे तर खरं आहे. शोभानी आणि मी मुलं होण्याआधी ठरवलं होतं की दोघांनी अर्धवेळ काम करायचं, वेळा जुळवून आळीपाळीनी मुलांकडे लक्ष द्यायचं. प्रत्यक्षात मी धंद्याला सुरुवात केल्यावर लक्षात आलं की, सोमवार ते शनिवार 12 तास रोज काम केल्याशिवाय सुटकाच नाही. मला या गोष्टीचं अजूनही वाईट वाटतं.



## 18) मुलांची पैशाबद्दलची समज

पैशाबद्दल मुलांची विचारसरणी कशी बनते आणि पालकत्वाचा त्याच्याशी कसा संबंध येतो ते जरा सांगतो. अगदी लहानपणी म्हणजे 4-5 वर्षांपर्यंत मुलाला पैसे म्हणजे नाणी एवढंच माहिती असतं. त्याच्या आकारातला फरक त्यांना कळतो, पण किमतीतला फरक समजत नाही. नोटांकडे त्यांचं फारसं लक्षच जात नाही. शोभाचं नि माझं एकदा कशाविषयी तरी बोलणं चाललं होतं की, आपल्याकडे ही वस्तू आणायला पुरेसे पैसे नाहीत. आमची मुलगी आभा तिचा नाण्यांनी भरलेला डबा घेऊन आली नि म्हणाली, 'हे काय, पाहिजे तेवढे पैसे आहेत आपल्याकडे!' हा झाला गमतीचा भाग. मुलांना खरोखरच प्रश्न असतो की, आपण गरीब आहोत का श्रीमंत? मध्यमवर्गीय ही कल्पना लहान मुलांना खरंच समजत नाही. मुळात पैसे देऊन वस्तू विकत घ्यायची असते हे सुद्धा मुलांना समजायला वेळ लागतो. दुकानात वस्तू दिसली आणि थेट उचलली असं मुलं करून आईवडलांना लाज वाटेल अशा पद्धतीनी वागू शकतात.

माझं नि शोभाचं मत असं की जेवढ्या लवकर मुलांना आपण पैसे, वस्तूची किंमत, स्वस्त, महाग वगैरे कल्पनांचा अनुभव देऊ तेवढं चांगलं. त्यांना दुकानात घेऊन जाणं, त्या वस्तूचा उपयोग, किंमत, प्रकार या सगळ्याशी त्यांची ओळख सावकाश सावकाश होऊ देणं फार जरूर आहे. सरतेशेवटी प्रत्येक कृतीचा अंतिम उद्देश एकच आहे, तो म्हणजे मुलाला स्वयंपूर्ण होण्यासाठी उत्तेजन देत राहणं.

मुलं लहान असोत, मोठी असोत, प्रत्येक कुटुंबाला दर महिना सरासरी मिळकत, सरासरी खर्च, बचतीच्या नियमित सवयी या प्रत्येक गोष्टीचा अंदाज असलाच पाहिजे. मुलं 4-5 वर्षांची झाली की, महिन्याच्या मिळकत– खर्च-बचत याची चर्चा त्यांच्यादेखत व्हायला पाहिजे. सुरुवातीला मुलं एक-दोन वर्षं नुसती ऐकतील. 7-8 वर्षांच्या आसपास प्रश्न विचारायला लागतील. पुढे 9-10 वर्षांची झाली की एखाद्या मुद्द्याबद्दल थोडंसं बोलायला लागतील. 10-12 वर्षांची झाली की एखादी उपयोगी कल्पना मांडतील. 12-14 वर्षांची मुलं तर

हे मिळकत - खर्च - बचत यांचे तक्ते हौसेनी लिहून काढतील. 10वी, 12वीच्या काळात कदाचित काही मुलं याकडे दुर्लक्ष करतील. सर्वसाधारण मध्यमवर्गीय कुटुंबाच्या दर महिन्याच्या तक्ता लिहिण्याच्या कामाला इतका कमी वेळ लागतो की आधीपासूनची सवय असली तर बहुतेक मुलं अगदी 10वी - 12वीच्या परीक्षेच्या ताणाच्या काळातही त्या तक्त्याचं काम हौसेनी करतील.

याचे अनेक फायदे असतात. स्वतःच्या कुटुंबाची नेमकी आर्थिक परिस्थिती माहिती असल्यामुळे चुकीच्या वस्तूंसाठी मुलं आईवडलांच्या मागे लागण्याची शक्यता जवळजवळ नाहीशी होते. अशा सगळ्यांनी मिळून चर्चा करून जमाखर्च लिहिण्याच्या पद्धतीमुळे आणखी एक गोष्ट होते. पालकांपैकी कोणी स्वतःवर होणाऱ्या खर्चात आणि मुलांवर होणाऱ्या खर्चात अजाणतेपणानी भेदभाव करत असलं तर त्या पालकाच्याही विचारात बदल होतो. अशा चर्चांच्यात आजी-आजोबा त्याच कुटुंबात राहात असले तर त्यांनीही सामील झालं तर सोन्याहून पिवळं. कुटुंबातल्या खऱ्या लोकशाहीसाठी या कल्पनेचा जरूर वापर करावा.

कुटुंबाच्या पारंपरिक रचनेत पुरुषानी चरितार्थ चालवण्याची जबाबदारी घेतली की त्याचं कर्तव्य संपलं अशी योजना होती. त्या काळात खर्चाच्या निर्णयाला होकार-नकार पुरुषाच्या हातात असल्यामुळे त्याच्या हातात सत्ता खूप होती. त्यामुळे आईनी वडलांचा धाक दाखवायचा, मार द्यायचा तर ती कामगिरीही वडलांकडे, एकूणच शिस्त-विभाग वडलांनी सांभाळायचा अशी रचना होती. मुलांशी प्रेमानी वागण्याची पद्धत नसल्यामुळे मुलांनी वडलांना घाबरायचं अशीच पद्धत होती. नव्या संसाराच्या रचनेत केवळ वाईट वागण्याच्या धाकाच्या विभागणीला पुरुषांनी जाणीवपूर्वक नकार द्यायला हवाय. पैशावर नियंत्रण विभाग वडलांकडे असला की फॅमिली बजेटही वडलांकडे हे ओघानी येणारच.

पूर्वी वाढदिवसाचं प्रस्थ कमी असायचं. पण संसाराच्या नव्या रचनेत वाढदिवस साजरा करणं, त्याचा खर्च, त्यासाठी कोणाचीतरी परवानगी काढायला लागतेच. शोभाचं आणि माझं एव्हाना असं मत बनलंय की, वाढदिवशी अमुक वस्तू हवी असली तर त्या अमिषानी मुलांकडून काहीतरी करवून घ्यायचं ही सुद्धा चुकीची गोष्ट आहे. वर्षभर व्यवस्थित वागणारे, जरुरीच्या सगळ्या वस्तू आणून देणारे वडील असले तर वाढदिवसाला मागणी करण्याजोगं काही उरणारच नाही आणि वाढदिवस या कल्पनेचं महत्त्वच कमी होईल. विशेषतः पैशाचे निर्णय

घेणारे वडील असले तर त्यांनी याचा गंभीरपणे विचार करायला हवा.

दुकानात जाऊन खरेदी याविषयी बोलताना एक गोष्ट राहिली. अशी काही मुलं असतात की त्यांना प्रत्येकच गोष्ट विकत घ्यावीशी वाटते. ती दुकानात हट्ट करतात, रडतात, थयथयाट करतात. निरनिराळ्या शब्दात मुलांना गरज, सोय आणि चैन ह्यांतला फरक समजावून द्यावाच लागतो. घरी असतानाच मुलाला सांगणं की एकच वस्तू घेणं आपल्याला शक्य आहे, हे तर करायलाच पाहिजे. माझ्या मते पालक श्रीमंत असले तरी त्यांनी हे पथ्य पाळायला पाहिजे. मी असं इतकं स्पष्ट म्हणतोय कारण मुलांना 4-5 वर्षांपासून हे समजलंच पाहिजे की आपण 'आहे रे' च्या वर्गात असलो तरी आसपास 'नाही रे' ची संख्या फार मोठी आहे.

एका महत्त्वाच्या वाक्याचा तुम्ही सगळ्यांनी विचार करावा अशी विनंती आहे. 'लहानपणच्या गरिबीमुळे मोठेपणी समृद्धी येते'. गटचर्चांच्या विषयांमधे या एका वाक्याचा फार परिणाम होतो. आत्ता आपण तशी गटचर्चा घेणार नाही आहोत म्हणून त्याविषयी थोडक्यात सांगतो. नातेसंबंध, पैसे आणि आत्मसन्मान या तीनही महत्त्वाच्या गोष्टींची समज अगदी लवकर लहानपणीच येते ती लहानपणच्या गरिबीमुळे आणि या समज लवकर येण्याच्या समृद्धीला इतर कशाचीही तोड नसते. भूक लागण्यापूर्वी जेवण समोर आलं तर त्याचं महत्त्व वाटत नाही. खरोखर कडकडून भूक लागण्याचा अनुभव फार महत्त्वाचा असतो. मी अजिबात धार्मिक उपासांच्या बाजूनी बोलत नाहीय, पण मधूनमधून कडकडून भूक लागण्याचा अनुभव सगळ्यांना आवश्यक आहे. आरोग्यालाही त्याचा फायदा होईल आणि 'नाही रे' गटाबद्दलची समजही वाढेल.

मला स्वतःला अगदी स्पष्टपणी वाटतं की हवी तेवढी मुलं झाल्यावर आणि सर्वांत धाकटं मूल 3-4 वर्षांचं झाल्यावर बायकोनी पैसे मिळवायला सुरुवात केली पाहिजे. या पुस्तकसंचात 'मिळवती बायको' असं स्वतंत्र प्रकरण असल्यामुळे त्याविषयी इथे आणखी फार काही सांगत नाही. करिअरमधे काही वर्षांचा खंड पडल्यामुळे परिणाम होणार आणि तरी त्यासकट बायकोनी मिळवती व्हावं. तरीही नवराबायको दोघांच्या कामाचा विचार करून मुलांना पुरेसा वेळ देण्याचा निर्धार करायलाच लागतो. मुलं लहान असेपर्यंत बाहेरगावी जावं लागणं अपरिहार्य असेल तेवढंच जावं, बाहेरचे इतर कार्यक्रम कमी करावेत. शेवटी चरितार्थ चालवलाच पाहिजे, पण 'मुलं महत्त्वाची की करिअर' हा विचार

करायलाच हवा. खुद्द आमच्या जावयानी असा निर्णय घेतला, ते आम्हाला खूप चांगलं वाटलं. 7 आणि 3 वर्षांच्या दोन मुलग्यांना आणि बायकोला इथे ठेवून त्यानी परदेशी जायचं मान्य केलं असतं, तर पैसे खूप जास्त मिळाले असते. पण त्यानी त्याला नकार दिला.

माझ्या ओळखीची एक लग्न झालेली मुलगी आहे. ती नवऱ्याबरोबर अमेरिकेत राहात होती. नवऱ्यानी तिला नीट वागवलं नाही आणि ती सोसत राहिली. मग कळलं की ती बरंच शिकली पण मातृभाषेत. इंग्लिश येत नाही, गावाबाहेरही कधी एकटी गेलेली नाही. अशा परिस्थितीतली न्यूनगंडग्रस्त मुलगी लग्नानंतर थेट अमेरिकेत पोचली होती. माझ्या मते आई-वडलांनी टप्प्याटप्प्यानी मुलांवर जबाबदारी टाकत, त्यांचा आत्मविश्वास वाढवत नेत त्यांना स्वयंपूर्ण केलं पाहिजे. तसं त्यांनी न केल्यानी मुलगी त्याचे परिणाम सोसतेय.

आम्हाला वाटतं की, हे टप्पे पालकांनी मुद्दामून ठरवून आपल्या कुटुंबाच्या परिस्थितीप्रमाणे आखायला पाहिजेत. प्रथम घराच्या आसपासचा परिसर वेळ काढून दाखवायचा. मग शाळेच्या आसपासचा परिसर, मग घरापासून शाळेचा रस्ता, मधे वाटेत लागणारी दुकानं, घरं, सगळं. ही छोटी चक्कर वाढवत न्यायची. मुलाच्या दृष्टीनी ती सहलच असते. पालकांनी तेवढा वेळ मात्र काढायला हवा.

लहान मुलांना दिसेल ती वस्तू उघडून, तोडून-मोडून बघायची असते. कुठचंही नॉर्मल मूल हे करणारच. ते हळूहळू आपोआप कमी होतं, पण तोपर्यंत त्याला 'पैशाचा चुराडा', 'विध्वंस' काहीही म्हटलं तरी त्याला इलाज नाही. आपण हा सगळा अभ्यास मध्यमवर्गीयांचा करतोय. जेवढा चुराडा होतो तेवढा आपल्याला पैशानी परवडू शकतो, फक्त तो आपल्याला कळत नाही, पटत नाही म्हणून आपण मुलांना रागवारागवी करतो. मुळात आपण आपल्या नोकरी-धंद्यात चुकीच्या निर्णयांमुळे कुटुंबाचं पैशाचं नुकसान करतो. त्यामानानी मुलांनी केलेल्या विध्वंसाची तुलनासुद्धा करता येत नाही. लहान मुलं भिंतीवर काहीतरी काढून ठेवतात आणि आईवडील त्याला विध्वंस समजतात ही गोष्ट तर घरोघरी आढळते. आम्ही दोघांनी आमच्या मुलांच्या लहानपणी त्यांना भिंती खराब करण्याचं बऱ्यापैकी स्वातंत्र्य दिलं होतं. आमच्या मुलीकडे तर घरातली एकही भिंत रिकामी नसते. अनेक चित्रं, अक्षरं, मित्रमंडळींची नावं, शाळेतला अभ्यास, काहीकाही भिंतीवर अनेक पद्धतींनी काढलेलं असतं.

आमच्या मुलांनी, शोनील आणि आभानी त्यांच्या लहानपणी एक खेळ काही काळ खेळला. साबणाची वडी घेऊन ती किसायची. आमच्या नातवंडांनाही हा खेळ खूप आवडतो. नंतर तो कीस वापरायचा. मला वाटतं की, या खेळात तर विध्वंस, नुकसान काहीच होत नाही आणि तरी मुलं खूश होतात. असे खेळ आवर्जून शोधून काढून मुलांना खेळायला द्यावेत. असाच दुसरा खेळ म्हणजे वर्तमानपत्रं फाडून त्याचे बारीक तुकडे करायचे. मुलांनी ही मजा अनुभवली की ते तुकडे भिजवून त्या 'पेपर पल्प'च्या वस्तू बनवायच्या.

आमच्या पालकशिक्षणाच्या वर्गात 'तुमच्या मुलांमधे कुठचे गुण असावेत,' असं विचारलं की लोक भली मोठी यादी बनवतात. गुणांच्या यादीपैकी एकाही गुणासाठी पैसे लागत नाहीत हे सगळ्यांना कळतं. कारण 'द बेस्ट थिंग्ज इन लाईफ आर फ्री'. मध्यमवर्गीय संसारात त्या सगळ्यासाठी लागणारे पुरेसे पैसे असतात. प्रश्न एवढाच उरतो की, यादीमधे आपण सांगितलेले गुण 'स्वतःत आहेत का', याचं उत्तर मात्र नकारार्थी येतं.

आपल्या मुलाला भविष्यात स्वतंत्र करण्यासाठी खूप विचार आणि नियोजन करावं लागतं. आपल्याकडे पुरेसे पैसे आहेत, पण वागणुकीतले गुण दाखवूनच ते टप्प्याटप्प्यानी हातात मिळतील अशी योजना बनवून कुटुंबाचं त्याबद्दल एकमत असावं लागतं. आजी-आजोबा आणि मुलांचे पालक यांची अशा विषयांवर तपशीलवार चर्चा हवी. सगळ्यांनी 'आपकमाई' आणि 'बापकमाई' यातला फरक समजावून घ्यायला हवा.



# 19) मुलांचे खेळ - आरोग्य

आपल्या मुलात कुठचे गुण असावेत या यादीत मुलाला व्यायाम किंवा खेळाची आवड असावी असं बरेच पालक म्हणतात. या एका बाबतीत तर फार स्पष्टपणी सांगता येतं की, आई आणि वडील दोघंही व्यायाम करताना दिसले तर मुलं आपोआप त्या वाटेनी जातील. मुळात व्यायाम, खेळ ही गोष्ट आयुष्यभर करण्याची आहे, टेलिव्हिजनवर खेळ बघण्याची नाही, हे पटणाऱ्या वडलांचीच संख्या कमी असते. स्त्रियांचं प्रमाण त्याहून कमी असतं. याबाबतीत शाळाही उदासीन असतात. मग मुलांवर संस्कार होणार ते फक्त टी.व्ही., लॅपटॉप, मोबाईलवरच्या खेळाचे, मैदानावर स्वतः खेळण्याचे-मेहनतीचे नाहीत.

मुलं खेळ खेळली की ती केव्हातरी धडपडणार, खरचटणार, जखमी होणार, हातपाय मुरगळून घेणार. हे सगळं बेताच्या प्रमाणात असलं तर चांगलंच आहे. फार प्रमाण असलं तर विचारात, खेळण्याच्या पद्धतीत काहीतरी चूक आहे असं समजावं. खेळ, व्यायाम या गोष्टींनी प्रतिकारशक्ती वाढायला मदत होते. त्यामधे कधी गरज लागलीच तर लहान मुलांसाठी होमिओपथी, बाराक्षार औषधं फार उपयोगी पडतात. मुलांसाठी ॲलोपथीच्या गोळ्या आणि त्यात 'ॲंटिबायोटिक्स' अगदी नाइलाजाच्या परिस्थितीत देणारा डॉक्टर निवडावा.

मी, शोभा, आमची मुलगी आभा– आम्हाला खेळांचे खूप प्रकार माहिती आहेत. संपूर्ण शरीर वापरण्याचे, डोळे आणि हात वापरण्याचे, बोलण्याचे असे तीनही प्रकारचे खेळ मुलांसाठी महत्त्वाचे आहेत हेही माहिती आहे. तरी एक गोष्ट आमच्या मुलीच्या संसारात चुकलेली आहे, असं आम्हाला वाटतं. खेळणी फार झाली, स्वतः खरेदी केल्यामुळे असोत नाहीतर कोणीकोणी भेट दिल्यामुळे असोत, पण संख्याच फार. ती खेळणी नीट मांडून ठेवली नाहीत तर आयत्या वेळेला हवं ते काही सापडत नाही. मांडून ठेवण्यासाठी खूप कपाटं आणि खूप जागा लागते.

मुख्य म्हणजे मुलांना खेळण्याची किंमत राहात नाही. अशा उच्चमध्यमवर्गीय कुटुंबात आणखी एक गोष्ट चुकीची घडत असते. ती म्हणजे साहित्याशिवाय खेळण्याचे खेळच मुलांना माहिती नसतात. इलेक्ट्रॉनिक, रिमोट ऑपरेटेड कार्स,

पिस्तुलं, कॉम्प्यूटर गेम्स हेच त्यांचं जग असतं. मला वाटतं हे चूक आहे. बिनसाहित्याचे, हालचालीचे, बैठे, बुद्धीचे आणि साहित्याचे असे सगळे प्रकार मुलांनी खेळात वापरण्याची गरज असते. गरवारे बालभवनमधे हा दृष्टिकोन ठेवून मुद्दामून प्रयत्न करतात. बालभवनमधे शोभाला आणखी एक चमत्कारिक गोष्ट नेहमी अनुभवायला मिळते. मुलाला खेळामधला निखळ आनंद समजत असतो. त्या आनंदापलीकडे मुलाची काही अपेक्षा नसते. आईवडलांच्या डोक्यात मात्र अगदी भलते विचार घोळत असतात.

शोभाला असे लोक खूप प्रश्न विचारतात. खूप सूचना करतात. 'तुम्ही स्पेशल कोचिंग चालू करा,' म्हणतात. बालभवनच्या दृष्टीनी मुलांना अनेक खेळांची ओळख होणं जास्त महत्त्वाचं असतं. मुलांनी स्वतःची आवड, क्षमता लक्षात घेऊन, निरनिराळे खेळ खेळून बघून सावकाश ठरवावं पुढे कुठचा खेळ खेळायचा ते. खेळ ही करिअर करायची का नाही हेही ठरवायचं असतं. हे स्पेशल कोचिंगवाले पालक फार महत्त्वाकांक्षी असतात. ते कधीकधी मुलाला बालभवनमधून काढून कसल्यातरी स्पोर्टस् कोचिंगला पाठवतात. त्यांना आपल्या मुलाला सचिन तेंडुलकर, सानिया मिर्झा नाहीतर साइना नेहवाल बनवायचं असतं. ते त्या मुलाच्या खूप मागेदेखील लागतात. हे अगदी चूक आहे. अगदी लहानपणापासून मुलांना खेळण्याचं स्वातंत्र्य मिळणं फार महत्त्वाचं आहे.

आमच्याकडे आमची नातवंडं कधीकधी राहायला, कधी खेळायला येतात. आम्ही दोघं मुलांना पूर्ण स्वातंत्र्य देतो. ते एकमेकांशी भांडत नाहीत ना, इजा करत नाहीत ना एवढ्यावर लक्ष ठेवतो. थोडी नासधूस आम्हाला चालते. आम्ही त्यांना रागवत नाही. चुकीचं वागायला लागली तर अडवतो, समजावतो. ती खूश असतात.

मुलं खेळणारी असली की आनंदात असतात आणि त्यांचं आरोग्यही चांगलं राहातं. डॉक्टरांकडे जाण्याचं प्रमाण बेताचं राहातं.



## 20) मुलांमुळे करिअरमधे खंड

मिळवती बायको या विषयाचा मगाशी आपण ओझरता उल्लेख केला. मी हेही सांगितलं की शोभाची आणि माझी मुलांसाठी निम्मा-निम्मा वेळ देण्याची कल्पना पार फसली. भारतभर, महाराष्ट्रभर आणि पुणं-मुंबईत बायकोनी चरितार्थ सांभाळायचा आणि नवऱ्यानी घर-मुलं सांभाळायची असा निर्णय घेतलेली कुटुंबं फार कमी असतात. आमच्या ओळखीत, माहितीत असे हाऊस-हजबंड दोन-तीनच आहेत. बाकी सगळीकडे बायकाच घर सांभाळतात. मिळवत्या असल्या तर डे-केअर, पाळणाघर, रजा असं काहीतरी करतात किंवा आई, सासूबाई यांच्यापैकी कोणाकडे तरी मुलांना ठेवून मार्ग काढतात. पण मुलांची जबाबदारी आईच घेते. वडील नाही. त्यामुळे करिअरमधला खंड म्हणजे मिळवत्या स्त्रीच्या करिअरमधला खंड असाच अर्थ काढायला हवा आणि तोही मुलांमुळे. याबद्दलच आत्ता आपण बोलतो आहोत, आणि हा विषय पुरुषाला समजावा ही त्यामागची कल्पना आहे.

शोभाच्या बाबतीत 5 वर्षांचा खंड पडला. परदेशातून भारतात आल्यावर लगेच शोनीलचा जन्म झाला. मग अडीच वर्षांनी आभाचा जन्म झाला. आभा अडीच वर्षांची झाल्यावर शोभा पुन्हा कामाला लागली. सुरवातीला थोडं, मग अर्धवेळ, मग आभा 5 वर्षांची झाल्यावर पूर्णवेळ असं हळूहळू शोभानी काम वाढवत नेलं. आभाच्या करिअरमधेही मुलांमुळे बरीच वर्षं खंड पडला. आभाला दोन मुलगे आहेत आणि त्यांच्यात चार वर्षांचं अंतर आहे. शोभाच्या पद्धतीनी आभानी देखील हळूहळू काम वाढवत नेलंय्. आभाचा करिअरमधला खंड शोभाच्या खंडापेक्षा थोडा मोठा आहे. आमच्या सुनेला म्हणजे ॲनास्तेसियाला एक दत्तक मुलगा आहे. तिलाही करिअरमधल्या खंडाची मानसिक तयारी करावीच लागली. आम्ही इंग्लंडमधे जरूर तेव्हा जाऊन शक्य तेवढी मदत करू.

मुख्य मुद्दा असा की, सगळ्या आयांना हे कळायला पाहिजे की, मुलं होणार म्हटलं की, तेव्हापासून काही वर्षं त्यात जाणारच. नवरा-बायको दोघांनी ते पूर्ण खुशीनी मान्य करण्यातच शहाणपणा आहे. त्यापायी चिडचिड, मुलांवर राग, एकमेकांवरचं डाफरणं, आईवडील, सासू-सासरे यांना दोष देणं या

सगळ्या न करण्याच्या गोष्टी आहेत.

लहान मुलांचा सांभाळ करणं हा एक मोठा सामाजिक प्रश्न बनलेला आहे. आपुलकीनी, चांगलं काम करणाऱ्या, धुणीभांडी, केरपोछा करणाऱ्या कामवाल्या जशा क्वचितच असतात तशा प्रकारे मुलांना आपुलकीनी सांभाळणाऱ्या, त्यांच्याशी चांगलं वागणाऱ्या, प्रामाणिक बायका दुर्मिळ असतात. धुणी-भांडी, केर वगैरेंचा संबंध केवळ वस्तूंशी आहे. त्या कामांसाठी यंत्रं आहेत, त्यामुळे त्या कामांचं काहीतरी करता येईल. मुलं ही गोष्ट पूर्ण निराळीच आहे. समाजातल्या या प्रश्नाचं स्वरूप फार गंभीर आहे. पाळणाघरं आहेत, पण तोही केवळ धंदा म्हणून केल्यामुळे चांगली पाळणाघरंही क्वचित आढळतात. पाळणाघरात काम कसं करायचं याच्या प्रशिक्षणाची फार गरज आहे. ही गोष्ट केली तरी अनेक कुटुंबांच्यातले अनेक प्रश्न मिटतील. कामाच्या जागी अशी चांगली पाळणाघरं चालवली तरी प्रश्न मिटेल.



# 21) भावंडांचे संबंध

संपूर्ण वैवाहिक आयुष्याकडे बघताना जसं लग्नसमारंभ कसा याला काही महत्त्व उरत नाही, लग्नानंतरची पहिली काही वर्षं कशी गेली यापेक्षा 10-15 वर्षांनंतर त्या जोडप्याचे संबंध कसे याला जास्त महत्त्व येतं, तसंच मुलांच्या बाबतीत होतं. मुलं लहानपणी आपल्या देखत जरी व्यवस्थित वाढली तरी काही वर्षांनी आपण वयस्कर किंवा म्हातारे असू, मुलं आपापल्या उद्योगाला, संसाराला लागलेली असतील. अशा मोठ्या झालेल्या भावंडांचे एकमेकांशी संबंध कसे असतील ती आपल्या पालकत्वाची खरी परीक्षा असेल.

मी आणि शोभा या अर्थानी असं म्हणू शकतो की शोनील (वय 42) आणि आभा (40) या आमच्या दोन्ही मुलांचे संबंध उत्तम आहेत. याचा अर्थ मी आणि शोभा या परीक्षेत पास झालो आहोत. आणि तरी ज्यांची मुलं अजून लहान आहेत त्यांना सध्याचे प्रश्नच जास्त महत्त्वाचे वाटणार हे उघड आहे. पालक विद्यापीठात शिकायला येणाऱ्यांपैकी नव्याण्णव टक्के लोक लहान मुलांबद्दलच्या प्रश्नासाठीच आलेले असतात.

पालकांचा आणखी एक प्रश्न असतो. तो म्हणजे भावंडांच्या भांडणांबद्दल. सिबलिंग रायव्हलरी हा विषय जगभर तसाच आहे. एकच मूल असलं तर भांडायला कोणी नसल्यामुळे भांडणं होणार नाहीत, पण इतर अनेक तोटे होतील. पुढे त्या मुलाला असं वाटू शकेल की भावंड असतं तर बरं झालं असतं. पण त्या अवस्थेत काही करता येणार नाही. समजा, एका मुलापेक्षा जास्त मुलं असली की त्यांचा सतत एकमेकांशी संबंध येणार. प्रत्येक वस्तू दोन, तीन आणणं शक्यही होत नाही आणि योग्यही होत नाही. वस्तू, खाणं जे असेल ते वाटून घ्यावंच लागतं. शक्य असेल तर दोन-तीन तुकडे करणं, आळी-पाळीनी वापरणं, त्यासाठी वार, वेळा, तारखा ठरवणं हे सगळं आईवडलांना करावं लागतं.

कधी कधी नावाच्या चिठ्ठ्या टाकूनही निर्णय करावा लागतो आणि तरी महत्त्वाची गोष्ट अशी की, हे सगळे प्रश्न शक्यतोवर त्यांचे त्यांना सोडवू द्यावेत. लक्ष ठेवावं, शारीरिक इजा होऊ नये हे जरूर बघावं, पण सारखं मधे पडू नये.

कोणाचीही एकाची बाजू शक्यतोवर घेऊ नये. नैसर्गिकपणी पालकाला आपल्यासारखं दिसणारं किंवा वागणारं मूल तात्पुरतं जास्त आवडतं, पण तरी शेवटी बाजू घेऊ नयेच. मुलांच्या मधे पडायची गरज असली तरच हस्तक्षेप करायचा, हे आपलं पक्कं धोरण ठेवावं आणि मुलांनाही ते सांगावं. स्वतःच्या भांडणात स्वतःलाच मार्ग काढावा लागतो हे त्यांच्या मनावर बिंबलं की पुढे खूप सोपं होतं.

अशा अनेक प्रसंगांत पालक कसे वागतात याच्यावर भावंडांचे भविष्यातले संबंध अवलंबून असतात. आम्ही समुपदेशनाच्या निमित्तानी अनेकांना भेटत असल्यामुळे एकमेकांसाठी खूप करणारी प्रेमळ भावंडं ते एकमेकांची तोंडं न बघणारी भावंडं असे अनेक प्रकार बघितले आहेत. मोठेपणचे भावंडांचे जवळचे/ मध्यम/दूरचे संबंध याचा लहानपणच्या कुटुंबाच्या आर्थिक परिस्थितीशी काही संबंध नाही एवढं मी नक्की सांगू शकतो. काही प्रमाणात ते आनुवंशिक असतं नि बाकी पालकत्वाच्या कौशल्यावर अवलंबून असतं.

दोन भावंडं असली तर दुसऱ्या मुलाच्या जन्माच्या वेळेला मोठ्या भावंडाची जास्त काळजी घेण्याची जरूर असते. त्याच्या बाबतीत अनेक पालकांकडून खूप चुका होतात आणि त्या पुढे सर्वांना सोसाव्या लागतात. अशा दोन भावंडांच्यात कधी प्रेम असतं तर कधी खूप भांडणं होतात. मोठ्या भावंडामधे शारीरिक ताकद खूप जास्त असते. मोठ्यानी धाकट्याला फार जोरानी मारू नये, इजा करू नये म्हणून खूप लक्ष ठेवावं लागतं.

दोन भावंडांना दोन वस्तू आणायला लागणं, तशा दोन सारख्या वस्तू नाही आणल्या तर मुलांनी भांडाभांड करणं हा पालकत्वाचा पराभव समजावा. एकच वस्तू न भांडता आळीपाळीनी वापरणं हेच योग्य आहे. तीच पालकांची परीक्षा आहे.

काही आई-बाप ठरवून एकाच मुलाला जन्म देतात. अशा मुलाची वाढ करताना मुख्य पथ्य एकच. कुठचीही गोष्ट मागितली की लगेच मिळते अशी मुलाची समजूत होता कामा नये. लोकांशी, बरोबरच्या मित्रांशी योग्य वागण्याची समज त्या मुलात निर्माण करणं हे जबाबदारीचं काम आहे.

मुलं कधीकधी धाकट्या भावंडाची खूप क्रूर चेष्टा करतात. मोठी मुलं मिळून लहान मुलाची इतकी चेष्टा करतात, त्याला इतका त्रास देतात की ते रडकुंडीला येतं. एखाद्या मुलाच्या टपलीत मारतात ते मूल अगदी रडेपर्यंत. कधीकधी गुदगुल्या करतात. त्या इतक्या की ते मूल शेवटी रडायला लागतं.

एखाद्या मुलामधे एखादं शारीरिक व्यंग असतं. त्याच्याशी सगळी मुलं मिळून फार वाईट वागतात. कधी व्यंग नसतं पण एखादं मूल फार बारीक अंगकाठीचं, फार उंच, खूप गोरं, खूप काळं, बराच काळपर्यंत बोबडं बोलणारं असंही असू शकतं. अशा वेळी पालकांनी जाणीवपूर्वक मोठ्या भावंडापासून धाकट्याचं संरक्षण करावं लागतं. या संपूर्ण विषयात नवरा-बायकोची भूमिका एक हवी.

किशोरवयातले मुलांचे, मुलींचे आणखी निराळे प्रश्न असतात. एखाद्या मुलीला एखाद्या मुलावरून चिडवतात. तिला ते असह्य होऊन कधीकधी ती केवळ त्यापायी शाळा सोडते. रॅगिंग इतक्या प्रमाणात चालतं की काही मुलं आत्महत्या करतात. आपलं मूल अशा प्रकारच्या काही कृत्यात नाही ना, याकडे पालकांनी कायम लक्ष द्यायला पाहिजे. त्यानी इतरांना त्रास देऊ नये आणि त्यानी इतरांकडून त्रास सहनही करू नये.

मी आणि शोभानी अनेक एकेकटी, आत्मकेंद्री मुलं बघितली आहेत. प्रेमाचे उत्तम संबंध असलेली भावंडंही बघितली आहेत. त्याचबरोबर एकमेकांबद्दल पूर्ण बेपर्वा, अलिप्त अशीही भावंडं पाहिली आहेत. दुर्दैवानी अशीही खूप भावंडं आम्हाला माहिती आहेत की, ज्यांचं एकमेकांशी पार फाटलेलं आहे. अशांचं प्रमाण बरंच आहे म्हणून तर हा विषय महत्त्वाचा आहे.

चांगलं पालक बनणं महत्त्वाचं आहेच. नवरा-बायकोचं सहजीवन दर्जेदार, समृद्ध हवं असेल तर सहजीवनाचा अभ्यास आणि पालकत्वाचा अभ्यास अटळ आहे. आणखी पुढच्या टप्प्यावर आणखी एक विषय महत्त्वाचा ठरतो. नवरा-बायकोची मालमत्ता आणि त्याची न्याय्य वाटणी. ती गोष्ट जर म्हाताऱ्या पालकांनी धड केलेली नसली तर आयुष्यभर घेतलेल्या काळजीपूर्वक पालकत्वावर बोळा फिरतो. याच पुस्तकसंचातले ज्येष्ठ नागरिकांशी संवाद, मृत्यूपत्र याविषयीचे लेख जरूर वाचावेत. त्यामुळे या विषयातल्या अभ्यासाला मदत होईल.



# 22) समाजाचं मुलांकडे दुर्लक्ष

एक महत्त्वाचा पण दुर्दैवी मुद्दा मांडायचाय. 'लहान मुलं म्हणजे देवाघरची फुलं' वगैरे वचनं आपल्याला माहितीयत्. आपल्या स्वतःच्या मुलांसाठी आपण खर्च करायला तयार असतो, पण समाजातल्या सगळ्या मुलांसाठी काही करायला तयार नसतो. अनोळखी मुलांशी आपण पुरेशा सन्मानानी वागू शकत नाही. 'ह्या मुलांमधूनच देशाचे भावी पंतप्रधान होणार आहेत,' हे आपल्याला कळतं पण त्यासाठी आपण काही करायला तयार नसतो.

सामाजिक पालकत्व ही कल्पना आपल्याला समजलेली नाही. कुठचाही एक गट दुसऱ्या गटावर अवलंबून असला की दुसऱ्या गटाकडे सामाजिक पालकत्वाची जबाबदारी असतेच. आपण सुखवस्तू आहोत आणि खूप मोठा समाज वंचित गटातला आहे, म्हणजे त्यांची जबाबदारी आपल्यावर आहेच. प्रत्येकानी सामाजिक कार्यकर्ता बनावं असं आपण म्हणत नाही, पण आपल्यावर अवलंबून असलेली कष्टकरी माणसं, त्यांची मुलं इतक्या लोकांचा तरी विचार आपण करायलाच हवा. याच पुस्तकसंचात 'समाजकार्याच्या दिशा' या लेखात याबद्दल सविस्तर मजकूर आहे. जसा सामाजिक पालकत्वात मुलांचा विचार येतो तसा वृद्धांचाही येतो. त्याविषयी पण 'ज्येष्ठांशी संवाद' हा लेख असल्यामुळे इथे आणखी सविस्तर लिहीत नाही. काही ज्येष्ठांशी आपण सन्मानानी वागतो कारण आपल्या ओळखीच्या मध्यमवयीन यशस्वी माणसाचे ते आईवडील असतात आणि याच कारणामुळे आपण त्यांच्या मुलांशीही सभ्यपणे वागतो. पण इतर अनोळखी मुलांशी आपण नीट वागत नाही कारण ते वागणं आपल्यामधे राजकारण्यांकडून झिरपलं आहे.

राजकारणी मुलांशी नीट वागत नाहीत कारण मुलं 'मतदार' नाहीत. गरवारे बालभवनची शोभा संचालक असल्यामुळे मला बऱ्याच गोष्टी बारकाव्यानी माहिती आहेत. पुणे महानगरपालिकेतल्या जवळजवळ सगळ्या राजकारणींना सारसबागेजवळची गरवारे बालभवनची इतकी मध्यवर्ती जागा मुलांच्या खेळण्यासाठी वापरली जाणं म्हणजे वाया जाणं असं वाटतं. यावरून पुण्याच्या सामाजिक पालकत्वाची पातळी तुमच्या लक्षात येईल.

बालभवनला त्रास देणाऱ्या लोकांच्यात खूप जास्त संख्येनी पुरुष आहेत. प्रश्न नेहमी असा पडतो की, या पैसेवाल्या, प्रसिद्ध आणि राजकारणी लोकांची स्वतःची मुलं कुठे खेळली? नातवंडं कुठे खेळतात? त्यांना जसं मैदान लागतं तसं इतरांना नाही का लागत?

गरवारे बालभवनला त्यांच्या मध्यवर्ती जागा असण्यापायी त्रास देणाऱ्या एका मोठ्या राजकारणी माणसाला आम्ही एकदा भेटायला गेलो. त्रास देण्यामागे त्यांचाच हात होता याबद्दल आम्हाला खात्रीलायक माहिती होती. प्रत्यक्ष बोलताना मात्र ते म्हणाले, 'मुलांच्या खेळायच्या जागेबद्दल त्रास द्यायला मी काय वेडा आहे का? डोक्यातून हे पूर्ण काढून टाका.'



# 23) संस्कार

माझ्या दृष्टीनी संस्काराची योग्य व्याख्या सांगतो, 'सध्याच्या परिस्थितीतल्या प्रश्नांना उत्तरं शोधण्याची क्षमता वाढेल असा मनावर झालेला परिणाम' म्हणजे संस्कार. सध्याच्या परिस्थितीला उत्तर शोधणं हा मुद्दा मान्य असला तर त्यात 'आधुनिक संस्कार' म्हणजे काय याचा शोधच फक्त बसू शकतो.

पुरुष-पालक, आया या सगळ्यांची एक मोठी गैरसमजूत मला इथे दूर करावीशी वाटते, 'संस्कार' पालकांनीच आपल्या मुलांवर करायचे असतात यात काही वाद नाही, पण संस्काराचा खरा अर्थ पालकांना कळला आहे असं शोभाला नि मला वाटत नाही. दोन टोकाचे चुकीचे अर्थ आम्हाला दिसतात. एक म्हणजे पारंपरिकतेच्या निरर्थक धार्मिक आचरणाचा आग्रह म्हणजे संस्कार समजतात. दुसरा पाश्चात्त्यीकरण म्हणजे संस्कार समजतात.

पारंपरिक संस्कार नावाचं भूत मानगुटीवर बसलेले शेकडो-हजारो लोक आहेत. जागोजागी असे लोक संस्कार वर्ग चालवतात, त्यात श्लोक, संस्कृत-वचनं, पुराणकथा असं काही काही घालतात. मुलांशी संवाद साधून त्यात 'ब्रह्मांडाचं रहस्य' उलगडतात. मोक्ष, अध्यात्म असे संदेश देतात. प्रत्यक्षात माझा या अभ्यासाला विरोध नाही. कारण मी त्या पंथाचा नसलो तरी ज्याला ज्या गोष्टीनी मनःस्वास्थ्य मिळेल ती त्यानी करावी असं मला नक्की वाटतं. मला अडचण अशी वाटते की, चुकीच्या वयात या समजायला कठीण अशा गोष्टी मुलांवर लादल्यानी मुलांची दिशाभूल आणि घोटाळाच जास्त होईल.

मला वाटतं की, साधारण 12 वर्षांच्या मुलामुलींना महत्त्वाचे प्रश्न पडायला लागलेले असतात. हे जग कसं निर्माण झालं असेल? माझं जीवितकार्य काय? ईश्वर खरोखर असतो की नाही? धर्म याचा नेमका अर्थ काय? तेव्हा या प्रश्नांची उत्तरं द्यायला हळूहळू सुरुवात करावी. खरोखर प्रश्न पडल्याशिवाय उत्तर देणं म्हणजे भूक लागलेली नसताना जबरदस्तीनी खायला घालण्यासारखं आहे, त्यामुळे त्याची अजिबात घाई करू नये.

धार्मिक संस्कारांच्या बाबतीतली पंचाईत अशी असते की उत्तर देणाऱ्यालाच यातली पुरेशी माहिती नसते. ईश्वरवाद आणि निरीश्वरवाद या दोन्ही बाजू माहिती

असलेल्यानीच फक्त त्याविषयी बोलावं. धर्म म्हणजे काय, निरनिराळ्या धर्मांच्यात चांगलं-वाईट काय हे माहिती असणाऱ्यानीच त्याविषयी शिकवावं. इतर काही माहिती नसलेली व्यक्ती मुलाला ईश्वरवाद आणि हिंदूधर्माचं महात्म्य या वाटेनीच नेणार. म्हणजेच कर्मकांडं शिकवणार, त्यांची सक्ती करणार. थोडक्यात हिंदू कर्मकांडांनी मुलाचे डोळे बांधून टाकणार. म्हणजे इतर काही दिसायलाच नको.

मगाशी आपण उल्लेख केलेला पाश्चात्त्यीकरणाला आधुनिक मानून केलेल्या संस्कारातही काही दम नाही. पाश्चात्त्य देशात कधी न गेलेले किंवा 15 दिवसांची 'ट्रिप' करून आलेले लोक पाश्चात्त्यीकरणाचे गोडवे गाताना आपण बघतो. तिथे राहून, काम करून, चरितार्थ चालवून, लोकांशी वागण्याचा अनुभव घेतल्याशिवाय त्या संस्कारांच्या चांगल्या-वाईटाची कल्पनाच येणं शक्य नाही.

निरनिराळ्या राज्यात, देशात हिंडणं, तिथल्या लोकांचे प्रश्न, त्यांनी त्यावर शोधलेली उत्तरं तपासणं, हवामान, राहणीमान, निरनिराळे रीतीरिवाज, निराळ्या संस्कृती, निराळ्या भाषा हे सगळं अनुभवणं यालाच तर देशाटन म्हणतात. त्याचे खूप फायदे असतात हेही नक्की. मुख्य फायदा म्हणजे त्या माणसाचे पाय जमिनीवर राहतात. कुठच्याच गोष्टींनी तो हुरळून जात नाही किंवा कोसळून जात नाही. तो स्थितप्रज्ञतेच्या वाटेवरचा प्रवासी बनतो.

आपल्या मुलांच्यात ही देशाटनाची आवड निर्माण करायची असली तर मात्र पालकांनी टप्प्याटप्प्यानी लहानपणापासून त्याला उत्तेजन द्यायला लागतं. सोयी कराव्या लागतात, खर्च मान्य करावा लागतो. हे सगळं पैशानी परवडणारे बरेच पालक असतात. पण देशाटनातल्या फायद्यांची त्यांना समज नसते. मुलाला दूर पाठवायला ते चक्क घाबरतात आणि शेवटी मुलाचं नुकसान करतात.

या पुस्तकसंचात आधुनिक, पारंपरिक संस्कार म्हणजे काय यावर स्वतंत्र लेख असल्यामुळे त्याविषयी इथे फार सांगणं बरोबर नाही. एकच सांगतो, योग्य संस्कार हा गंडविरहित असावा लागतो. अहंगंड किंवा न्यूनगंड दोन्हींपासून दूर राहण्यासाठी पालकांना मुलांवरचे संस्कार शिकायचे आहेत. त्याला असंस्कार म्हणतात.

माझं मत संस्कार या गोष्टीबद्दल एवढ्या वर्षांच्या माझ्या अभ्यासानी स्पष्ट बनलेलं आहे. संस्कार याचा अर्थ सनातन हिंदू धर्माचे संस्कार, परंपरा पाळण्याचे संस्कार असा बहुतेकांनी घेतलेला दिसतो. मला तो अर्थ चुकीचा वाटतो. संस्काराचा शेकडा नव्व्याण्णव टक्के लोकांना वाटणारा अर्थ चुकीचा आहे असं

म्हणण्याचं धारिष्ट्य ज्या अर्थी मी करतो आहे त्याअर्थी योग्य संस्कार म्हणजे काय ह्याबद्दल माझं काहीतरी म्हणणं नक्की असणार. पंचाईत अशी आहे की, सनातन हिंदू धर्माचे पारंपरिक संस्कार चुकीचे आहेत असं विधान करणाऱ्या माणसाचं पुढचं बोलणं ऐकून घ्यायलाच कोणी तयार नाही. त्याला उत्तर एकच. पहिले चुकीचे संस्कार पुसण्यासाठी प्रयत्न करणं. तसे प्रयत्न करायला तयार असणारेही कमी नि ते चुकीचे संस्कार कसे पुसायचे हे जाणणाऱ्यांची संख्याही अगदी कमी आहे.

जुन्या संस्कारांना नवं रूप देऊन त्यात धन्यता मानणारे खूप लोक होते. अजूनही आहेत. एक-दोन उदाहरणं सांगतो, वटसावित्रीची पूजा करण्यासाठी वडाच्या झाडापाशी जाण्याऐवजी घरी वडाची छोटी फांदी आणणं किंवा वनस्पतीशास्त्राच्या पुस्तकामधल्या वडाच्या झाडाचं चित्र मांडून त्याची पूजा करणं याला आधुनिकता समजणारे खूप लोक आहेत. गणपती उत्सवात शाडूच्या किंवा पीओपीच्या गणेशमूर्तीऐवजी कागदाच्या लगद्यापासून बनवलेल्या गणेशमूर्तींची स्थापना करून दीड दिवसात त्याचं घरच्या बादलीत विसर्जन करणं म्हणजे आधुनिकता मानणारे भरपूर लोक आहेत.

खरी गोष्ट अशी आहे की, परंपरेचे संस्कार पुसण्यासाठी 'असंस्कारा'त काही वर्षं घालविल्याशिवाय मी म्हणतोय तो आधुनिक संस्कार पचणार नाही.

असंस्कार म्हणजे पारंपरिक कर्मकांडं आयुष्यातून पूर्णपणी काढून टाकणं. ते कठीण आहे. आसपासचा समाज कर्मकांडांच्या बाजूला तुम्हाला सारखा लोटत असतो. त्याला शांत डोक्यानी, विरोध न करता, वैयक्तिक वाद न घालता त्यातून बाहेर पडावं लागतं. या प्रकाराला काही वर्षं खर्ची पडतात. असंस्काराच्या अवस्थेला माणूस पोचला की आधुनिक संस्कार समजून घेणं त्यामानानी सोपं आहे. मुळात आधुनिक संस्काराची व्याख्या फार सोपी आणि छोटी आहे.

आता एवढी प्रस्तावना पुरे झाली. थेट आधुनिक संस्कार, त्याची परंपरा, त्यातल्या रूढी या सगळ्यांचं वर्णन एका वाक्यात सांगतो. 'आसपासच्या लोकांच्यात आपल्या स्वतःपेक्षा जो दुर्बल असेल त्याला पूर्ण निःस्वार्थीपणी मदत करणं' म्हणजे आधुनिक संस्कार. या पुस्तकात संस्कार या विषयाबद्दल स्वतंत्र सविस्तर लेख असल्यामुळे इथे एवढंच सांगतो की, पालकांनी प्रथम सनातन पारंपरिक धर्मसंस्कारांच्या कर्मकांडांपासून असंस्कारापर्यंत प्रवास करावा. त्यानंतरचा प्रवास तुलनेनी फार सोपा आहे, याची खात्री बाळगा.

असंस्काराच्या प्रवासासाठी देशाटन उपयोगी असतंच, त्याखेरीज भव्य अवकाश उपयोगी पडतं. मोठं मैदान, अथांग समुद्र, खळाळत वाहणाऱ्या नदीचं सान्निध्य मनाला मोकळं करतं. छोट्या छोट्या खोल्यांचा छोटा फ्लॅटच ज्यांना परवडतो त्यांनी निदान गच्चीवर जाण्याचा प्रयत्न करावा. मोकळ्या मैदानात खेळण्याची मुलांना सवय लावावी. टी.व्ही.वरचं दृश्य ही मोठ्या जगाची छोटी प्रतिकृती आहे. ते म्हणजे जग नाही याची सतत जाणीव ठेवावी. छोट्या जागांच्यात, छोट्या खोल्यांच्यात मनही कोंडलं जातं याची सतत आठवण ठेवावी.

पुरुष पालकत्वाच्या या अभ्यासात व्यवस्थापनशास्त्रातल्या काही उपयोगी गोष्टी जरा बघूया. पहिली महत्त्वाची गोष्ट म्हणजे आपल्या कुटुंबाच्या सगळ्या गरजा पुऱ्या करण्यासाठी स्वतः भरवशाची व्यक्ती बनणं महत्त्वाचं आहे. आपण बायकोला, मुलांना दिलेला शब्द पाळायला विशिष्ट पद्धतीचा वापर करावा लागतो. नोंदी कराव्या लागतात. स्वतः पुढाकार घेऊन कुटुंबातल्या, मुलांच्या प्रश्नासाठी कुटुंबचर्चा घडवून आणाव्या लागतात. समाजात खूप चुकीच्या गोष्टी चालू असतात त्यांना तोंड कसं द्यायचं हे मुद्देसूदपणे मांडावं लागतं. लोकशाही पद्धतीनी वागण्याचा संस्कार स्वतःच्या वागणुकीनी मुलांवर करायचा असतो. शेवटी मुलांच्या व्यक्तिमत्त्व विकासाची जबाबदारी पालकांवरच असते की! या पुस्तकसंचात 'विवाह, रोजचं आयुष्य आणि व्यवस्थापन' आणि 'व्यक्तिमत्त्व विकास' या दोन्ही विषयांवर स्वतंत्र लेख आहेतच.

मी लहान मुलांचं समुपदेशन करत नाही पण मुलांबद्दलच्या समुपदेशनात काही महत्त्वाच्या गोष्टींचा विचार असतो, तो मला माहिती आहे. मुलांचं लहानपणचं वागणं दोषपूर्ण असेल, तर अशी मुलं त्यांच्या पुढच्या जीवनात स्वतःकरता आणि इतरांकरता अनेक समस्या निर्माण करत असतात. अशा समस्या येऊ नयेत म्हणून मुलांच्या सामाजिकीकरणाचा सखोल अभ्यास मानसशास्त्रात अत्यंत शास्त्रशुद्ध पद्धतीनी झाला आहे. चांगलं सामाजिकीकरण म्हणजे योग्य प्रकारे केलेलं समुपदेशन ही गोष्ट स्पष्ट आहे. समाजाबरोबर वागण्याचं शिक्षण हा पालकांनी मुलांना शिकवण्याच्या महत्त्वाच्या गोष्टींपैकी एक आहे.



# 24) 'स्पेशल' मुलं

याशिवाय खरी सर्वांत मोठी कठीण परीक्षा असते मतिमंद, स्पॅस्टिक, पॅराप्लेजिक थोडक्यात 'स्पेशल' मुलांच्या पालकत्वाची.

सोनोग्राफीमधेच आजकाल नव्व्याण्णव टक्के वेळा मतिमंदत्व कळतं. या विषयाबद्दल पुरेशी माहिती काढलेली नसते कारण नकारात्मक विचार टाळण्याकडेच बहुतांश लोकांचा कल असतो. गर्भारपणी अशी काही अडचण कळली तरी वेळेवर निर्णय न घेतल्यामुळे पुढे आयुष्यात मुलाची आणि स्वतःची रोज परीक्षा असते. मी आणि शोभानी याविषयी पुरेशी माहिती, चर्चा केल्यामुळे बेचाळीस वर्षांपूर्वी म्हणजे मोठ्या मुलाच्या जन्माच्या वेळीही आमच्यात स्पष्ट समतोल विचार होता. आपल्याला मतिमंद मूल नको हा विचार स्पष्ट होता.

पुढे प्रश्न येतो तो समाजातल्या एक टक्का मुलांना मतिमंदत्व असू शकतं त्यांचा. काही मुलं गतिमंद असतात. शिवाय कानांचे, डोळ्यांचे, कितीतरी प्रश्न असतात. मुख्य मुद्दा असा आहे की, अशा मुलांनी जन्म घेतला आहे हे सत्य मान्य केल्यावर त्याविषयी रास्त विचार समाजानी करायलाच हवा. समाज म्हणजेच आपण नि आपण म्हणजे 'नॉर्मल' मुलांचे स्त्री-पालक आणि पुरुष-पालक. स्पेशल मुलांकडे बघितलं की आपण किती नशीबवान आहोत हे जाणवतं.

माझा त्या विषयाचा अभ्यास नाही पण शोभाकडून ऐकल्यामुळे त्यातल्या एक-दोन गोष्टी मी सांगू शकतो. जेवढी नॉर्मल मुलांसारखीच वागणूक 'स्पेशल' मुलांना मिळेल तेवढी ती लवकर सुधारण्याची शक्यता असते. अशा 'स्पेशल' मुलांशी वागण्याची समज मोठ्यांपेक्षा लहान मुलांना जास्त असते. गरवारे बालभवनमधे अशी मुलं थोड्या संख्येनी असतात. बालभवनची इतर मुलं अशा मुलांना व्यवस्थित सांभाळून घेतात.

स्पेशल एज्युकेशन घेऊन या मुलांसाठी काम करणाऱ्या सगळ्या स्त्री-पुरुषांना माझा सलाम!



# 25) तरुणांचे पालक म्हणून जबाबदाऱ्या

मगाशी आपण सगळ्यांनी मिळून एक निष्कर्ष काढला की लहान मुलांना आपल्याला वाटतं त्यापेक्षा बरंच कळतं. तीन-चार वर्षांच्या मुलांना बरंच काही कळतं हे मान्य केल्यावर आपल्या लग्नाच्या वयाच्या मुलांना कळतं का नाही हा प्रश्नच कुठे येतो? फरक एवढाच की लहान मुलं मतभेद निराळ्या प्रकारे सांगतात आणि मोठी मुलं शब्दांत बोलतात.

तरुणपणी आपण आपल्या आई-वडलांचं ऐकत होतो का, हे जरा आठवून बघा! कदाचित उलट बोलत नसू, पण त्यांच्या मनाप्रमाणे नक्कीच वागत नव्हतो. जे पालक स्वतःला आधुनिक म्हणवून घेतात, मुलांवर प्रेम आहे म्हणतात, त्यांनी तरी हे सगळं लक्षात घ्यावं आणि मुलांना निर्णयस्वातंत्र्य द्यावं, अशी आपली नक्कीच अपेक्षा असते. त्यांचं सल्लागार बनावं, पण त्यांचे निर्णय आपल्या हातात घेऊ नयेत. जनरेशन गॅप वर मात करण्यासाठी, मुलांना समजून घेण्यासाठी जरूर प्रयत्न करावेत. अनेक कार्यशाळांत मुलं-मुली काय म्हणतात माहीत आहे, 'आम्हाला सगळं पटतंय् पण हे कुणीतरी आमच्या आई-वडलांना सांगायला पाहिजे हो!'

विवाह या विषयाबद्दल खास प्रश्न असतात. तरुणांशी संवादासाठी 3 गोष्टी लागतात 1) निःस्वार्थी प्रेम, 2) दुसऱ्याचं ऐकण्याची कला. त्यात एकाग्रतेचं कसब आणि वेळ असणं आलंच. 3) व्यक्त करण्याची कला. व्यक्त करताना, बोलताना, खरं, स्पष्ट, गोड, थोडक्यात आणि वेळेवर ते सांगता आलं पाहिजे. याखेरीज पालक मुलं संवादात भारतीय वातावरणातला विवाह हा निव्वळ दोन व्यक्तींचा नसतो तर दोन कुटुंबं त्यांनी जोडलेली असतात. पाश्चात्त्य विचारांच्या प्रभावामुळे स्वतःला वाटतं ते करायचं हा व्यक्तिवाद झाला आणि कुटुंबाला वाटतं तसं वागायचं म्हटलं की कुटुंबवाद. यापैकी काय करायचं हा प्रश्न घरोघरी असतो.

प्रत्यक्षात एक चिरंतन सत्य सतत लक्षात ठेवावं लागतं, 'एक माणूस दुसऱ्याला बदलू शकत नाही. दुसरा स्वतः ठरवतो तेव्हाच बदल होतो.' जेव्हा असं दृश्य दिसतं की एखादी व्यक्ती स्वतःचा स्वभाव पूर्णपणी बाजूला ठेवून

दुसऱ्याच्या मतानी वागतेय् तेव्हा कुठल्यातरी भीतीनी, ओढीनी तात्पुरता झालेला तो परिणाम असतो. या सगळ्यामुळे जोडीदाराची निवड आणि लग्न करताना अनेक निर्णय घ्यावे लागतात, त्याबद्दल निर्णय कोणी घ्यायचा हाच प्रश्न बनतो. हुंड्याबद्दल, खर्चाबद्दल, देण्याघेण्याबद्दल, समारंभाबाबत, ईश्वर, कर्मकांडं, विधी, सगळ्याबद्दल निर्णय मुलगा-मुलगी यांनी घ्यायचा की त्यांच्या आईवडलांनी याबद्दल प्रचंड गोंधळ आढळतो.

आपल्या मुलामुलींच्या लग्नाचा निर्णय आपण स्वतः घ्यायचा आहे असं पालकांना मनापासून वाटतं. पुन्हा सांगतो, खरी रास्त गोष्ट अशी असते की, पालक हे निव्वळ 'कन्सल्टंट' असायला पाहिजेत. मुलगा-मुलगी ह्या दोघांचं ते आयुष्य आहे आणि निर्णय त्यांनीच घ्यायला पाहिजेत. पालक-मुलांचा उत्तम संवाद होण्यासाठी त्या वर सांगितलेल्या तीन गोष्टींपैकी प्रेम बऱ्याच पालकांचं असतं. ऐकण्याची कला त्यामानानी कमी आढळते आणि व्यक्त करण्याच्या कलेमधे बहुतेक पालक काठावर पास होतात किंवा नापासांच्या यादीत असतात. खूप बडबड, काही न बोलणं आणि त्यानंतर स्फोट हे बहुतेकांच्या वागणुकीचं वर्णन असतं.

अगदी खरोखर जवळची, प्रेमाची, मनातलं जवळजवळ सगळं एकमेकांशी बोलू शकतील अशी माणसं संख्येनी अगदी कमी असतात, हे तुम्हाला मुळात मान्य असलं तर आपल्या जवळच्या प्रेमाच्या अगदी थोड्या लोकांच्यातली ही मुलं आहेत हे कसं विसरून चालेल?

समजा, या कार्यशाळेमधे तुम्हाला तुमच्या चुका कळल्या असतील तर त्याबद्दल नुसतं वाईट वाटतं असं म्हणत बसण्यापेक्षा तुमच्या मुलांशी बोलून त्या चुका कबूल करायला तुम्ही तयार आहात का? काही लोक घुटमळतात, पण निम्म्याच्यावर लोक हे कबूल करून माफी मागायला तयार होतात. त्यातला महत्त्वाचा भाग असा आहे की, मुलं फार मोठ्या मनाची असतात. ती तुम्हाला झटकन् माफही करून टाकतात.

घटकाभर असं धरूया की, हा मुद्दा तुम्हाला सगळ्यांना आणि वाचकांना पटलेला आहे. आता निरनिराळ्या वयातली मुलं वाढवताना नेमकं काय करायचं आणि काय टाळायचं हाच तर पालक शिक्षणातला मुख्य विषय आहे. शोभा या विषयातली खूपच अनुभवी व्यक्ती आहे. तिच्याशी हा संवाद स्वतंत्रपणी साधायला हवा. आज आपला फोकस तरुणांच्या पालकत्वावर आहे. त्यापूर्वी

सगळ्यांना लागू असलेला एक महत्त्वाचा मुद्दा सांगतो, आपलं आपल्या आईवडलांवर जेवढं प्रेम असतं त्यापेक्षा आपल्या मुलांवर जास्त प्रेम असतं. प्रत्येकानी तपासून बघा आणि त्याचं मर्म काय याचा विचार करा. एक अगदी साधा प्रश्न आम्ही सगळ्यांना विचारतो आहोत.

आपलं आपल्या मुलांवर खरंखुरं मनापासून प्रेम आहे का? दोघांच्यात म्हणजे पालक आणि मुलं यांच्यात एकमत असेल तर प्रश्नच नाही, पण कुठच्याही बाबतीत मतभेद असला तर एकूण फक्त चार मार्ग संभवतात - 1) पालकांनी मुलांच्या मनाप्रमाणे करणं. 2) मुलांनी पालकांच्या मनाप्रमाणे वागणं, 3) दोघांनी समझोत्यानं मधला मार्ग काढणं. 4) दोघांनी आपापल्या निराळ्या मार्गानी जाणं. याखेरीज पाचवा मार्ग असूच शकत नाही. तुमच्या घरात यांपैकी काय चालतं?

ज्या पालकांचं खरं प्रेम असतं त्यानी असं म्हणणं अपेक्षित आहे - 'तू काय म्हणतेस ते मला पटत नाही. पण तरी माझा असा आग्रह आहे की, तू तुझ्या मनाप्रमाणेच वागावंस', त्यापुढे असं म्हटलं पाहिजे की, 'आपल्यात मतभेद आहेत. पण त्यावरून व्यक्तिगत पातळीवरचा मनं दुखावणारा वाद आपण टाळू. आपण यावर पुन्हा एकदा नीट विचार करून पुन्हा बोलूया. हे आपलं भांडण नाही.' 'जो जे वांछील तो ते लाहो' हे काय फक्त पसायदानात म्हणण्यासाठी आहे? खऱ्या प्रेमामधे त्याची अंमलबजावणी आवश्यक आहे.

जीवनसाथमधे येणाऱ्या तरुण अविवाहित तरुण मुलामुलींना सांगून एवढ्या सगळ्या चर्चांनंतर त्यांच्या आईवडलांची आम्ही मुद्दामहून बैठक बोलावतो. त्यात मात्र पार फजिती होते. त्यांच्याशी बोलताना फजिती होण्याची अडचण नसते. पालक येण्याचीच पंचाईत असते. कारण स्पष्ट आहे. या तरुण मुलांच्या पालकत्वाचं कसब शिकण्यासाठी पालक तयारच नसतात.



# 26) पालकत्वामागचा समतोल विचार

तत्त्वज्ञानाच्या संपूर्ण अभ्यासात संदर्भ कुठचाही असला तरी त्या विषयातला समतोल सांभाळणं ही गोष्ट सर्वांत महत्त्वाची मानलेली आहे. पालकत्वाच्या बाबतीतली काही उदाहरणं इथे देतो. त्याच्यापुढे सतत, रोज, समतोल वृत्तीनी, सारासार विचार वापरून जे निर्णय घ्यायचे आहेत ते तुम्हालाच घ्यायचे आहेत. तुमचे व्यक्तिगत, जोडप्याचे, कुटुंबाचे, त्या त्या विशिष्ट मुलाचे तपशील, तुम्हालाच माहिती असणार. या काही उदाहरणांचा तुम्हाला ते निर्णय घेताना उपयोग होईल.

पालकत्वातल्या अनुभवात दोन परस्परविरोधी तत्वांमधून निर्णय घेण्याची परिस्थिती येते त्याचं एक उदाहरण घेऊ. पालकत्वामधे एक गोष्ट अगदी नक्की आहे, की जे मूल आईवडलांवर जास्त अवलंबून असतं त्याचा आईवडलांबरोबर जास्त सहवास घडतो. त्यामुळे ते आईवडलांना जास्त जवळचं वाटतं. त्या मुलालाही आईवडलांवर अवलंबून असण्याची अवस्था आवडायला लागते. प्रत्यक्षात यामधे ते मूल कधीच पुरेसं स्वतंत्र न झाल्यानी पुरेसं परिपक्व होत नाही. म्हणजे त्या मुलाचा तोटा होतो. त्याच आईवडलांचं दुसरं मूल जास्त स्वतंत्र वृत्तीचं असलं तर त्याचा आईवडलांबरोबर सहवास कमी, त्यामुळे तपशीलांबद्दलचा संवाद कमी. ते मूल आईवडलांच्या कमी जवळचं असण्याची शक्यता असते, पण त्या मुलाची परिपक्वता वाढते, ते स्वतंत्र होतं. या दोन परस्परविरोधी तत्वांबद्दल बहुतेक आया असा निर्णय घेतात की, मूल आपल्यावर अवलंबून राहिलं तर बरं. मुलाचं नुकसान होतंय् याकडे त्या आया दुर्लक्ष करतात. अर्थातच अशा आयांचं किंवा वडलांचं वागणं चुकीचं आहे. मुलाला अडचणीत मदत करायची, पण स्वावलंबी बनवायचं, ते कसं हेच तर कोडं सोडवायचं आहे.

पालकत्वाचं सार मला तुम्हाला सांगायचंय्. पण ते वरवर खूप चमत्कारिक वाटणारं आहे. ‘मुलांशी मैत्री करायची, त्यांच्याशी जवळीक साधायची या सगळ्याचा हेतू काय? मुलाला लवकरात लवकर स्वतंत्र करण्यासाठी, म्हणजेच लवकरात लवकर दूर करण्यासाठी.’ हे ऐकायला कितीही चमत्कारिक वाटलं तरी तेच अंतिम सत्य आहे. मुलांनी लवकरात लवकर स्वतःच्या पायावर उभं राहावं,

घरातून टप्प्याटप्प्यानी लवकरात लवकर बाहेर पडावं आणि आपली मदत फक्त आणीबाणीच्या परिस्थितीत घ्यावी, तीही तात्पुरती, कमीतकमी काळ यातच पालकत्वाची खरी गंमत, खरं यश आहे.

आणखी एक उदाहरण सांगतो. मुलांशी चांगलं कशासाठी वागायचं तर ती मोठेपणी चांगली व्हावीत म्हणून. इतक्या जास्त काळानी ज्या गोष्टीची फळं मिळणार असतील ती गोष्ट आजकाल माणूस करायला तयार नसतो. प्रत्यक्षात बायकोशी चांगलं कशासाठी वागायचं तर त्यात शेवटी स्वतःचं समाधान गुंतलेलं आहे म्हणून. तसंच मुलं चांगली व्हावीत, ती कशासाठी? आपल्याला स्वतःला त्यानी आनंद वाटेल म्हणून. मुलं चांगली, यशस्वी, समाधानी आपल्या हयातीत होतील आणि तो आनंद आपल्याला अनुभवता येईल याची मात्र खात्री नाही. एखादं झाड आपण लावतो आणि त्याची फळं आपल्या पणतवंडांना आपल्या पश्चात मिळणार हे समजलं तर चांगलं पालकत्व कशासाठी हे समजेल. त्यासाठी कष्ट नक्की आहेत. त्या कष्टांचं वर्णन असं करतात, 'आपलं मूल शिवाजी व्हायला हवं असेल तर आपण जिजाबाई बनायला हवं.' त्याखेरीज आपलं मूल शिवाजीसारखं कर्तबगार बनेपर्यंत आपण कुठल्या अवस्थेत असू, हयात असू का नाही हे कोणी सांगावं?

मुलांना कामं सांगताना, त्यांना प्रोत्साहन देताना, करवून घेताना पालक म्हणजे व्यवस्थापनाच्या भाषेत मॅनेजर असतो. पालकांनी कायम लक्षात ठेवण्याची गोष्ट म्हणजे मुलांना कायम आव्हानात्मक पण शक्य वाटेल अशी कामगिरी देणं. ते आव्हान हळूहळू करत जास्त जास्त कठीण करत नेणं आणि तरी ते नेहमी शक्य असेल असं बघणं.

मोठ्या मुलांचं एकमेकांशी कायम सख्य राहायला पाहिजे असलं तर पालकांनी वेळेवर, म्हणजे 40-50 वयात आपलं मृत्युपत्र करायला हवं. पैसे, मालमत्ता, त्याची वाटणी हा एक विषय अनेक भावंडांच्यातले संबंध बिघडवतो हे मला पक्कं माहितीय्. 'ज्येष्ठांशी संवाद' या विषयावरच्या लेखात याबद्दल बरंच सविस्तर लिहिलेलं आहे. कायम सकारात्मक विचार करावा असं म्हटलं तर मृत्यूचा विचार करताच येणार नाही. प्रत्यक्षात मृत्यूचा विचार केल्याशिवाय समतोल विचार शक्यच नाही.

अशी तात्पुरती निर्णय घ्यायला कठीण, कोड्यात टाकणारी अनेक उदाहरणं तुम्हाला आठवतील. ती आम्हाला कळवा. समतोल विचार हाच तर

आमच्या आयुष्यातला अभ्यासाचा विषय आहे. ही पुरुष पालकत्वाची कार्यशाळा तर संपली. शेवटी जमलेल्या सगळ्या पुरुष-पालकांनी आपण बोललेल्यापैकी काय काय गोष्टी करून बघायच्या ठरवल्या आहेत? मी एवढ्या वर्षांत एक महत्त्वाची गोष्ट आयुष्यात शिकलो आहे, ती म्हणजे एखादी गोष्ट पटली की ती करून बघायला घाबरायचं नाही. तेवढं तुम्ही ठरवलंत की माझं समाधान झालं समजा.



*'मुलांशी मैत्री करायची, त्यांच्याशी जवळीक साधायची या सगळ्याचा हेतू काय? मुलाला लवकरात लवकर स्वतंत्र करण्यासाठी, म्हणजेच लवकरात लवकर दूर करण्यासाठी.'*

# जीवनसाथ पुस्तक संच
# संपूर्ण यादी

| पुस्तक क्र. | पुस्तकाचं नाव |
| --- | --- |
| 1. | विवाह अभ्यास म्हणजे नेमकं काय ● कौटुंबिक विसंवाद |
| 2. | जोडीदाराची निवड ● लैंगिक शिक्षण |
| 3. | व्यक्तिमत्त्व विकासाचा खरा अर्थ ● पुरुष पालकांचं शिक्षण |
| 4. | आर्थिक व्यक्तिमत्त्व ● करीअरचं नियोजन |
| 5. | व्यवस्थापनशास्त्र – वैवाहिक आणि रोजच्या आयुष्यातलं |
| 6. | स्वावलंबन, आत्मसन्मान ● स्त्री-पुरुष असमानतेची रूपं |
| 7. | उत्सवी प्रवृत्ती ● लग्नसमारंभ |
| 8. | खरे उपयोगी संस्कार ● |

सर्वांनी करण्याजोगं समाजकार्य

---

9. रोजच्या आयुष्यातलं तत्त्वज्ञान



समतोल विचारांचं महत्त्व

---

10. ज्येष्ठांशी संवाद



मृत्यूसंबंधी स्पष्ट विचार

---

11. समुपदेशनाच्या अनेक नव्या पद्धती



जीवनसाथ समुपदेशन संस्था

---

12. कौटुंबिक स्वास्थ्यासाठी उपाय



जीवनसाथमधले खेळ

# जीवनसाथ संचामधली अनिल भागवत यांची इतर पुस्तकं

पुस्तक-1

## विवाह अभ्यास म्हणजे नेमकं काय



## कौटुंबिक विसंवाद

### या पुस्तकाचा सविस्तर अनुक्रम

---

**1 ) विवाह अभ्यास मंडळ म्हणजे नेमकं काय?**

1. या कल्पनेची थोडक्यात ओळख 2. विवाहाचा तत्त्वज्ञानाशी संबंध 3. वैवाहिक आयुष्यासाठीची काही महत्त्वाची तत्त्वं 4. रोजच्या आयुष्यातली साधी तत्त्वं 5. भावनांविषयीचा अभ्यास 6. विचारांचं भावनेत रूपांतर 7. भावनांवर नियंत्रण 8. कुटुंबाबरोबरच्या आयुष्याचं महत्त्व 9. व्यवस्थापनशास्त्राचा उपयोग 10. कुटुंबाचं समुपदेशन 11. आपुलकी, प्रेम, या भावना व्यक्त करणं 12. नाती सांभाळण्यासाठीची तत्त्वं आणि तंत्रं 13. प्रश्न सोडवण्याची पद्धत– मिश्रगट कार्यशाळा म्हणजेच 'ग्रुप काउन्सेलिंग' वर्कशॉप्स 14. खरं बोलणं 15. पैशाबद्दलची विचारसरणी 16. स्वावलंबन आणि आत्मसन्मान 17. स्त्री-पुरुष समतेची आणि समानतेची समज 18. लोकशाहीचं मूल्य आणि स्वतंत्र किंवा एकत्र कुटुंब 19. उत्सव, समारंभ याबद्दल भूमिका 20. असणं, दिसणं आणि दाखवणं 21. आधुनिक आणि पारंपरिक 22. वैयक्तिक समुपदेशन 23. या पुस्तकासंबंधीच्या सूचना

**2 ) कुटुंबातले आणि नवराबायकोमधले मतभेद म्हणजेच कौटुंबिक विसंवाद**

1. प्रश्नाचा नेमका शोध आणि उपायाचा शोध 2. विवाहाच्या इतिहासात आणि तत्त्वज्ञानात काय सांगितलंय 3. कौटुंबिक विसंवाद या विषयातली आकडेवारी 4. विचार, भावना यांचे गट आणि नवरा-बायकोचं नातं 5. कुटुंबातली इतर नाती / एकत्र कुटुंब 6. पैशावरून वाद 7. आत्मसन्मानावरून वाद 8. मुलांसंबंधीचे वाद 9. सासर-माहेर याविषयी वाद 10. स्त्री-पुरुष समानतेची समज नसण्यावरून विसंवाद 11. आधुनिक किंवा पारंपरिक विचारांमुळे विसंवाद 12. व्यसनं आणि भांडणं 13. नवराबायको आणि कुटुंबातले समाईक धागे 14. कुटुंबासाठी वेळ देणं 15. व्यवस्थापन कौशल्यांचा वापर 16. विवाहाचा अर्थ कळणं 17. सर्वात महत्त्वाची गोष्ट– संवाद 18. राग, धमक्या, रागवारागवी, रुसणं 19. मारहाण– हिंसेचे प्रकार 20. लग्न ठरवण्याची पद्धत– सगळ्याचं मूळ 21. लग्नाचा करार 22. मानसशास्त्राची मदत 23. करण्याजोग्या गोष्टी 24. खरं प्रेम म्हणजे काय ते न समजणं 25. भांडणांचं टोक– घटस्फोट

**3 ) मी आणि शोभामधले विसंवाद**

**4 ) मी आणि शोभा यांचं सहजीवन, आम्ही काढलेले उपाय**

**5 ) राग आवरण्याचे मार्ग**

**6 ) आभार**



पुस्तक-2

# जोडीदाराची निवड



# लैंगिक शिक्षण

## या पुस्तकाचा सविस्तर अनुक्रम

---

प्रश्नावलीच्या देवघेवीची कल्पना 5. प्राथमिक प्रश्नावली 6. सविस्तर प्रश्नावली– बाह्यरूप 7. सविस्तर प्रश्नावली– पत्रिका 8. सविस्तर प्रश्नावली– शिक्षण/ व्यासंग 9. सविस्तर प्रश्नावली– आरोग्य 10. सविस्तर प्रश्नावली– स्वभाव 11. सविस्तर प्रश्नावली– पैशांबद्दलची विचारसरणी 12. सविस्तर प्रश्नावली– मासिक प्राप्ती 13. सविस्तर प्रश्नावली– स्त्री-पुरुष समानता 14. सविस्तर प्रश्नावली– स्त्री-पुरुष लैंगिक संबंध 15. सविस्तर प्रश्नावली– कुटुंब 16. सविस्तर प्रश्नावली– मुलं 17. सविस्तर प्रश्नावली– लग्न समारंभ 18. सविस्तर प्रश्नावली– वैवाहिक आयुष्याचं सार 19. सविस्तर प्रश्नावली– महत्त्व कशाला? 20. त्रोटक सविस्तर माहिती 21. भावी जोडीदाराच्या प्रत्यक्ष भेटीपूर्वीचे पर्याय 22. जोडीदाराबद्दल अंतिम निर्णयप्रक्रिया 23. जीवनसाथची कार्यशाळा नेमकी कशी असते? 24. निवडक गटाचं जोडीदाराच्या निवडीसाठी समुपदेशन 25. जोडीदार ठरल्यावर लग्नापूर्वीची बौद्धिक चाचणी (मॅरेज मॅच्युरिटी इंडिकेटर) 26. अविचाराची शक्यता 27. लग्न ठरल्यानंतरची कर्तव्यं 28. जोडीदाराची निवड या कार्यशाळेत वापरायचे खेळ

**9 ) लैंगिक शिक्षणाची गरज**

1. या लेखाची पार्श्वभूमी 2. भारतातलं पारंपरिक कामशास्त्र आणि जगातली परिस्थिती 3. तत्त्वज्ञान आणि मानसशास्त्राची लैंगिक संबंधाबद्दलची भूमिका 4. सध्याच्या प्रश्नाचं स्वरूप 5. लैंगिक शिक्षणाची कार्यशाळा 6. लैंगिक संबंधातलं समुपदेशन

**10 ) लैंगिक शिक्षण– जन्मापासून 5 वर्षांपर्यंतच्या मुलामुलींबद्दल**

**11 ) लैंगिक शिक्षण– 5 ते 10 वर्षांपर्यंतच्या मुला-मुलींसाठी**

**12 ) लैंगिक शिक्षण– 10 ते 16 वयापर्यंतच्या मुला-मुलींसाठी**

**13 ) लैंगिक शिक्षण – तरुणांसाठी – लग्नापूर्वी**

1. सध्याची परिस्थिती 2. लैंगिक भावनांचा गोंधळ 3. मुलग्यांच्या विकृत गप्पा 4. हस्तमैथुन 5. वेश्येकडे जाण्याचा मोह 6. मुलींच्या मनातल्या कल्पना 7. मुलगे आणि मुली यांची चांगली मैत्री 8. लैंगिक शिक्षणाची अविवाहितांसाठी कार्यशाळा 9. चुकीच्या गोष्टींची शक्यता– रेव्ह पार्टी 10. प्रेमभंग आणि लग्नापूर्वी लैंगिक संबंध 11. लग्नापूर्वी लैंगिक संबंधाबद्दल वैयक्तिक समुपदेशन 12. परदेशातली परिस्थिती 13. लैंगिक संबंधांमागची मानसशास्त्रीय बैठक



टीप : जीवनसाथ पुस्तक संचातल्या पुस्तक क्र. 3 चा सविस्तर अनुक्रम या पुस्तकाच्या सुरुवातीच्या भागात दिला आहे.

पुस्तक-4

# आर्थिक व्यक्तिमत्त्व



# करीअरचं नियोजन

## या पुस्तकाचा सविस्तर अनुक्रम

---





पुस्तक-5

# व्यवस्थापनशास्त्र – वैवाहिक आणि रोजच्या आयुष्यातलं

## या पुस्तकाचा सविस्तर अनुक्रम

---





पुस्तक-6

# स्वावलंबन, आत्मसन्मान



# स्त्री-पुरुष असमानतेची रूपं

## या पुस्तकाचा सविस्तर अनुक्रम

---





पुस्तक-7

# उत्सवी प्रवृत्ती



# लग्नसमारंभ

## या पुस्तकाचा सविस्तर अनुक्रम

---





पुस्तक-8

# खरे उपयोगी संस्कार



# सर्वांनी करण्याजोगं समाजकार्य

## या पुस्तकाचा सविस्तर अनुक्रम

इत्यादी 6. खाण्यापिण्याबद्दलच्या रूढी 7. लग्नसमारंभाशी जोडलेल्या रूढी 8. पोषाखाच्या रूढी 9. हिंसा-अहिंसा 10. नमस्कारासंबंधी रूढी 11. सामाजिक कार्यक्रमातल्या रूढी 12. रूढीमधले झालेले आणि करण्याजोगे बदल 13. पाप-पुण्य, मृत्यूसंबंधीच्या रूढी 14. कुटुंबकारणातल्या आणि सामाजिक अधिकाराच्या रूढी 15. काय बदल करता येतील?

**9 ) आधुनिक-पारंपरिक म्हणजे नेमकं काय?**

1. या लेखामागची कल्पना 2. बाह्यरूपातली पारंपरिकता किंवा आधुनिकता 3. मनातली आणि विचारातली पारंपरिकता किंवा आधुनिकता 4. निष्कर्ष

**10 ) खरे संस्कार म्हणजे नेमकं काय?**

1. आहाराविषयीचे संस्कार 2. आरोग्याविषयीचे संस्कार 3. पोषाखाविषयीचे संस्कार 4. निवाऱ्यासंबंधीचे संस्कार 5. विवाहासंबंधीचे संस्कार 6. मुलांवरचे संस्कार 7. पैशांबद्दलचे संस्कार 8. कामाबद्दलचे संस्कार 9. अभिरुचीचे संस्कार 10. मृत्युसंबंधीचे संस्कार 11. संस्कारांबद्दल करण्याजोग्या गोष्टी

**11 ) स्वतःची होकारांची आणि नकारांची यादी**

**12 ) समाजकार्याच्या दिशा**

1. या लेखामागची कल्पना 2. 'फंडिंग' असलेली कामं 3. सामाजिक प्रथा बदलण्याची कामं 4. धार्मिक प्रकारची सामाजिक कामं 5. शिक्षणक्षेत्रासाठी सामाजिक कामं 6. बालकांच्या हक्कांसंबंधी कामं 7. पत्रकारितेमधून सामाजिक काम 8. ग्राहकहितासाठी सामाजिक काम 9. शहरी सुविधांसाठी चळवळ 10. वैद्यकीय क्षेत्रातली सामाजिक कामं 11. शिष्यवृत्त्यांसाठी, पारितोषिकांसाठी पैशाची सोय 12. नैसर्गिक आपत्तीनंतरची कामं 13. शहरांमधल्या झोपडपट्ट्यांच्यामधे काम 14. पर्यावरण रक्षण-शिक्षण 15. कोणालाही जमतील अशी साधी कामं

**13 ) आभार**



पुस्तक-९ (नऊ)

# रोजच्या आयुष्यातलं तत्त्वज्ञान



# समतोल विचारांचं महत्त्व

## या पुस्तकाचा सविस्तर अनुक्रम

---

5 ) सरकार

6 ) राजकीय लोकशाही

7 ) बहुमत

8 ) सहकारी संस्था

9 ) राजकारण

10 ) निवडणूक

11 ) राष्ट्र

12 ) राष्ट्रीय एकात्मता, विश्वबंधुत्व/विश्वशांती

13 ) कायदा आणि पोलीस यंत्रणा

14 ) स्वतःच्या आयुष्याविषयी समतोल विचार

15 ) आभार



पुस्तक-10

# ज्येष्ठांशी संवाद



# मृत्यूसंबंधी स्पष्ट विचार

## या पुस्तकाचा सविस्तर अनुक्रम

---





पुस्तक-11

# समुपदेशनाच्या अनेक नव्या पद्धती



# जीवनसाथ समुपदेशन संस्था

## या पुस्तकाचा सविस्तर अनुक्रम

---

**5 ) वैयक्तिक समुपदेशन**

1. या लेखाची मूळ कल्पना 2. घरातल्या किंवा ओळखीतल्या ज्येष्ठांचा सल्ला 3. मार्गदर्शन आणि समुपदेशनातला फरक 4. समुपदेशनातली मूलतत्त्वं किंवा गृहितं 5. भारत आणि पाश्चात्त्य देशातली परिस्थिती 6. समुपदेशकाची खास कौशल्यं– ऐकणं, बोलणं 7. समुपदेशनाची सुरुवात आणि प्रगती 8. समुपदेशकानी स्वतःविषयी सांगणं 9. समुपदेशनाचे प्रकार 10. क्रिटिकल ॲनॅलिसिस पद्धतीचं समुपदेशन 11. आत्मविश्वास वाढविण्यासाठी समुपदेशन 12. समुपदेशनातली तंत्रं 13. समुपदेशनातली पथ्यं 14. समुपदेशनातल्या अडचणी 15. समुपदेशकांच्या श्रेणी 16. विवाहपूर्व समुपदेशन 17. घटस्फोटापूर्वीचं समुपदेशन 18. ग्रुप काऊन्सेलिंग– एक उत्तम पर्याय 19. निष्कर्ष

**6 ) रिफर्ड काऊन्सेलिंग ऊर्फ अप्रत्यक्ष समुपदेशन किंवा कॅरम बोर्ड काऊन्सेलिंग**

**7 ) जागा-पद्धत-व्यवहार, सूत्रधार तयार करणं वगैरे**

**8 ) या पुस्तकाचा उपयोग**

**9 ) अभ्यास मंडळात न येण्याची कारणं**

**10 ) आभार**



पुस्तक-12

# कौटुंबिक स्वास्थ्यासाठी उपाय,



# जीवनसाथमधले खेळ

## या पुस्तकाचा सविस्तर अनुक्रम

---





# अनिल भागवत यांनी लिहिलेली आणखी पुस्तकं

पुस्तक-1

## घर पाहावं बांधून (पाचवी आवृत्ती)

- प्रस्तावना
- प्रमोटर बिल्डर्सविषयी
- आर्किटेक्टस्‌विषयी
- बिल्डिंग कॉट्रॅक्टरविषयी
- आर. सी. सी. डिझायनरविषयी
- मटेरियल सप्लायरविषयी
- बांधकाम कामगारांविषयी
- पेटी कॉट्रॅक्टर्सविषयी
- गळणारं छप्पर
- ॲग्रीमेंटवर सही
- सिस्टिम बिल्डिंग
- बांधकाम आणि सरकार
- बांधकाम, कर्ज, सरकारी कर आणि आपण
- कन्स्ट्रक्शन मॅनेजमेंट कन्सल्टंटविषयी
- बांधकामातले तांत्रिक शब्द आणि चेकलिस्ट

पुस्तक-2

## लग्न पाहावं करून (उपलब्ध नाही)

पुस्तक-3

## व्यवस्थापनशास्त्र तुमच्यासाठी (दुसरी आवृत्ती)

- मॉनिटरिंग मॅनेजमेंट - एक आवश्यक व्यवस्थापनशास्त्र
- मॉनिटरिंग मॅनेजमेंटची मूलतत्त्वं
- मॉनिटरिंग मॅनेजमेंटमधल्या महत्त्वाच्या गोष्टी आणि फायलिंग
- मॉनिटरिंग मॅनेजमेंट आणि कामगार
- क्वालिटी मॅनेजमेंट आणि सुपरवायझर
- स्पीड मॅनेजमेंट - एक जादूसारखं तंत्र
- कॉस्ट मॅनेजमेंट
- मॉनिटरिंग मॅनेजमेंट आणि इतर तज्ज्ञ
- मॉनिटरिंग मॅनेजमेंट आणि मालक
- डिझास्टर मॅनेजमेंट - आपत्ती निवारणशास्त्र
- मॉनिटरिंग मॅनेजमेंट - मोहीम फत्ते करण्याचं शास्त्र
- मॉनिटरिंग मॅनेजमेंट - बहुउपयोगीशास्त्र
- तुम्ही कोणीही असा - ते वापरता येईल



# लेखक अनिल भागवत यांचे ऋणी आहेत.

- डॉ. उल्हास लुकतुके - 1997 साली जीवनसाथ सुरू करताना स्पष्ट विचारांची जीवनभर साथ हा उद्देश स्पष्ट होता, पण त्याची सुरुवात करण्यासाठी यांची खूप मदत झाली.
- जीवनसाथ - मुंबई शाखा माझ्या आईसाठी सुरू केली. मुंबईतल्या लोकांना या अभ्यासाची प्रचंड गरज होती, अजूनही आहे. तिच्या घरीच कार्यक्रम व्हायचे.
- मुंबई जीवनसाथचा भक्कम आधार होता सुशील आणि विनीता हाटे. त्यांची निष्ठा, संयोजनकौशल्य आणि आमची वैयक्तिक मैत्री मला खूप महत्त्वाची वाटते.
- पुण्यातलं जीवनसाथ अभ्यास मंडळ पहिल्या दिवसापासून जोरातच चाललं. बरीच वर्षं ते शनिवार पेठेतल्या आमच्या घरी होतं. आता आमच्याच कर्वेनगरच्या घरी अभ्यास मंडळ चालतं. गेली दोन वर्षं मी हा पुस्तकसंच लिहीत असताना मला अनेकांनी मदत केली. त्यातल्या काहींनी या पुस्तकांसाठी काही विषयांसाठी मजकूर लिहिला, काहींनी टायपिंगची, डिक्टेशन घेऊन लिहिण्याची मदत केली. मजकुरावरच्या त्यांच्या प्रतिक्रियादेखील महत्त्वाच्या होत्या. त्यांची नावं मी आडनावाच्या आद्याक्षरांच्या क्रमानी देतोय. ती आद्याक्षरं इंग्लिश अल्फाबेटाप्रमाणे रचली आहेत.

  बोकील डॉ. आशा, बोरोटीकर तुषार, भोइटे आमोद, दंडवते मानसी, डिंबळे रामभाऊ, देगवेकर दिलीप, देशपांडे केशव, देवराज शिल्पा, गोवित्रीकर सुनीति, जाधव विजय, कानेटकर श्रद्धा, कुळकर्णी पौर्णिमा,

क्षेमकल्याणी ममता, लिमये हर्षद, लिमये गौरी गोळे, मेढेकर शैवल, मोहाडीकर डॉ. लीना, मुद्‌गल दीपा, मुद्‌गल स्मिता, मुळे अंजली, म्हैसकर मकरंद, नागपूरकर माधव, पाटणकर राजेश, पाटील मोहिनी, पाटील स्मिता, पाटील विक्रांत, राऊळ श्यामल, रावराणे गीता, साठे आशा, शुक्ल डॉ. भूषण, संचेती अपूर्वा, संचेती आदिती, वळसंगकर अनिल, तेलंग डॉ. नीलू.

- जीवनसाथ अभ्यास मंडळाचे सगळे सभासद. जीवनसाथ समुपदेशन केंद्राचे सगळे समुपदेशनार्थी.
- शोभा तर या पुस्तकसंचाच्या थोड्या भागाची सह-लेखिकाच आहे. मी आमच्या वैवाहिक आयुष्यात तिच्यावर केलेल्या अन्यायाचा मी अनेक ठिकाणी उल्लेख केलाच आहे. शिवाय या पुस्तक-प्रक्रियेच्या दोन वर्षांच्या काळातही तिच्या मदतीशिवाय, टीकेशिवाय, सूचनांशिवाय आणि प्रोत्साहनाशिवाय मी इथपर्यंत पोचलोच नसतो.

  शोनील आणि आभामुळे तर जीवनसाथ संस्था सुरू झाली. अनास्तेसिया, श्रेयस आणि आमची नातवंडं ओजस, तुहिन आणि डॉमिनिक यांना पुढे त्यांच्या आयुष्यात माझ्या या कार्यशाळांचा आणि त्याबद्दलच्या लिखाणाचा उपयोग व्हावा हा माझा ऊर्जास्रोत होता.
- हे पुस्तक या अवस्थेपर्यंत आणण्यात श्री. हेमंत जोशी आणि सौ. संगीता सरदेसाई यांचा मोठा वाटा आहे.
- मी पुस्तकसंचात म्हटलं आहे तेच पुन्हा सांगतो. वाचकांच्या प्रतिक्रिया नाव, फोटो पत्त्यासह पुढच्या आवृत्तीत छापणार आहे. कौतूक, टीका दोन्हीचं स्वागत असेल. अशा प्रत्येकाचं माझ्यावर ऋण असणार आहे.

**– अनिल भागवत**
वैवाहिक आणि कौटुंबिक समुपदेशक

'आयुष्यात येणाऱ्या प्रत्येक प्रश्नाचं खरं मर्म एकच – चांगल्या-वाईट अनेक घटना तुमच्या वाट्याला आयुष्यभर येणार. त्यांची हाताळणी कशी करायची हे दुसरी कुठचीही शक्ती किंवा व्यक्ती ठरवणार नसते. ते तुम्ही स्वतः ठरवायचं असतं. त्यासाठी त्या घटनेच्या सर्व अंगांचा अभ्यास स्वतःला करावा लागतो. त्या अभ्यासासाठी जीवनभर स्पष्ट विचारांची साथ लागते. म्हणजेच जीवनसाथ.'

## या पुस्तकाविषयी

व्यक्तिमत्त्व विकासाचा खरा अर्थ आणि त्या दिशेनी केलेला प्रवास लेखकानी निरनिराळ्या पद्धतींनी सांगितला आहे.

विचार → अभ्यास → अंमलबजावणी

अधिक विचार → जास्त अभ्यास →

आत्मविश्वासानी आचरण

पुरुष पालकांचं शिक्षण या लेखात लेखकानी पालकत्वाचा खरा अर्थ सांगितला आहे. पालकत्वाची आणखी एक व्याख्या अशीही आहे. पालकत्व म्हणजे स्वनियंत्रणाचं शिक्षण. हे शिक्षण पालक आणि पाल्य दोघांनी एकाच वेळेला घ्यायचं असतं आणि द्यायचं असतं. पुढे ते म्हणतात की, जे योग्य आणि शक्य वाटेल त्याची 'प्रॅक्टिस' आजच्या आज सुरू करा. थिअरी त्यातूनच जन्म घेईल.